# गर्दीपासून दूर दूर

Thomas Hardy यांच्या Far from the Madding Crowd
या कादंबरीचा अनुवाद

प्रा. भा. म. गोरे, एम्. ए.
इंग्रजीचे प्राध्यापक, फर्ग्युसन कॉलेज, पुणे ४.




किंमत तीन रुपये

आयडियल बुक सर्व्हिस

# अनुक्रमणिका

# भूमिका

प्रसिद्ध आंग्ल कवि व कादंबरीकार टॉमस हार्डी यांच्या Far from the madding Crowd या प्रसिद्ध कादंबरीचा हा संक्षिप्त अनुवाद आहे. इकडील नांवे व पार्श्वभूमि वापरून या कादंबरीचें रूपांतर करणे अधिक सुलभ झालें असतें. प्रो. वि. मा. दी. पटवर्धन यांनी Tess चें असे रूपांतर **रत्ना** या नावानें यशस्वी रीतीने केलेलें आहेच. तथापि मूळ स्वरूपात हार्डींची एखादी तरी कादंबरी मराठी वाचकापुढे यावी या हेतूने रूपांतराचा मोह टाळून भाषांतराचाच मार्ग मी स्वीकारला आहे.

मात्र असें करतांना कांहीं अडचणी आणि मर्यादा जमेस धरून मला हे कार्य करावें लागले आहे हे स्पष्ट करणे अवश्य आहे, नाहींपेक्षां अनुवादकर्त्यानें मनाशीं न योजलेल्या कांहीं निराळ्याच कसोट्या या अनुवादाला लागून वाचकाचा अपेक्षाभंग होण्याचा प्रसंग येण्याचा संभव आहे.

हार्डीची मूळ कादंबरी बारीक टाइपात छापलेल्या ४७६ पृष्ठांची असून तींत तत्कालीन पद्धतीप्रमाणे अत्यंत बारकाईच्या व तपशीलवार वर्णनांची रेलचेल आहे. हा सर्वच भाग मराठींत उतरविल्यास त्यास सुमारें पांचशें पृष्ठें लागलीं असती. असे शब्दशः केलेले भाषांतर वाचण्यासहि अवघड व रुक्ष वाटण्याचा संभव होता. शिवाय एवढया मोठया कादंबरीचा खर्च व खप या व्यावहारिक बाबतींकडे दुर्लक्ष करणेंहि अशक्य होतें. यामुळे स्वैर रूपांतर व काटेकोर भाषांतर या दोन टोकांतील सुवर्णमध्य साधण्याचा मी प्रयत्न केला आहे. तो कितपत सिद्धीस गेला आहे हें रसिक वाचकांनीं ठरवावे.

मुख्य कथावस्तूला धक्का न लावतां गौण प्रसंग व तपशीलवार वर्णनांचा संक्षेप करून, अनुवाद शक्य तेवढा आटोपशीर केला आहे. शब्दाला शब्द आणि ओळीला ओळ ठेवून भाषांतर करण्याचा हा प्रयत्न नाहीं हे वाचकांनीं प्रथमच स्पष्टपणें ध्यानात ठेवल्यास 'अमुक शब्दाचे, वाक्याचें, वर्णनाचें किंवा बारकाव्याचें संपूर्ण भाषांतर येथे का नाहीं' असा प्रश्न उपस्थित होणार नाहीं.

थोडक्यांत म्हणजे हार्डीच्या जानपद-जीवनावरील या प्रसिद्ध कादंबरीचा संक्षिप्त, सुटसुटीत स्वरूपातील अनुवाद मराठी वाचकांपुढें ठेवण्याचा हा एक नम्र प्रयत्न मी केला आहे एवढेंच.

नियतीचा क्रूर खेळ आणि मानवी जीवनांतील दुःखद योगायोग या अंगाकडे हार्डीनें आपल्या जीवनाच्या उत्तरार्धांतील कादंबऱ्यांत अधिकाधिक लक्ष दिलें. यामुळें हार्डीच्या कादंबऱ्या रडव्या, निराशापूर्ण आणि भलत्याच जड आहेत असा बऱ्याच वाचकांचा गैरसमज झालेला आहे. प्रस्तुत कादंबरींतहि नियतीच्या अशा खेळाची चुणूक दिसली तरी एकदरींत सर्व वातावरण शांत, निवांत आणि प्रसन्न आहे. जानपद जीवनाचे अनेक बारकावे दाखवून, वाचकांना शहराच्या गर्दीपासून दूर नेऊन, हार्डीनें त्यांना सृष्टि-सौंदर्याचें व नैसर्गिक जीवनाचें दर्शन घडविलें आहे.

"सुख पहातां जवापाडें। दुःख पर्वताएवढें॥" अशी इकडील संत-कवींप्रमाणें हार्डीचीहि पुढे ठाम समजूत झाली असली तरी या जवा-एवढ्या सौख्याच्या आशेमुळेंच मनुष्य पर्वताएवढीं दुःखें पेलूं शकतो हेंहि विसरतां येत नाहीं. अशा कांहीं सुखप्रद प्रसंगांचेंहि अगदीं हळुवार हातानें केलेलें चित्रण या कादंबरींत सांपडेल.

हार्डीचा हा मराठी अवतार वाचकांना स्वागतार्ह वाटला तर अनुवाद-कर्त्याला आपल्या श्रमाचें सार्थक झालें असें वाटेल.

टॉमस हार्डीच्या ग्रंथाच्या हक्काचे उत्तराधिकारी विश्वस्त व व्यवस्थापक यांनीं माफक मोबदला घेऊन प्रस्तुत संक्षिप्त अनुवादाला अनुज्ञा दिली व श्री. शा. ल. बर्वे यांनीं हा अनुवाद प्रसिद्ध करण्याची सर्व जबाबदारी उत्साहानें स्वीकारली याबद्दल उभयतांचे आभार मानून सध्या वाचकांची रजा घेतों.

फर्ग्युसन कॉलेज, पुणें ४.
जून १९५५

भा. म. गोरे.

# टॉमस हार्डी यांचें अल्प चरित्र

प्रस्तुत कादंबरीचे लेखक टॉमस हार्डी हे काव्य आणि कादंबरी या दोन्ही क्षेत्रांतील सव्यसाची साहित्यिक होते. त्यांचा जन्म एका गरीब कुटुंबांत झाला असून त्याचे वडील गवंडीकाम करीत असत. २ जून १८४० रोजीं अपर बोकॅम्प्टन् या नावाच्या खेड्यांत त्याचा जन्म झाला. डॉर्सेटशीअर जिल्ह्यातील डॉर्चेस्टर शहरापासून हें खेडें तीन मैलांवर आहे.

घराण्याच्या गरिबीमुळें हार्डी यांना उच्च शिक्षणाचा फारसा लाभ मिळूं शकला नाहीं. कोणत्याहि विश्वविद्यालयाची पदवी त्यानीं घेतली नव्हती. माध्यमिक शिक्षण संपल्याबरोबर एका स्थापत्यविशारदाच्या कचेरींत मदतनीस म्हणून त्याना नोकरी धरावी लागली. बाळपणापासूनच साहित्याकडे त्यांचा ओढा असल्यामुळें दगडाविटांच्या या जड व्यवसायांत त्यांचें मन रमेना. अखेर मनाचा हिय्या करून, घरें बांधण्याच्या व्यवसायाकडून ते ग्रंथरूपी प्रासाद निर्माण करण्याच्या व्यवसायाकडे वळले. सुदैवाने दैवाचें दान त्याना अनुकूल पडून या क्षेत्रात द्रव्य आणि कीर्ति या दोहींचाहि भरपूर लाभ त्यांना मिळाला.

मौज अशी कीं हार्डी याच्या कादंबऱ्यांतून कठोर नियतीचे क्रूर डावपेंच आणि मानवी जीवनाची हताश परिस्थिती या दोन विशेषांवरच फार भर दिलेला आढळतो; परंतु खुद्द हार्डी यांच्या आयुष्यात त्याना दैवाशीं फारसा झगडा कधींच करावा लागला नाहीं.. एमा गिफर्ड हिच्याशीं त्यांनीं १८७४ सालीं लग्न केलें आणि सर्वस्वी लेखनव्यवसायास वाहून घेतलें.

The Poor Man and the Lady ही त्यांची पहिली वहिली कादंबरी प्रकाशकांनीं नाकारली. तरी धीर न सोडतां हार्डी आत्मविश्वासानें लिहीतच राहिले. खेड्याच्या पार्श्वभूमीवरील जानपद जीवनांतील सुखदुःखें रेखाटणें हेंच हार्डी यांच्या कलेचें वैशिष्ट्य होय. या वैशिष्ट्यांमुळेंच Under the Greenwood Tree (१८७२) या कादंबरीनें त्यांना प्रथम लौकिक मिळवून दिला. या व अशा पहिल्या कांहीं कादंबऱ्यांत हार्डी यांनीं जानपद जीवनाचीं, सृष्टिशोभेचीं, प्रसन्न व आल्हादकारक अशीं दृश्यें रेखाटलीं आहेत. परंतु वाढत्या वयाबरोबर (शेक्सपीअरप्रमाणें) हार्डींच्या मनावरहि विषण्णतेच्या छाया अधिकाधिक दाटपणे पडूं लागल्या. जगांतील

अकारण दुःख, विचित्र योगायोग, निराशा वगैरे प्रकारांकडे त्यांचें अधिकाधिक लक्ष वेधलें आणि अशा प्रकारांनाच त्याच्या कादंबऱ्यांत अधिकाधिक प्रामुख्य मिळूं लागलें. त्याचा निराशावाद वाढतां वाढतां Jude the Obscure (१८९८) या कादंबरींत इतक्या पराकोटीला गेला कीं, अशा भीषण निराशेनें भरलेली कादंबरी वाचकाना वाचवेनाच. या कादंबरीविरुद्ध एवढे मोठें काहूर उठलें कीं त्यामुळें वैतागून हार्डी यांनीं कादंबरीलेखनाचा संन्यासच घेतला.

परंतु हार्डी यांचा साहित्यिक गुण त्यांना स्वस्थ बसूं देईना. कादंबरीच्या क्षेत्राकडून काव्याच्या प्रांताकडे त्यांनीं मोहरा वळविला आणि कवि म्हणूनहि मोठाच लौकिक मिळविला. शेकडों लहान लहान भावगीतें आणि Dynasts हे प्रचंड महानाटक यांवर हार्डी यांचा काव्यविषयक लौकिक आधारलेला आहे.

हार्डी यांनी कधीही कॉलेजांत प्रवेश केला नव्हता; तथापि लेखनक्षेत्रात यश मिळविल्यानंतर विश्वविद्यालयाच्या सन्माननीय पदव्या आपण होऊन त्यांच्याकडे चालत आल्या. "Order of Merit" या अत्यंत दुर्लभ पदवीचा सन्मान त्यांना १९१० सालीं प्राप्त झाला. असे अनेक मानसन्मान प्राप्त होऊनहि हार्डी हे अखेरपर्यंत अत्यंत साधेपणानें रहात. त्यांनीं खेड्यापाड्यांतील शेतकरी, धनगर वगैरे कष्टाळू लोकाचे जीवन रंगविलें तें केवळ शहरात राहून कल्पनेनें नव्हे. ते स्वतः खेड्यात राहून, तेथील साध्याभोळ्या, अशिक्षित लोकाच्या सुखदुःखाशीं समरस होत. खेड्यातल्या पानगृहात आपल्या बरोबर एखादा ग्लास घेणारा, पाईप ओढणारा 'टॉम हार्डी' हा एक जगप्रसिद्ध लेखक आहे असे त्या खेडवळ लोकाना कळतहि नसे. म्हातारपणींहि सायकलीवर टांग टाकून ते चपळाईने मजला मारीत. इ. स. १९२८ सालीं दीर्घायुष्य भोगून, साहित्याच्या प्रदेशात उच्च मानसन्मान प्राप्त करून, कृतकृत्य अवस्थेत हार्डी यानीं देह ठेविला.

त्याच्या वेसेक्स परगण्याच्या पार्श्वभूमीवरील प्रादेशिक जानपद कथा आणि कादंबऱ्या हीं इंग्रजी साहित्याची विभूषणे आहेत. अशाच एका कादंबरीचा संक्षिप्त आणि सुबोध अनुवाद आम्हीं मराठी वाचकापुढे ठेवीत आहोत. तो वाचल्यावर हार्डींची मूळ विस्तृत कादंबरी आणि त्याच्या इतर अनेक कादंबऱ्या यांचा आस्वाद घेण्याची इच्छा रसिकाच्या मनात जागृत झाली तर आपल्या श्रमांचें चीज झालें असें प्रस्तुत लेखकाला वाटेल.

## टॉमस हार्डी यांची ग्रंथसंपत्ति

### मनुष्यस्वभाव आणि प्रादेशिक वैशिष्ट्यें यांवर आधारलेल्या कथा.

(1) Under the Greenwood Tree—1872.
(2) Far from the Madding Crowd—1874.
(3) The Return of the Native—1878.
(4) The Mayor of Casterbridge 1886
(5) The Woodlanders 1887.
(6) Wessex Tales 1888.
(7) Tess of D' Urbervilles 1891,
(8) Life's Little Ironies 1894.
(9) Jude the Obscure 1898.

### कल्पनारम्य व सौंदर्यवादी कथा

(I) A Pair of Blue Eyes 1873.
(2) The Trumpet Major 1880.
(3) Two on a Tower 1882.
(4) A Group of Noble. Dames 1896.
(5) The Well-beloved 1897.

### चमत्कृतिपूर्ण कथा

(1) Desperate Remedies 1871.
(2) The Hand of Ethelberta 1876.
(3) The Laodicean–1881.

## Far from the Madding Crowd

## या कादंबरीचें संविधानक

वेसेक्स् परगण्यांतील एका डोंगरपठारावर गॅब्रिएल ओक नांवाचा एक तरुण धनगर रहात असे. योगायोगानें तेथें आलेल्या बाथशीबा एव्हरडीन या तरुण सुंदर मुलीशीं त्याचा परिचय झाला. एके रात्रीं दारें खिडक्या बंद करून, शेकोटी पेटवून झोंपल्यानें गॅब्रिएल हा बेशुद्ध होऊन मृत्युपंथालाच लागला होता. त्या स्थितींतून बाथशीबाने त्याची सुटका केली. तथापि त्याची लग्नाची मागणी मात्र बाथशीबानें स्वीकारली नाहीं. ती हा प्रदेश सोडून निघून गेली आणि इकडे एक अपघात होऊन गॅब्रिएलच्या बहुतेक मेंढ्या ठार झाल्या. त्याला मजुरी करण्यासाठीं बाहेर पडावें लागलें

अशा स्थितींत तो वेदरबरी या खेड्यांत आला असतां रात्रीं त्याला गवताच्या गंजीला आग लागलेली दिसली. त्याच्या आटोकाट प्रयत्नांमुळें तेथील धान्य आणि घर याचा बचाव झाला. या मालमत्तेची मालकीण बाथशीबाच आहे असें गॅब्रिएलला कळून आलें. जिचा पति व्हावयाची इच्छा, तिचाच नोकर म्हणून गॅब्रिएल काम करूं लागला. बाथशीबाच्या शेतीवाडीजवळ बोल्डवुड नावाचा एक मध्यम वयस्क, तिरसट स्वभावाचा श्रीमंत मनुष्य रहात असे. व्हॅलेंटाइनच्या सणाच्या दिवशीं खेडयांत एकमेकांना थट्टेत निनांवीं प्रेमपत्रें पाठविण्याचा प्रघात असे. केवळ गम्मत म्हणून बाथशीबानें असें एक निनांवीं कविताबद्ध प्रेमपत्र बोल्डवुड याला पाठविलें. परंतु ते खरेंच समजून बोल्डवुड हा बाथशीबाला आपल्याशीं लग्न करण्याची सारखी गळ घालू लागला. गॅब्रिएल हा बाथशीबाच्या गळ्यांतील ताईत बनला खरा, पण तो एक विश्वासू नोकर म्हणूनच. अखेर बोल्डवुडच्या चिकाटीमुळें बाथशीबानें काहीं अटींवर अमुक काळानंतर त्याच्याशीं लग्न करण्याचें त्याला वचन दिलें परन्तु त्यानंतर थोडयाच काळात तिचें मन दुसरीकडेच गुंतलें.

सार्जेंट ट्रॉय नावाचा एक रंगेल, चंचल परन्तु आकर्षक उमदा तरुण बाथशीबाच्या दृष्टिपथांत आला. वेदरबरी येथील फॅनी रॉबिन नावाची एक भोळसर तरुणी याच ट्रॉयवर भाळून, खेड्यांतून पळून गेली होती. तिच्याशीं लग्न करण्याचें ट्रॉयने वचन दिलें होते. परन्तु लग्नाचे वेळीं ती हजर राहूं न शकल्यानें आपण वचनमुक्त झालों आहोंत असें समजून तो तिच्याकडे पुढें दुर्लक्ष करूं लागला होता, या मनुष्यानें बाथशीबाभोंवतीं आपलें जाळे पसरण्यास सुरवात केली. गॅब्रिएल आणि बोल्डवुड यानी अनेकदा धोक्याचा इशारा देऊनहि बाथशीबाचें ट्रॉयविषयींचें आकर्षण कमी होईना. एके दिवशीं ट्रॉयनें आपलें समशेर फिरविण्याचे कौशल्य दाखवून बाथशीबाला केवळ मंत्रमुग्ध करून सोडलें. यानतर बाथशीबा बाथ या शहरात कांहीं दिवस राहिली आणि ती वेदरबरी येथे परत आली ती सौ. ट्रॉय होऊनच !

यानंतर एके दिवशी ट्रॉय हा सर्व कामकऱ्यांबरोबर दारूनें तर्र झाला असतां एक मोठें वादळ झालें. धान्याच्या साऱ्या उडव्या या वादळांत नष्ट व्हावयाच्याच. परन्तु गॅब्रिएलच्या कार्यक्षमतेमुळेंच बाथशीबाचें होणारें मोठें नुकसान टळले. हळूहळूं ट्रॉयचा बेभरंवशाचा स्वभाव बाथशीबाला कळून येऊ लागला. ट्रॉयनें जिला दगा दिला ती बिचारी फॅनी रॉबिन खरडत खरडत भटकत असता अखेर कॅस्टरब्रिज येथें अनाथ गृहांत प्रसूत होऊन मृत्यू पावली आणि उत्तरक्रियेसाठीं तिचें प्रेत वेदरबरी येथें आणण्यांत आले. तिच्या मृत्यूनंतर बाथशीबा हिला ट्रॉय आणि फॅनी यांच्या प्रेमसंबंधाची संपूर्ण माहिती कळली. आपण जिवंत असूनहि आपल्यापेक्षां मृत फॅनीचीच मातब्बरी ट्रॉय याला अधिक वाटते हेंहि तिला दिसून आलें. नाहीतरी ट्रॉय हा बाथशीबाला कंटाळला होताच, तो तिला सोडून निघून गेला. पुढें तो बुडून मेला अशी बातमी वेदरबरी येथें येऊन पोंचली.

वरील बातमीनंतर बोल्डवुड यानें बाथशीबाचा पुनः पाठपुरावा सुरू केला. पश्चात्तप्त मनःस्थितींत बाथशीबानें त्याला कांहीं अटींवर लग्नाचें वचन दिलें. त्या आशेवर बोल्डवुड मोठ्या खुषींत होता. त्यानें नाताळची मोठी पार्टी दिली आणि त्या प्रसंगीं बाथशीबालाहि निमंत्रण दिलें. या बोल्डवुडच्या आनंदाच्या सर्वोच्च क्षणीं सार्जेंट ट्रॉय अचानक तेथें येऊन दाखल झाला.

अशा रीतीनें अगदी तोंडाला लागत असलेला सुखाचा पेला निसटून पडलेला पाहून बोल्डवुड निराशेनें आणि क्रोधानें बेभान झाला आणि गोळी झाडून त्यानें सार्जंट ट्रॉयचा खून केला. याबद्दल त्याला जन्मठेपेची शिक्षा झाली.

अशा रीतीनें आपल्या सौंदर्यामुळें झालेले अनेक अनर्थ पाहून बाथशीबा आता बरीच गंभीर आणि स्थिरचित्त अशी झाली होती. अगदीं पहिल्या भेटीपासून आपल्यावर प्रेमाचें आणि सेवेचे छत्र धरणाऱ्या गॅब्रिएल ओककडे अखेर तिची नजर वळली आणि त्याच्या एकनिष्ठ प्रेमाची तिला किंमत कळली. गॅब्रिएल आणि बाथशीबा यांचें लग्न अगदीं साधेपणानें झालें. त्याच्या शेतीवाडीवरील साध्याभोळ्या शेतकऱ्यांनीं आपल्या खेडवळ पद्धतीनें त्यांचे अभिनंदन केलें.

अशा रीतीनें गॅब्रिएल याच्या एकनिष्ठ प्रेमाची ही जानपद कथा अखेर आनंदपर्यवसायी झाली.



Far from the Madding Crowd

## या कादंबरींतील महत्त्वाचीं पात्रें

( १ ) **बाथशीबा एव्हरडीनः**—एक सुंदर, तरुण, परन्तु जरा चचल वृत्तीची तरुणी. हिच्यावर गॅब्रिएल याचें एकनिष्ठ प्रेम होतें.

( २ ) **फॅनी रॉबिनः**— वेदरबरी या खेड्यांतील एक साधीभोळी, निष्पाप बालिका. सार्जंट ट्रॉय याच्या मोहजालांत सांपडून ती घरून पळून जाते. अखेर तिचा शोचनीय रीतीनें अंत होतो.

( ३ ) **मिसेस् हर्स्टः**—बाथशीबा हिची आत्याबाई.

( ४ ) **गॅब्रिएल ओकः**—एक तरुण, निष्ठावंत आणि कामसू धनगर. बाथशीबावर याचें निस्सीम प्रेम असून तो अनेक संकटांतून तिच्या मालमत्तेचा बचाव करून, सेवक म्हणूनहि वावरत असतो.

( ५ ) **बोल्डवुडः**—बाथशीबा हिच्या शेतीवाडीजवळच रहाणारा एक श्रीमंत परंतु तऱ्हेवाईक, तिरसट स्वभावाचा जमीनदार. 'बाथशीबाशीच लग्न करीन' या हिरीरीनें तिचा पाठपुरावा करून अखेर आड आलेल्या ट्रॉयचा हा खून करतो. त्याला कैदेची शिक्षा होते.

( ६ ) **सार्जंट ट्रॉयः**—एक देखणा, तलवारबाज शिपाईगडी. याची नीतिमत्ता ढिली असून तो रंगेल आणि स्वैर वृत्तीचा आहे.

(७) जेकब स्मॉलबरी
(८) जोसेफ पुअरग्रास
(९) मॅथ्यू मून
(१०) मार्क क्लार्क
(११) जॉन कोगन

} बाथशीबाच्या शेतीवाडीवरील कामगार

(१२) लिडी
(१३) मेरी ॲन

} बाथशीबाच्या घरांतील नोकर स्त्रिया.



## १. " दृष्टिक्षेपच आजला --! "



सान ओक हसूं लागला कीं त्याच्या जिवणीचे कोपरे अितके विस्तारत कीं ते जवळ जवळ त्याच्या कानांपर्यंत पोंचत. त्याच्या डोळ्यांच्या तर नुसत्या फटी रहात. एकाद्या नवाशिक्यानें रेखाटलेल्या उगवत्या सूर्याच्या चित्रात जशा किरणांच्या रेषा दिसतात तशा रेषा त्याच्या डोळ्यांभोंवतीं पसरत.

त्याचें पाळण्यांतलें नांव गॅब्रिएल होतें. रोजचे व्यवहार करीत असतां तो चारचौघांसारखा सुशील, मनमोकळा, व्यवस्थित पोषाख करणारा तरुण दिसे. रविवारीं मात्र ठेवणींतले कपडे घालून, छत्री घेऊन तो वावरूं लागला म्हणजे तो अवघडल्यासारखा दिसे. एका टोंकाला अगदीं सनातनी धार्मिक, आणि दुसऱ्या टोंकाला बेछूट आणि दारुडे यांच्यामध्यें कुठेतरी त्याची भूमिका असे. तो देवळांत जाई खरा, पण श्रोते धर्मतत्त्वांच्या उच्चारापर्यंत येऊन पोंचले म्हणजे तो लपून छपून जांभया देऊं लागे. बाह्यतः तो प्रवचन ऐकत असल्यासारखा दिसत असला तरी त्याच्या मनांत मात्र "आज जेवायला काय असेल " याचेच विचार चाललेले असत. लोकमताच्या दृष्टीनें बोलायचें म्हणजे, लोक रागांत असले म्हणजें त्याला 'वाईट' म्हणत, खुशींत असले म्हणजे त्याला 'बरा' म्हणत. या दोन्ही अवस्थांत नसले म्हणजे त्याचें चारित्र्य गंगाजमनी स्वरूपाचें समजलें जाई.

वाऱ्यानें उडून जाऊं नये म्हणून दाबून बसविलेली डोक्यावरील फेल्टहॅट आणि डॉ. जॉन्सन् घालीत असे तसा घोळदार डगला हा त्याचा वेष असे. त्याच्या पायांत पाण्याला दाद न देणारे जाडजूड बूट असून त्यांवर गुडघ्यापर्यंत येणारे चामड्याचे लेगिंग् ( जंघारक्षक ) असत. ओकच्या खिशांतलें घड्याळ एवढें अवजड होतें कीं त्याला छोटेसें भिंतीवरचें घड्याळ म्हटलें तरी

शोभेल. ते त्याच्या आजोबांपेक्षांहि म्हातारें होतें. त्यामुळें एक तर तें खूप जलदपणें तरी चाले नाहींतर बंद तरी पडे. मग त्याला गदगदा हलवून, किंवा, त्याच्या पाठींत गुद्दे चढवून पुन्हां चालूं करावें लागे. घड्याळाचा तासाचा कांटा मधूनच निसटून खालीं येई. त्यामुळें मिनिटें बिनचूक कळलीं तरी वाजले किती याचा मात्र पत्ता लागत नसे. घड्याळ ठेवण्याचा पाटलोणीचा कसा ओकच्या जाकिटाखालीं झांकलेला असल्यानें त्याला घड्याळ बाहेर काढायचें असलें म्हणजे सारें अंग एकीकडे वांकवावें लागे, कष्टामुळें त्याच्या तोंडाचा अगदीं कानवला होई, तेव्हां कोठें विहिरींतून पोहरा बाहेर ओढून काढावा तसें तें घड्याळ त्याला खिशांतून बाहेर काढतां येई!

--डिसेंबर महिन्याच्या एका प्रसन्न प्रातःकाळीं मात्र शेतांतून चाललेला हा ओक निराळाच दिसत होता. तारुण्यांत पदार्पण करूनहि त्याच्या चेहऱ्यावर अजून पोरवयाची कोंवळीक दिसत होती. उंची व रुंदी भरपूर असल्यामुळें तो चांगला रुबाबदार दिसायला हवा होता. पण कांहीं लोक विनयानें असे अंग चोरून वागतात कीं ते आहेत त्यापेक्षां लहानच वाटतात. ओकहि असाच, एखाद्या कुमारिकेसारखा लाजाळू असून, संकोचानें जरा वांकून चालत असे.

तो आतां तारुण्याच्या ऐन भरांत असून अविवाहित होता. बुद्धि आणि भावना यांची त्याच्या व्यक्तिमत्वांत पूर्णपणें फारकत झाली होती. हें खऱ्या प्रौढत्वाचें लक्षणच म्हणतां येईल.

ओक उभा असलेल्या शेतासमोरील टेंकडीच्या सुळक्यावरून हमरस्ता खाला पायथ्याकडे गेला होता. कुंपणावरून नजर टाकून त्यानें सहज खालीं पाहिलें तेव्हां दोन घोड्यांची, पिवळ्या रंगाची एक सजविलेली गाडी उतारावरून जात असतांना त्याला दिसली. हातांत चाबूक घेऊन गाडीवाला पायींच चालला होता. घरगुती सामान आणि फुलझाडांच्या कुंड्या यांनीं ती गाडी भरून गेली होती. सामानाच्या ढिगाऱ्यावर एक सुंदर तरुण स्त्री बसली होती. ओक तिकडे पहात असतां ती गाडी खालच्या रस्त्यावर थांबली. गाडीवाला म्हणाला, " ताईसाब, गाडीचा मागचा पाट पडला जनू. "

' ती तरुणी म्हणाली, " वर येताना कांहींतरी पडल्यासारखा आवाज आला खरा. " तिचा स्वर फार खालचा नसला तरी मृदु होता.

" आतां पळत जाऊन घेऊन येतों " असें म्हणून गाडीवाला मागें वळला.

टेबलें, खुर्च्या, कुंड्या यांच्या ढिगाऱ्यावर ती तरुणी बसून राहिली. तिच्या सामानांत पक्ष्याचा एक पिंजरा होता आणि एका टोपलींत एक मांजरहि बसलें होतें. अर्धवट उघडलेल्या झांकणांतून तें भोंवतालच्या चिमण्यापांखरांकडे अर्धवट मिटलेल्या डोळ्यांनीं मोठ्या प्रेमानें पहात होतें ! कांहीं वेळ ती तरुणी आळसावून आपल्या जागींच बसून राहिली. मग तिनें कागदांत गुंडाळलेल्या एका लांबट पुडक्याकडे जरा लक्ष देऊन पाहिलें. गाडीवाला अजून नजरेच्या टप्प्यांत आला नव्हता. थोडा विचार करून तिनें पुडकें उघडून त्यांत असलेल्या आरशाकडे नजर वळविली. आपले ओंठ जरा विलग करून तिनें स्मित केलें. निरभ्र प्रातःकालच्या सूर्यकिरणांत तिनें परिधान केलेलें लाल भडक जाकीट फार उठून दिसत होतें. तिचा तेजस्वी चेहरा आणि काळेभोर कैंस यांवर तेजाची मृदु छटा पसरली होती. तिच्या भोंवतालचीं फुलझाडेंहि हिरवींगार आणि टवटवीत दिसत होतीं; त्यांच्या योगानें ती गाडी, तें सामान, ती तरुणी या साऱ्यांनाच वसंताचा आकर्षकपणा प्राप्त झाला होता. प्रथम ती आरशांत बघून हट्टानेंच हसली असेल, पण अखेर ती खरेंच हंसली, लाजली, आणि आपलें लाजरें प्रतिबिंब पाहून पुन्हां लाजली. तिच्या भोंवतालचे पक्षी, आणि तिच्या दृष्टीआड असलेला ओक यांनाच हें दृश्य दिसत होतें. चार भिंतींआड करावयाचें हें सौंदर्यप्रसाधन अगदीं उघड्यावर केल्यानें त्या साध्या कृतीलाहि एक नाविन्य प्राप्त झालें होतें. त्या कृतीकडे उदार मनानें पहाण्याची इच्छा असूनहि ओकच्या मनांत एक जरा कुत्सित विचार आल्यावाचून राहिला नाहीं तसें म्हटलें तर आरशांत पहाण्याची तिला कांहीं एक जरुरी नव्हती. तिनें आपली हॅट सांवरली नाहीं, कपडे किंवा कैंस चापून चोपून नीट केले नाहींत. निसर्गदत्त सौंदर्याचा एक नमुना म्हणूनच ती आपल्या प्रतिबिंबाकडे पहात होती. भविष्यकाळांत पुरुषाच्या हृदयावर विजय मिळविण्याचीं, प्रेमाच्या साफल्याचीं आणि वैफल्याचीं अंधुक स्वप्नें

तिच्या स्मितातून सूचित होत होतीं. पण तिच्या त्या सहजपणें केलेल्या कृतींवर आधारलेला हा एक केवळ तर्क होता. तिच्या कृती हेतुपूर्वक होत्या असें म्हणणें धाडसाचेंच ठरलें असतें.

गाडीवाल्याच्या पावलांचा आवाज ऐकल्यावर तिनें तो आरसा पूर्वीप्रमाणें झाकून ठेवला. ती गाडी पुढें निघून गेल्यावर ओक आपली टेहळणीची जागा सोडून खालच्या रस्त्यावर उतरला आणि पायथ्याशीं असलेल्या टोल नाक्याकडे निघाला. ती गाडीहि नाक्याशींच कर देण्यासाठीं थांबली होती. ओक तेथून दहा वीस पावलांवर असेल तोंच त्याला तेथें चाललेले, गाडीवाला आणि नाकेवाला यांचेमधील भांडण ऐकूं आलें.

गाडीवाला म्हणाला, " बाईसाहेबांची पुतनी बसलीय् नव्हं का सामानावर ! ती म्हनतेय् , दिलं एवढंच दाम म्होप झालं, आतां छदाम न्हाई देनार आणखी."

नाकेवाला फाटक लावून घेत म्हणाला, " ठीक आहे मग तुझ्या बाईसाहेबांच्या पुतणीला या फाटकातून जातां येणार नाहीं."

दोन पेन्ससारख्या क्षुल्लक रकमेसाठीं भांडणाऱ्या या व्यक्तीकडे पाहून ओकनें पुढें जाऊन नाकेवाल्याच्या हातावर तीन पेन्स ठेवले. तो म्हणाला, " हं हे घे, आणि या मुलीला जाऊं दे. " त्यानें तिच्याकडे पाहिलें आणि त्याचे शब्द ऐकून तिनेंहि खालीं त्याच्याकडे पाहिलें.

ओकचा चेहरा चार चौघांसारखाच होता. तो देखणा नव्हता आणि कुरूपहि नव्हता त्या तरुणीलाहि तसेंच वाटलें असावें कारण त्याच्याकडे एक बेफिकीर नजर टाकून तिनें गाडीवाल्याला पुढें चलण्यास सांगितलें. तिनें थोडी आभारदर्शक मुद्रा केली असेल पण आभाराचे शब्द मात्र काढले नाहींत. बहुधा तिला तशी जरूरहि वाटली नसावी; कारण ओकच्या कृतीनें तिला वाट मिळाली पण वादाच्या मुद्द्यांत मात्र हार खावी लागली. स्त्रियांना असला उपकार कितपत रुचतो हें सर्वांना माहीत आहेच.

त्या पाठमोऱ्या गाडीकडे पाहून नाकेवाला म्हणाला, " पोरगी कशी नक्षत्रासारखी आहे ! "

ओक उत्तरला, " आहे खरी, पण तिच्यांत कांहीं दोष आहेतच. त्यांतला मुख्य दोष म्हणजे बायकांचा नेहमींचाच—"

—" म्हणजे हुज्जत घालण्याचाच कीं नाहीं ?" नाकेवाल्यानें विचारलें.

—" छे !"

—" मग कोणता ?"

त्या सुंदर प्रवासिनीच्या बेफिकीरीनें ओक थोडा चिडला असावा. कारण जेथें ती आरशांत आपला चेहरा पहात होती त्या जागेकडे पाहून तो म्हणाला,—

—" ऐट !"



## २. "कुणि अलगुज वाजवि अंधारीं"



सान ओक आपल्या शेतावरील एका छोट्या झोंपडींत रहात असे. ही झोंपडी होडीच्या आकाराची असून तिला चाकें असल्यानें तिचें जोतें जमिनीपासून हातभर उंचीवर होतें. मेंढ्या विण्याचा हंगाम सुरू असला म्हणजे धनगर रात्रीं आसरा घेण्यासाटीं अशा झोंपड्या ओढून शेतांत नेऊन ठेवीत. एका रात्रीं अशाच एका झोंपडींत बसून ओक आपली बांसरी वाजवीत होता.

ओकला अलीकडेच लोक किसान ( पाटील ) म्हणूं लागले होते. गेल्या वर्षांतली सतत मेहनत आणि आनंदी वृत्ति यांच्या जोरावर त्यानें मेंढ्याचें एक वावर स्वतंत्रपणे वहिवाटीस घेतलें होतें आणि त्यांत दोनशें मेंढ्या बसविल्या होत्या. यापूर्वी वडिलांच्या मृत्यूपर्यंत त्यानें मेंढ्यांचे मोठमोठे कळप सांभाळण्याच्या कामांत त्यांना मदत केली होती. आतां तो नोकर नव्हे तर ( उधारीनें मेंढ्या घेऊन कां होईना ) स्वतंत्र धनगर आणि शेतकरी म्हणून वावरूं लागला होता. हा त्याच्या जीवनांतील फार महत्त्वाचा काळ होता.

या नव्या कार्यक्षेत्रांतील पहिली कामगिरी म्हणजे मेंढ्यांची वीण सांभाळणें. लहानपणासून या कामाचा त्याला अनुभव असल्यानें त्यानें हें काम कोणाहि नोकरावर सोपविलें नाहीं. मध्यरात्रींचा वारा ओकच्या झोंपडीला झोडपून काढीत होता. आंतले बांसरीचे स्वर थांबले आणि झोंपडीच्या एका बाजूला प्रकाशाचा एक चौकोन दिसूं लागला. त्यांत किसान ओकची आकृति दिसत होती. हातांत कंदील घेऊन सुमारें अर्धा तास तो शेताच्या कोपऱ्यांत इकडे तिकडे फिरून शांतपणें आपलें काम उरकीत होता.

गवतानें शाकारलेल्या लाकडी चौकटी जमिनींत रोवून आपल्या मेंढ्यासाठीं त्यानें निवारा तयार केला होता. तेथें त्याच्या गरीब पांढुरक्या मेंढ्याची हालचाल सुरू होती. तो शेतांत आल्यावर, दाट लोंकरी-मुळें अस्पष्ट वाटणारा मेंढ्याचा घंटानाद पुनः सुरूं झाला. ओक कळपांतून बाहेर जाईपर्यंत हा नाद सुरू होता.

नुकतेंच जन्मलेलें एक कोंकरूं उचलून घेऊन ओक आपल्या झोंपडींत परत आला. त्या कोंकराचे पाय एकाद्या मेंढीच्या पायाइतके लांबलचक असून त्याचे बाकीचे अंग मात्र या पायाच्या अर्ध्या भागाएवढें असेल नसेल. ओकनें हा इवलासा जीव शेकोटीजवळ, गवताच्या एका पुंजक्या-वर ठेवला. झोपडीच्या अर्ध्या भागावर पोतीं अंथरलीं होतीं त्यावर ओक आडवा झाला आणि क्षणभरांत झोंपीं गेला.

झोपडींत एक मेणबत्ती जळत होती आणि शेकोटींतील निखाऱ्यांचा प्रसन्न लालसर प्रकाश तेथील भांडींकुंडीं आणि हत्यारें यांवर खेळत होता. एका कोंपऱ्यात धनगराची आंकडी होती आणि दुसऱ्या बाजूच्या कपाटांत मेंढ्याच्या औषधोपचारासाठीं जरूर असलेलीं औषधें डबे आणि बाटल्यांतून भरून ठेवलेलीं होतीं. त्यासमोरच्या त्रिकोणी कपाटांत खाण्यापिण्याचे पदार्थ ठेवले असून त्यांच्या जवळ ओकची बांसरी पडली होती. एखाद्या जहाजावरील खोलीला असतात तशा दोन गोल लांकडी खिडक्या छपरांत हवेसाठीं ठेवल्या असून त्यांना आतील अंगाच्या लांकडी झडपा होत्या.

शेकोटीच्या उबेनें तें कोंकरूं भानावर येऊन 'बें बें' करूं लागलें. या आवाजाची ओक वाटच पहात असल्यानें तो जसा चटकन्, झोंपी गेला होता तसाच तो चटकन् जागाहि झाला. त्यानें तें कोंकरूं उचलून बाहेर नेलें आणि त्याच्या आईजवळ ठेवलें. नेहमींप्रमाणें ओकच्या घड्याळाचा कांटा निसटला होता. पण आकाशांतल्या तारांकडे पाहून एक वाजला असावा असें त्यानें ओळखलें. जीवनांत कांहींतरी सौंदर्य आणि आकर्षकता ओढ

याची ओकला जाणीव असे. म्हणून एकाद्या सुंदर कलाकृतीकडे पहात रहावें तसा तो कांहीं वेळ वर पसरलेल्या आकाशाच्या सौंदर्याकडे पहात राहिला. भोंवतालच्या निःशब्द शांततेनें त्याच्या मनाचा ठाव घेतला होता. पृथ्वीच्या अंधारलेल्या प्रचंड गोलार्धावरून सारे मानवी प्राणी त्यांच्या सुखदुःखांसह एकदम नाहींसे होऊन, आपण तेवढे एकटेच उरलों आहोंत असें त्याला थोडा वेळ वाटूं लागलें.

या मनःस्थितींत तो उभा असतां त्याच्या ध्यानांत आलें कीं झाडीमागें दिसणाऱ्या ज्या प्रकाशाला आपण एक तारा असें समजत होतों तो एक दिवा आहे. आतांपर्यंत निर्जन आणि निवांत वाटणाऱ्या प्रदेशांत कोणी अज्ञात शेजारीहि जवळ आहेत या जाणिवेनें तो बेचैन झाला. झाडीजवळ जाऊन, खालच्या फांद्या जरा दूर करून त्यानें या दृश्याकडे पाहिलें. त्याच्या पायाजवळच, उतरणीवर एक झोंपडी असून तिचें छप्पर जमिनीशीं जवळ जवळ समांतर झालें होतें. दर्शनी बाजूला डांबर लावलेल्या फळ्या ठोकलेल्या होत्या. त्यांतून येणाऱ्या प्रकाशानेंच ओकचें लक्ष वेधून घेतलें होतें. छपरावरील एका फटींतून ओकनें खालीं पाहिलें.

त्या झोंपडींत दोन गाई आणि दोन स्त्रिया होत्या. त्यांतील एक स्त्री मध्यम वयस्क असून दुसरी तरुण आणि डौलदार दिसत होती. ती ओकच्या थेट नजरेखालीं असल्यानें तिच्या चेहरेपट्टीबद्दल ओकला कांहींच अंदाज बांधतां येईना. त्यात तिनें डोक्यापासून पायापर्यंत एक झगा लपेटून घेतला होता. कमरेवर हात ठेवून ती प्रौढ स्त्री म्हणाली, “ चला, आतां घरीं जाऊं या आपण. काय घाबरून टाकलं होतं मला या गाईनं ! ती बरी झाली म्हणजे पावलं. माझी झोंपमोड झाल्याचं वाईट वाटणार नाहीं मला मग ! ”

ती तरुण स्त्री झोंपेनें अयर्दी पेंगुळली होती. एक जांभई देत ती म्हणाली, “ असलीं कामें करायला एकादा गडीच हवा. तो ठेवण्याइतपत आपली ऐपत असती तर किती बरं झालं असतं ! ”

—"पण आपण नाहीं असे तालेवार! आपलीं कामं आपणच केलीं पाहिजेत, तूं इथं राहिलीस तर तुलाहि कामाला हातभार लावावा लागेल."

ती तरुणी म्हणाली "ठीक आहे. अग आत्या! मघांशी एवढीशी झुळूक आली. पण तेवढ्यानं माझी हॅटच कुंपणापलीकडे उडूनी गेली!"

त्यांच्या समोरची एक गाय लाल भडक रंगांत बुडवून काढल्यासारखी दिसत असून, तिची पाठ अगदीं सपाट होती. दुसरी गाय भुरकट आणि पांढऱ्या रंगाची होती. तिच्याजवळ एक दिवसाचें एक वासरूं उभें असून तें कंदिलाकडे पुनः पुनः वळून वळून पहात होतें. एकूण कोंकरें काय, वासरें काय, त्या टेकडीवर सटवाईचा फेरा चांगलाच फळाला आल्यासारखा दिसत होता!

ती प्रौढ स्त्री म्हणाली, "कोंडाही संपला. थोडं सातूचं पीठ आणायला हवं गाईसाठीं."

तरुणीनें उत्तर दिलें, "उजाडलं म्हणजे घोड्यावरून जाऊन घेऊन येतें मी! मला घोड्यावर चांगलं बसायला येतं. बरं का!"

हे शब्द ऐकून तिचा चेहरा पहाण्याची ओकची उत्सुकता आणखी वाढली आणि तो आपल्या मनातच तिच्या चेहरेपट्टीबद्दल कल्पना करूं लागला. निसर्ग मधून मधून विचित्र असे योगायोग घडवून आणीत असतो अशा योगायोगानें त्याच वेळीं त्या तरुणीच्या डोक्यावरील पदर खालीं पडला आणि तिच्या काळ्याभोर केसांचे दोरखंडासारखे जाड पेड तिच्या लाल जाकिटावर पसरले. त्याच क्षणीं ओकच्या ध्यानांत आलें कीं, पिवळ्या गाडींत, झुडपांच्या गर्दींत बसून आरशांत पहाणारी, आणि व्यवहाराच्या दृष्टीनें बोलायचें म्हणजे त्याचे दोन पेन्स देणें लागणारी तरुणी ती हीच!



# ३. काळ आला होता पण !



तांबडे फुटल्यावर ओक पुनः त्या झाडीकडे गेला. तो तेथेंच रेंगाळत असतां तीच तरुणी एका पिंगट रंगाच्या घोड्यावर बसून टेकडी चढून येत आहे असें त्याला दिसलें. आपली हॅट हरवल्याबद्दलचे तिचे शब्द आठवून ओक समोरच्या वळींत शोध करूं लागला. थोड्याच अंतरावर ती हॅट त्याला पाचोळ्यांत पडलेली दिसली. हॅट उचलून तो पुनः त्या रस्त्यावर येऊन उभा राहिला.

कांहीं वेळानें दुधानें भरलेली एक बादली घेऊन गोठ्यांतून येत असलेली ती तरुणी ओकला दिसली. तोल सांवरण्यासाठीं तिनें आपला डावा हात ताठ केला होता. ओकची कल्पना होती त्यापेक्षां त्याला ती लहानच वाटली. तिची उंची स्त्रियांच्या दृष्टीनें अगदीं माफक होती. चेहेरेपट्टी प्रमाणबद्ध आणि रेखीव होती. मान, खांदे, वगैरे तिच्या शरीराचे भागहि डौलदार असले पाहिजेत असा तिच्या एकंदर आकारमानावरून तर्क करतां येई. तशी ती फार लाजरी नव्हती, परन्तु शहरांतल्या मुलींच्या मानानें आपलें अंग दाखविण्यापेक्षा तें झाकून घेण्याचीच तिची अधिक प्रवृत्ति असे.

पुरुषांच्या रोखलेल्या नजरा खेड्यांतील मुलींना आपल्या चेहेऱ्याला अगदीं बोचल्यागत वाटत असतात. ओकची नजर तिला तशीच वाटून तिनें आपल्या तोंडावरून हात फिरविला. पहिली मोकळी हालचाल टाकून ती जरा मर्यादेनें वागूं लागली. तरी ती लाजली नव्हती; लाजला होता तोच.

—ओक म्हणाला, " मला एक हॅट सांपडली आहे. "

मर्यादेनें आपलें हंसूं दाबीत ती म्हणाली, " माझीच हॅट आहे ती. काल रात्रींच ती उडून गेली."

" पहांटे एक वाजतां कां ?"

ती जरा दचकून म्हणाली, " हो तेव्हांच ! पण तुम्हांला कसं कळलं हें ?"

" मी इथेंच होतों तेव्हां " ओक उत्तरला.

—" तुम्हीच ओक पाटील नाहीं कां ?

" होय, अलीकडेच मी इथें रहायला आलों आहे ?

भोंवतालीं नजर टाकीत ती म्हणाली, " तुमची शेतीवाडी बरीच मोठी असेल नाहीं ?" तिनें मान वळविली तेव्हां तिच्या कुरळ्या बटांचा खोलगट भाग काळाभोर दिसत होता आणि केंसांच्या उन्नत लाटावर सकाळच्या सूर्यकिरणांमुळें सोनेरी छटा चमकत होती.

—ओक म्हणाला, " छे ! मोठी कसली ! असेल सुमारें शंभर'ची " ( शेताबद्दल बोलताना स्थानिक लोक ' एकर हा शब्द गाळून टाकीत असत. )

ती मुलगी म्हणाली, " खरं तर ही हॅट मला सकाळींच हवी होती. मला गिरणींत जायचं होतं पीठ आणायला "

—" होतं खरंच "

—" तुम्हाला कसं कळलं तें "

" मी पाहिलं की तुम्हाला "

—एकदम दचकून ती म्हणाली, " कुठें ? "

" त्या झाडींतून. टेकडी उतरून जातांना " सारें कांहीं माहीत असल्यासारखी मिस्किल मुद्रा करून ओक म्हणाला.

—त्याचें असें झालें. ती घोड्यावरून जात असतां एके जागीं झाडाच्या फांद्या अगदीं खालीं आलेल्या तिला दिसल्या. त्या चुकविण्यासाठीं, जवळपास कोणी नाहीं असें पाहून ती अगदीं चपळाईनें मागच्या मागें रेलून घोड्याच्या पाठीवर उताणी झाली होती. आपली ही जरा मर्यादाशून्य कृति ओकनें पाहिली या जाणीवेनें लाजून ती अगदीं लालबुंद झाली. ओकनेंहि संकोचानें आपली नजर दुसरीकडे वळविली. जरा वेळानें तो समोर पहातो तों ती केव्हांच पळून गेली होती !

त्यानंतर पांच दिवस ती रोज गोठ्यांत दूध काढण्यास येई. परन्तु तिनें ओकच्या दिशेकडे पाहिलेंहि नाहीं. त्या आठवड्याच्या अखेरीस एक घटना घडली नसती तर कदाचित् या दोघांची ओळख हळूं हळूं बुजूनहि गेली असती.

एका संध्याकाळीं इतकी थंडी पडली कीं पाणी गोठूं लागलें. झोंपडींत झोंपलेल्या मनुष्याचा श्वासहि गोठून पांघरुणाला चिकटूं लागला. त्या रात्रीं ओकनें झोंपडींतल्या शेकोटीवर आणखी जळण टाकलें. दाराखालून वारा येऊं नये म्हणून तेथेंहि एक पोतें अंथरलें. छपरांतील दोन झडपांतून गार वाऱ्याचा झोत आंत येत होता. दार लावून शेकोटी पेटविली असली तर झडपा उघड्या ठेविल्या पाहिजेत एवढें ओकला माहीत होतें. वाऱ्याच्या बाजूची झडप बंद करून, दुसरी झडप उघडण्यासाठीं तो वळला. जरा ऊब येईपर्यंत दोन्हीहि झडपा बंद ठेवाव्या असा विचार करून तो थोडा वेळ खालीं टेकला. जाग्रणामुळें कीं काय कधीं नव्हे असें त्याचें डोकें दुखूं लागलें होतें. आतां उठून झडप उघडावी आणि मग झोंपीं जावें असें त्यानें ठरविलें पण ती झडप उघडण्याआधींच त्याला झोप लागली......

......आपण किती वेळ बेशुद्ध होतों हें ओकला कळलें नाहीं. तो भानावर आला तेव्हां त्याचा कुत्रा ओरडत होता. ओकचें डोकें भयंकर दुखत होतें आणि कोणीतरी त्याचा गळपट्टा सैल करीत होतें.

डोळे उघडल्यावर वर पहातो तों त्याला दिसलें कीं एक मुलगी त्याच्या जवळ बसली होती. तिचे दांत पांढरे शुभ्र असून ओंठाची ठेवण फार सुंदर होती. आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्याचें डोकें तिच्याच मांडीवर होतें. त्याचा चेहरा आणि मान हे भाग भिजून चिंब झाले होते.

ओक गोंधळून म्हणाला, " काय झालं ?"

त्या मुलीला थोडी गम्मत वाटली. ती म्हणाली, " तुमचा जीव गेला नाहीं त्या अर्थी आतां विशेष कांहींच झालं नाहीं म्हणायचं. अशा झोंपडींत तुम्ही श्वास कोंडून मेलां नाहीं हेंच आश्चर्य ! "

" बरोबर आहे ! या झोंपडीला मी दहा पौंड दिले. मागंहि एकदां हिनं मला असाच दगा दिला होता. आतां ही झोंपडी विकून टाकून मी एकाद्या छपराखालीं बसतो आणि गवताच्या पेंढ्यावर निजतों म्हणजे झालं ! "

—ती म्हणाली, " अहो ! झोंपडीचा हा दोष नव्हे. तुम्हीच अविचारान दोन्हीही झडपा बंद करायला नको होत्या. "

" खरं आहे " ओक म्हणाला. पण त्याचें लक्ष दुसरीकडे होतें. तिच्या मांडीवर डोकें ठेवून पडलें असतां आपल्याला कसें वाटतें हें नीटपणें ध्यानांत घेऊन, आपल्या भावना व्यक्त करण्याचा तो प्रयत्न करीत होता. पण त्या तरल भावना शब्दांच्या ओबडधोबड जाळ्यांत पकडणें त्याला शक्य न झाल्यानें तो मूकच राहिला.

त्या मुलीनें ओकला उठवून बसविलें. तो कृतज्ञतेनें म्हणाला, " तुमचे आभार मी कसे मानूं !"

ती हंसत म्हणाली, " जाऊं द्या हो ! त्यांत काय विशेष आहे ? "

—" पण तुम्ही मला शोधून तरी कसें काढलंत ? " ओकनें विचारलें.

--" मी दूध काढण्यासाठीं चाललें होतें तेव्हां तुमचा कुत्रा ओरडत होता आणि दारावर नखांनीं ओरबाडत होता. माझ्याजवळ येऊन त्यानें माझा झगा दातांत धरून ओढला. मी दार उघडलं तर तुम्हीं अगदीं मेल्यासारखे पडलां होतां. जवळ पाणी नव्हतं म्हणून मी दूधच ओतलं तुमच्या तोंडावर ! "

ओक कृतज्ञतेनें म्हणाला, " तुमचं नांव मला ठाऊक नाहीं पण तुम्ही माझे प्राण वांचविले हें खास. माझं नांव गॅब्रिएल ओक. तुमचं !"

ती म्हणाली, " माझं नांव सांगावसं वाटतच नाहीं मला. तें ऐकायला जरा चमत्कारिक आहे. शिवाय तुमचा माझा फारसा संबंध कधीं येणारच नाहीं. इकडील गोठयांतल्या गाईचं दूध आटतच आलं आहे. तेव्हां पुढल्या आठवड्यानंतर या बाजूला मी येणारहि नाहीं,"

ओक म्हणाला, " तुमचं नांव कसंहि असलं तरी तुम्हाला लवकरच एखादं नवं नांव मिळूं शकेल कीं ! हें पहा, माझ्या मनांत पुष्कळ आहे, पण मला तुमच्यासारखं चटकन् ओठावर आणतां येत नाहीं तें. पण मी तुमचे आभार मानतों; तुमचा हात करा इकडे. "

तिनें आपला हात पुढें केला तो जरा संकोचानेंच. आपण फार भावनावश दिसूं नये म्हणून तिच्या बोटांना क्षणभर स्पर्श होईल इतपतच तो हातांत धरून त्यानें हस्तांदोलन केलें. क्षणभरानें तो म्हणाला, " तुमचा हात इतक्या लवकर सोडल्याबद्दल वाईट वाटतं बुवा आपल्याला !"

" हवा असला तर पुनः घ्या हातांत एकदां !" ती म्हणाली. यावेळीं ओकनें तिचा हात अधिक वेळ धरून ठेवला, तो म्हणाला, " किती मऊ आहे तुमचा हात ! हिंवाळा असूनहि त्याला कुठें भेगा पडल्या नाहींत कीं खरखरीतपणा नाहीं. "

आपला हात सोडवून घेत ती म्हणाली, "पुरे पुरे झालं आतां. आता शोधून काढा पाहूं माझं नांव ! "

---

## ४. “चल व्हतीस कां तैयार?—करूं सौंसार”



त्या सुंदर गोंडस मुलीनें ओकचें हृदय लवकरच काबीज केलें. ती रोज नियमितपणें गोठ्यांत जाई तेव्हां ओक कुंपणाआडून तिच्याकडे पहात असे. याचा तिच्यावर कांहींच परिणाम झाला नाहीं; परंतु त्याच्या भावना मात्र बळावत गेल्या. तिच्याशीं काय बोलायचें हें ओकनें अद्याप ठरविलें नव्हतें आणि शाब्दिक प्रेमाच्या अर्थशून्य भाकडकथा सांगणें त्याला जमत नसल्यानें तो कांहींच बोलत नव्हता. चौकशीअंतीं त्याला कळलें कीं त्या मुलीचें नांव बाथशीबा एव्हरडीन. तिच्या गोठ्यांतील गाईचें दूध सुमारें सात दिवसांत आटेल असें कानीं आल्यानें ओकला त्या आठव्या दिवसाबद्दल धास्ती वाटूं लागली; आणि खरोखरच आठव्या दिवसानंतर बाथशीबाचें त्या टेकडीवर येणेंहि बंद झालें, ओकची आतां अशी स्थिति झाली होती कीं शीळ घालण्याऐवजीं ‘बाथशीबा’—‘बाथशीबा’ असा जप करणें त्याला अधिक आवडे. लहानपणापासून त्याला पिंगट केंसांची आवड होती. पण आतां मात्र त्याला काळे केंस आवडूं लागले.

अखेर तो निश्चयानें आपल्याशीं म्हणाला, “करीन तर हिच्याशींच लग्न करीन—तसें न घडलें तर माझें सारें जीवन फोल होईल.”

कोणतें निमित्त काढून बाथशीबाच्या झोंपडीला भेट देणें योग्य दिसेल या विचारानें तो गोंधळून गेला होता. एक लहान कोंकरूं मागें ठेवून त्याच्या कळपांतील एक मेंढी मरण पावली होती. ही संधि त्याला योग्य वाटली. जानेवारींतील एका सुप्रभातीं तें कोंकरूं एका टोपलींत घेऊन ओक बाथशीबाच्या आत्याबाईच्या झोंपडीकडे निघाला.

तो दिवस हिवाळ्याचा असूनही त्यावर वसंत कालाची छटा दिसत होती. मधूनच मंद सूर्यकिरणांची प्रभा सर्वत्र पसरे. निळ्याभोर

निरभ्र आकाशाचा कांहीं भागहि ढगांतून दिसूं लागे. ओकच्या मागून त्याचा कुत्रा जॉर्ज गंभीर मुद्रेनें चालत होता. या भेटीसाठीं ओकनें विशेष तयारी केली होती. आपल्या जुनाट घड्याळाची चांदीची साखळी त्यानें घासून पुसून लख्ख केली होती आणि बुटाला नवे बंद बांधले होते. त्याची काठी, रुमाल, फुलाफुलांचा कशिदा काढलेलें जाकीट–हा त्याचा साराच थाट नवा होता. गुंता झालेल्या आपल्या पिंगट कुरळ्या केसांना त्यानें खूप तेल लावलें होतें. जायफळाभोंवतीं असलेल्या जायपत्रीप्रमाणे ते केंस आतां त्याच्या डोक्याला चिकटून बसले होते. वळचणीखालीं चाललेली चिमण्यांची चिंव चिंव सोडल्यास बाथशीबाच्या झोंपडींत पूर्ण शांतता होती. पण ओकच्या या पहिल्या भेटीला सुरवातीलाच अपशकून झाला. तो बागेच्या फाटकाशीं येऊन पोंचला तेव्हां त्याच्या कुत्र्याला पाहून अंग वेडेंवांकडे करीत विचित्र झटके देणारें एक मांजर त्याला दिसलें. तें एका झुडुपांत शिरल्यावर तेथील पानांमागून शब्द आले—“ माझी गुणाची मनुताई ती ! तो मेला घाटिंगण कुत्रा मारायला का येत होता तिला ? बिचारी मनी ती ! ”

ओक त्या बाजूला वळून म्हणाला, “ माफ करा हं. पण माझा कुत्रा माझ्यामागूनच चालत होता. फार गरीब आहे तो ”

ओक दाराशीं पोंचला तो जरा शरमिंदा होऊनच. त्यानें मनांत योजून ठेविली होती त्यापेक्षां समोरील सत्यस्थिति त्याला निराळीच दिसत होती. बाथशीबाची आत्या घरांतच होती. ओक तिला म्हणाला, “ कोणी भेटायला आलं आहे असं मिस् एव्हरडीन यांना सांगाल कां जरा!” आत्याबाईने ओकचें स्वागत केलें. तो त्यांना म्हणाला, “मिस् एव्हरडीन यांनीं पाळण्यासाठीं मी एक कोकरूं आणलं आहे. मुलींना भारी आवडतात कोकरं ”

“ जरा थांबतां कां ? बाथशीबा येईलच आतां बाहेरून ” आत्याबाई म्हणाल्या. खालीं बसून ओक म्हणाला, “ खरं म्हणायचं तर या कोकरासाठींच म्हणून आलों नाहीं मी. ‘ लग्न करावसं वाटतं कां तुम्हाला ’ असं बाथशीबाला विचारण्यासाठीं आलों होतों मी. ”

" असं कां ? ",

" हो. तिची इच्छा असली तर मी आनंदानें लग्न करीन तिच्याशीं. पण दुसरे कोणी तरुण घोंटाळत आहेत कां तिच्या ? "

आत्याबाई म्हणाल्या " आहेत कीं. कितीतरी ! हें पहा ओक पाटील, ती चांगली शिकलेली सवरलेली आहे अन् दिसायलाहि सुरेख आहे. एके काळीं ती शिक्षिकाच होणार होती. पण ती आहे फार स्वतंत्र बाण्याची. या बाजूला कोणी तरुण दिसले नाहींत तिच्या भोंवतीं, पण याआधीं कितीतरी उमेदवार येऊन गेले असतील ! "

ओक खालीं पहात म्हणाला " नशीब माझं. मी आपला साधासुधा माणूस आहे. पहिलाच असतों तर कांहींतरी आशा होती मला. बरंय आतां वाट पहाण्यांत कांहीं अर्थ नाहीं. याच कामासाठीं मी आलो होतों. जातों मी आतां "

—ओक कांहीं अंतरावर गेला असेल तोंच, " अहो ! " अशी बारीक आवाजांतील एक हांक त्याच्यामागून आली. त्यानें मागें पाहिलें तों बाथशीबाच एक पांढरा रुमाल हलवीत धांवत येत होती. धांवून धांवून तिचा चेहरा लाल बुंद झाला होता. ती धापा टाकीत टाकीत म्हणाली, " ओक पाटील मी मी... "

—ओक म्हणाला, " मी तुम्हांला भेटायला आत्तांच येऊन गेलों. "

—— " तुम्ही मला मागणी घालायला आलां होतांत हें माहीत नव्हतं मला; नाहींतर मी बागेंतून लगेच आंत आलें असतें. तुम्हाला असं परत पाठविण्यांत आत्याची चूक झाली हें सांगायलाच धांवत आलें मी. माझा कोणीहि प्रियकर नाहीं, अन् कधींहि नव्हता. 'असे अनेक होऊन गेले' अशी तुमची समजूत करून आत्यानें तुम्हांला परत पाठवलं हें फार वाईट झालं "

ओकचा चेहरा आनंदानें उजळला. तो हंसून म्हणाला, 'हें ऐकून मला खरंच फार फार आनंद झाला आहे' यावर तिचा हात हातांत घेण्याचा त्यानें प्रयत्न केला तेवढ्यांत तिनें तो चपळाईनें मागें घेतल्यानें त्याच्या हातांतून तो निसटून गेला.

या प्रकारामुळें ओकचा उत्साह थोडा कमी झाला. तरी तो म्हणाला, " हें पहा, माझं बऱ्यापैकीं शेत आहे. आज मी जरी कर्ज काढलं असलं तरी मी तें लवकरच फेडून टाकीन. आपलं लग्न झालं म्हणजे मी सध्यापेक्षां दुप्पट मेहनत करूं शकेन. " ओक पुनः आपला हात पसरून पुढें सरकत आहे असें पाहून बाथशीबा एका झुडुपामागें उभी राहून, आपले डोळे मोठे करून म्हणाली, " हें पहा ओक पाटील, तुमच्याशीं लग्न करीन असं मी कधींच म्हणालें नव्हतें. " हे शब्द ऐकून ओक एकदम विरमला. तो म्हणाला, " वा ! हा खासा न्याय ! आधीं एखाद्या माणसाच्या मागं धांवत जायचं अन् मग म्हणायचं मला तुमच्याशीं लग्न करायचं नाहीं ! "

आपल्या कृतीनें आपण कशा विचित्र परिस्थितींत सांपडलों आहोंत याची अर्धवट जाणीव बाथशीबाला आतां झाली होती. तरीहि ती उत्साहानें म्हणाली, " डझनभर तर राहोच , पण एकाहि तरुणाची मी प्रेयसी झालें नाहीं अजून. एखाद्याची मालमत्ता होऊन रहाण्याची मला अगदीं चीड आहे; पण केव्हां तरी माझ्यावर तसा प्रसंग येईलच म्हणा. मला तुम्ही हवे असतां तर तुमच्यामागें मी अशी कधींच धांवलें नसतें. तें अगदीं मर्यादेला सोडून झालं असतं. पण आत्यानें तुम्हाला सांगितलेली बातमी खोटी असल्यानें तिची दुरुस्ती करायला मी घाईनें आलें यांत कांहीं वावगं झालं नाहीं. "

—" वावगं झालं नाहीं हें खरं " ओक उत्तरला.

" खरं म्हणायचं तर घरून निघायच्या आधीं, आपण लग्न करावं की नाहीं याचा विचार करायला मला वेळच मिळला नाहीं, कारण तोंपर्यन्त तुम्ही टेकडी ओलांडून गेलां होतां सुद्धां."

थोड्या उत्साहानें ओक पुन्हां म्हणाला, " मग आतां थोडा वेळ विचार करा कीं. मी थांबतों तोंपर्यंत. कराल कां तुम्ही माझ्याशीं लग्न? माझं तुमच्यावर फार फार प्रेम आहे. "

—बाथशीबाची नजर दुसऱ्या दिशेला दूरवर लागली होती. ती म्हणाली, " मला वेळ द्या थोडा. "

तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात ओक म्हणाला, " मी तुम्हाला सुखी करूं शकेन. वर्ष दोन वर्षात आपण पिआनो घेऊं. मी माझ्या बांसरीचाहि सराव ठेवीन. मग संध्याकाळीं मलाहि तुमच्या पिआनोबरोबर साथ करतां येईल. "

—" हो कां? मला आवडेल तें. "

" बाजाराला जाण्यासाठीं एक छोटी गाडी घेऊं आपण. छान छान फुलं लावूं पक्षी— निदान कोंबड्या पाळूं, काकड्यांची लागवड करूं. लग्नानंतर वर्तमानपत्रांत नूतन वधू-वरांच्या यादींत नांव देऊं आपण."

—" हेंहि मला फार आवडेल. "

" अन् पुढें आपल्याला मुलं झालीं म्हणजे प्रत्येक वेळीं तेंहि वर्तमानपत्रांत छापून आणूं आपण. घरीं आरामांत शेकोटीजवळ बसूं–तुम्ही वर पाहिलं कीं मी समोर—आणि मी नजर टाकली कीं तुम्ही समोर!"

" थांबा ! थांबा !! चावटपणा करूं नका " ती जरा हिरमुसल्या चेहऱ्यानें म्हणाली. " छे ! या साऱ्याचा कांहीं उपयोग नाहीं. तुमच्याशीं लग्न करायची इच्छाच होत नाहीं मला. "

—" प्रयत्न तरी करून पहा "

— " मी खूप प्रयत्न करून पाहिला. पण हें पहा, एकदां न म्हटला म्हणजे तो कायमचाच चिकटला. तुम्हींच म्हणालां होता नां आतां

कीं ' समोर पाहिलं कीं मी आहेच "

" अर्थात् "

—मलाहि वाटतं कीं लग्नांत नवरी म्हणून मिरवावं; पण तें नवऱ्याच्या पदराशीं गांठ न बांधतां. पण बायकांना एकटं थोडंच अस मिरवतां येतंय् ! म्हणून मी ठरवलं आहे, लग्नच करायचं नाहीं— निदान सध्यां तरी. "

—ओक एकदम उसळून म्हणाला, " अगदीं मूर्खपणाचा विचार आहे. हा "

बाथशीबा कुऱ्यानें आणखी थोडी दूर सरकली.

ओक समजावणीच्या स्वरांत तिला म्हणाला, " हें पहा. असं करूं नका. मला कां नाकारतां तुम्ही ?" एक उसासा टाकून ओक तिच्याजवळ जाऊं लागला तेव्हां ती मागें सरकत म्हणाली, " माझं तुमच्यावर प्रेम नाहीं. "

—" पण माझं तुमच्यावर प्रेम आहे कीं ! तुमचं प्रेम असो नसो, नुसती आवड असली तरी चालेल मला " ओकनें उत्तर दिलें.

—" फार चागलं ! पण पुढें तिरस्कार वाटूं लागेल तुम्हाला माझा अशानं --" बाथशीवा उत्तरली.

ओक कळकळीनें म्हणाला, " कधींहि नाहीं. माझ्या जिवांत जीव असेपर्यंत माझं प्रेम कायम राहील तुमच्यावर. अखेरच्या क्षणापर्यंत माझा जीव तुमच्या प्राप्तीसाठीं तळमळत राहील !"

ओकच्या आवाजांत अकृत्रिम कारुण्य भरलें होतें आणि त्याच्या हातांना कंप सुटला होता.

यामुळें हळहळ वाटून बाथशीबाहि म्हणाली, " तुम्हाला माझ्याबद्दल इतकं वाटत असतां तुम्हाला नकार देणं फार वाईट दिसतं खरं.

मीच तुमच्यां मागून आलें नसतें तर फार बरं झालं असतं " ती कष्टी होऊन म्हणाली. पण थोड्याच वेळांत तिचा खेळकरपणा पुनः जागृत झाला. चेहऱ्यावर जरा धूर्तपणा आणीत ती म्हणाली, " मी आहे फाजील स्वतंत्र वृत्तीची. मला नवरा हवा तो मला वठणीला आणूं शकेल असा. तुम्हाला तें जमणार नाहीं.. तसं म्हटलं, तर तुमची स्थिति माझ्यापेक्षां उजवी आहे, कारण माझ्याजवळ छदाम नाहीं. आत्याबाईच्या घरीं अन्नावारी राबतेंय् मीं. तुमच्यापेक्षां माझं शिक्षण जास्त झालंय् अन् माझं तुमच्यावर बिलकुल प्रेमहि नाहीं. नकाराच्या दृष्टीनें ही माझी बाजू झाली. अन् तुमच्याहि हिताच्या दृष्टीनं बोलायचं तर तुम्हीहि आतांच कुठें स्वतंत्रपणें शेतीला लागलांत. तेव्हां एकाद्या श्रीमंत मुलीशींच तुम्ही लग्न करायला हवं म्हणजे त्यामुळें आहे यादून अधिक शेतीवाडी वाढावितां येईल तुम्हाला. "

ओकला जरा नवल वाटलें. तो तिच्याकडे कौतुकानें पाहूं लागला. भाबडेपणानें तो बोलून गेला, " माझाहि पूर्वी अगदीं हाच विचार होता ! "

त्याच्या फाजील प्रामाणिकपणामुळें बाथशीबा मात्र हिरमुसली झाली. जरा फुरंगटून ती म्हणाली, " इतकं होतं तर आलांत कशाला मला त्रास द्यायला ?

बिचारा ओक घाईघाईनें कांहीं स्पष्टीकरण करूं लागला पण तिकडे लक्ष न देतां ती कुऱ्यातच म्हणाली, " हें पहा, एकदां तुम्ही कबुली दिली. ती दिली. यानंतर कांहीं झालं तरी मी तुमच्याशीं लग्न करणार नाहीं. "

ओक अगदीं काकुळतीस येऊन म्हणाला, " असा गैरसमज करून घेऊं नका. माझ्या परिस्थितींतल्या कोणाहि मनुष्याच्या मनांत जें आलं असतं तें मी आपला भाबडेपणानें बोलून गेलों " तेवढ्याचा बाऊ करून उगीच लाजवूं नका मला. आणि हें पहा, ' मी तुमच्या तोलाची नाहीं ' असं तुम्ही म्हणतां त्यांत कांहींच अर्थ नाहीं. तुमचं बोलणं, चालणं, कसं

घरंदाज महिलेसारखं आहे, अन् तुमचे काका मोठे जमीनदार आहेत हेंहि माहीत आहे मला. मग संध्याकाळीं येऊं कां मी पुन्हां तुमची भेट घ्यायला? निदान रविवारीं तरी फिरायला येत जाल कां माझ्याबरोबर? लगेच निर्णय घ्या म्हणून सांगत नाहीं मी तुम्हांला."

—"छे! छे!! माझ्यानें तें होणार नाहीं; उगीच गळ घालूं नका मला. माझं तुमच्यावर विलकुल प्रेम नाहीं. काय बाई चमत्कारिकच!" बाथशीबा हंसून म्हणाली.

आपल्या भावना अशा थट्टेवारी नेलेल्या पाहून कोणाहि पुरुषाला बरें वाटत नाहीं. दुःखीकष्टी होऊन ओक म्हणाला, "बरं मग मी पुनः विचारणार नाहीं तुम्हाला."



# ५. छिद्रेष्वनर्था बहुलीभवन्ति



बाथशीबा आपला शेजार सोडून गेली ही बातमी ऐकल्या-वर ओकच्या मनाची अगदीं चमत्कारिक स्थिति झाली. प्रेम करणें सोपें असतें, पण त्यांतून बाहेर पडणें फार कठीण असतें. ' बाथशीबा निघून गेल्यावर ओकची तिच्याबद्दलची आपले-पणाची भावना कमी होण्याऐवजीं ती अधिकच तीव्र झाली.

बाथशीबा वेदरबरी या वीस मैल दूर असलेल्या गांवीं गेली हें त्याला कळलें. मात्र ती कांहीं दिवसांपुरती गेली कीं कायम रहाण्यासाठीं हें त्याला कळलें नाहीं.

ओकजवळ दोन कुत्रे होते. मोठ्या कुत्र्याचें नाव जॉर्ज. त्याच्या नाकाचा शेंडा काळा असून त्याभोंवतालचा भाग गुलाबी रंगाचा होता. त्याच्या अंगावर पांढऱ्या आणि करड्या रंगाचे ठिपके होते. त्याचा पहिला मालक अगदीं शिवराळ तोंडाचा होता. त्याच्या तोंडच्या शिव्या ऐकून ऐकून या कुत्र्यालाहि एखाद्या शिव्यांच्या शास्त्रांत मुरलेल्या म्हाताऱ्याइतकें त्या शिव्यांचें तारतम्य कळत असे. दुसरा कुत्रा म्हणजे जॉर्जचा बच्चा होता. जॉर्ज आणि तो यांच्यामध्यें फारसें साम्य दिसत नव्हतें. जॉर्जच्याच मृत्यूनंतर त्याचें काम पुढें चालवावें म्हणून तो मेंढ्या राखण्याचें काम बापाकडून शिकत होता. पण या शास्त्रांतल्या मूळाक्षरांपलीकडे अजून त्याची प्रगति झाली नव्हती. एखादी गोष्ट कोणत्या मर्यादेपर्यंत करावी, कोणाया मर्यादेबाहेर जाऊं नये हें त्याला कधींहि कळत नसे. तो कुत्रा अगदीं आस्थेवाईक पण हटवादी होता. त्याला एकदां मेंढ्या हांकण्यास पाठविलें तर तो त्या कामाचा इतका पाठपुरावा करी कीं थांबण्याची आज्ञा मिळेपर्यंत किंवा जॉर्जकडे पाहून त्याच्याप्रमाणें

थांबावेसें वाटेपर्यंत साऱ्या मेंढ्यांना तो थेट नाकासमोर हांकत राही. या कुत्र्यांची एवढी माहिती पुरे.

नॉर्कोब हिल नांवाच्या टेकडीपलीकडील बाजूला खडूची एक खाण होती. कुंपणाच्या दोन रांगा त्या खाणीच्या खोल तोंडाशी जवळ जपळ येऊन भिडल्या होत्या. त्या तोंडाशीं एक ओबडधोबड कठडा उभारला होता.

एके रात्रीं ओकनें कुत्र्यांना कोंडून घालण्यासाठीं हांक मारली तेव्हां एकटा जॉर्ज पुढें आला. दुसरा कुत्रा कोठें दिसेना. आपले दोन्ही कुत्रे टेकडीवर एक मेलेलें कोंकरूं खात बसले होते असें त्याला आठवलें. दुसऱ्या कुत्र्याचें खाणें अद्याप आटोपलें नसेल, अशी समजूत होऊन ओक झोपडीत निघून गेला.

परिचित आवाजांचे चमत्कारिक पडसाद ओकच्या कानीं आल्यानें तो पहाटेपूर्वीच जागा झाला. मेंढ्यांच्या गळ्यांतल्या घंटा जोरजोरानें आणि भराभर वाजू लागल्या होत्या. एखाद्या नव्या कुरणांत शिरून मेंढ्या भरभर गवत खाऊं लागल्या म्हणजे असा आवाज होत असे; असाच, परंतु अधिक तालावरचा आवाज त्या मेंढ्या जोरानें धांवूं लागल्या म्हणजे येई. ओकच्या सराईत कानानें ओळखलें कीं, हे आवाज मेंढ्या जोरानें पळूं लागल्यामुळेंच येत आहेत.

ओक ताडकन् बिछान्यांतून उठला आणि कपडे चढवून धुक्यांतून टेकडीवर पळत सुटला. मेंढवाड्यांत व्यालेल्या पन्नास एक मेंढ्या इतर गाभण मेंढ्यांपासून दूर ठेवल्या होत्या. त्या कोंकरांसह स्वस्थपणें बसल्या होत्या; पण बाकीच्या दोनशें गाभण मेंढ्यांचा मात्र थागपत्ता नव्हता. ओकनें जोरजोरानें आरोळ्या दिल्या. पण बें बें असा एकहि आवाज त्याच्या कानीं येईना. मेंढवाड्याच्या कुंपणाला भोंक पडलें होतें, आणि तेथें मेंढ्यांचे खूर उमटले होते. ओक कुंपणाबाहेर पडला. त्यानें झाडींत पाहिलें. पण तेथेंहि मेंढ्यांचा पत्ता नव्हता. तो टेकडी चढून गेला. कुंपणाच्या दोन रांगा एकत्र

आल्या होत्या. त्या जागीं तो एकदम थांबला कारण, खडूच्या खाणीच्या तोंडाशींच त्याचा दुसरा कुत्रा निश्चलपणें उभा होता !

सेंट हेलेना येथें नेपोलियन उभा असे त्याच पवित्र्यांत त्याचा कुत्रा क्षितिजाच्या पार्श्वभूमीवर निश्चलपणें उभा असलेला त्याला दिसला.

सारा घात झाला असें त्याला निश्चितपणें वाटूं लागलें. तो पुढें झाला तेव्हां त्याला आपल्या पोटांत खिंडार पडल्यासारखें वाटत होतें. खाणीच्या तोंडावरील कठडा मोडून पडला होता आणि जवळपास मेंढ्याचे खूर उमटले होते. आपण एखादी बक्षीस मिळविण्यासारखी कामगिरी केली आहे अशा आविर्भावानें ओकचा धाकटा कुत्रा त्याच्याजवळ येऊन त्याचा हात चाटूं लागला. ओकनें वांकून कड्याखालीं पाहिलें. तेथें त्याच्या दोनशें मेंढ्या मृत आणि मरणोन्मुख अवस्थेत पडल्या होत्या !

आपल्या साऱ्या मेंढ्या एखादे दिवशीं मेलेल्या आढळतील अशी धास्ती ओकला नेहमींच वाटत असे. आज तसें खरोखरच घडून आलें होतें. या दृश्याकडे पाहून त्या अश्राप मेंढ्या आणि त्यांचीं तीं गर्भावस्थेंतील कोंकरें यांच्याबद्दल त्याचें मन हळहळूं लागलें. पण क्षणभरानें या दृश्याची आणखी एक बाजू त्याच्या ध्यानांत आली. या मेंढ्यांचा त्यानें विमाहि उतरविलेला नव्हता. जन्मभर काटकसरीनें वागून जमविलेली त्याची सारी पुंजी एका क्षणांत नष्ट झाली होती. स्वतंत्रपणें शेती करण्याचे त्याचे सारे बेत कोसळून पडले होते, ते बहुधा कायमचेच. कठड्यावर वांकून त्यानें हातांनीं आपलें तोंड झांकून घेतलें. कांहीं वेळानें भानावर आल्यावर तो एकच वाक्य बोलला. तें मात्र लक्षांत रहाण्यासारखें असून त्याच्या स्वभावाचें द्योतक होतें. " माझं लग्न झालं नाहीं हीच परमेश्वराची कृपा-- आतां मला गरीबी येणार, त्या स्थितींत तिनं काय केलं असतं ? "

झालेला प्रकार असा घडून आला असावा. ओकच्या छोट्या कुत्र्याची समजूत अशी होती कीं आपलें काम मेंढयांच्या मागून धांवावयाचें आहे. तेव्हां आपण त्यांच्यामागें जितकें अधिक धावूं तितकें बरें अशा

समजुतीनें त्या कुऱ्यानें साऱ्या मेंढ्या एका कोंपऱ्यांत गोळा केल्या. त्यांच्यामागें लागून, त्या भित्र्या प्राण्यांना त्यानें कुंपणांतून, शेतांतून, खाणीकडे सरळ हांकीत नेलें. त्यांच्या भारानें तो कठडा मोडला आणि साऱ्या मेंढ्या कड्याखालीं खाणींत कोसळल्या.

जॉर्जच्या बच्च्यानें आपलें काम इतक्या फाजील चोखपणें बजावलें होतें कीं इतका कामसू प्राणी या जगांत ठेवणें योग्य नाहीं अशी सर्वांची खात्री झाली. त्याच दिवशीं दुपारीं त्याला गोळी घालण्यांत आली. आपलें जग देवाण घेवाणाच्या तत्त्वावर चाललेलें आहे. एखादी विचारसरणी घेऊन ती तर्कसिद्ध निर्णयाच्या कडेला नेऊन भिडविणाऱ्या कुत्र्यांची आणि तत्त्वज्ञान्यांचीहि कशी शोचनीय दशा होते याचें हें आणखी एक उदाहरणच म्हणतां येईल.

ओक हा एक होतकरू तरुण दिसत होता. त्याची चाल-चलणूक चांगली होती. एवढ्याच तारणावर एका व्यापाऱ्यानें त्याला या मेंढ्या उधार दिल्या होत्या. कर्ज फिटेपर्यंत त्याला ओक नफ्याचा हिस्सा देत असे. या प्रसंगानंतर अखेर ओकला कळलें कीं स्वतःच्या मालकीच्या मेंढ्यांची व इतर मालमत्तेची विल्हेवाट लावल्यावर आपण कर्ज फिटून मोकळे होऊ; पण अंगावरच्या कपड्यांशिवाय आपल्याजवळ कांहीं एक शिल्लक उरणार नाहीं.



# ६. " आग ! आग चहूंकडे "



नंतर दोन महिने लोटले.

कॅस्टरब्रिज या जिल्ह्याच्या ठिकाणीं फेब्रुवारींतल्या एका दिवशीं एक जत्रा भरली होती. अशा जत्रेंत वर्षासाठीं शेतकरी गडीनोकरांना कामाला लावून घेत. एका रस्त्याच्या टोकाला दोन-तीनशें तगडे उत्साही मजूर कामाची वाट पहात उभे होते. गाडीवाल्यांनीं आपली खूण म्हणून चाबकाच्या दोरीचा तुकडा हॅटभोंवतीं गुंडाळला होता. शाकारणी करणाऱ्यांनीं गवताच्या काड्या विणून टोपींत घातल्या होत्या, आणि धनगरांनीं आंकड्या हातांत धरल्या होत्या. यामुळें मालकांना कोण नोकर काय काम करणार आहे याची चटकन् कल्पना येई.

या गर्दींत पैलवानासारखा दिसणारा एक जवान उभा होता. इतरांपेक्षां तो वरच्या दर्जाचा दिसे. त्यामुळें कांहीं शेतकऱ्यांनीं त्याला जमीनदार समजून त्याची आदरानें विचारपूस केली. तो म्हणाला, " मीच नोकरी शोधीत आहे दिवाणजीची. अशा नोकराच्या शोधांत असलेला एखादा मालक आहे कोणाला ठाऊक ? "

हा जवान गॅब्रिएल ओकच होता. आतां तो पूर्वींपेक्षां अधिक फिकट आणि उदास दिसत होता. पूर्वीं तो आपल्या शेतांतच कां होईना पण राजासारखा स्वतंत्र होता, पण आतां त्याची परिस्थिति फारच खालावली होती. तरी या अनुभवामुळें त्याच्या अंगीं पूर्वीं नसलेल्या गांभीर्य आणि शांत चित्तवृत्तीची त्याला प्राप्ती झाली होती. अवनतींतून तो उन्नतीला जाऊन पोंचला होता, आणि त्याचा तोटा हा फायदाच ठरला होता.

वहिवाटदाराची जागा नाहीं तर एखाद्या धनगराची नोकरी मिळावी म्हणून ओकनें धनगरासारखी एक आंकडी तयार करून घेतली. तेव्हां

जत्रेंत वहिवाटदाराची मागणी सुरू झाली. एक दोन शेतकऱ्यांनीं ओकला विचारलें, "कोणाच्या शेतावर काम केलें आहेस तूं अलीकडे ?"

"माझ्या स्वतःच्या" असें ओकचें उत्तर आलें म्हणजे मात्र ऐकणारा घाबरूनच जाई. तो हळूंच पाय काढी आणि संशयानें मान हलवी. गॅब्रिएलच्या छोट्या कुत्र्याप्रमाणें त्याची लायकी जरुरीपेक्षां अधिक असल्यानें लोक त्याच्यावर विश्वास टाकायला कचरत. कांहीं केल्या त्याचें पाऊल पुढें पडेना. धनगर म्हणून ठराविक काम मागण्याऐवजीं पडेल तें काम करण्याची तयारी आपण दाखविली असती तर बरें झालें असतें असें ओकला वाटूं लागलें.

संध्याकाळ झाली. धान्यबाजाराच्या इमारतीजवळ कांहीं रंगेल लोक गाणीं म्हणत, शीळ घालीत उभे होते. ते स्वर ऐकून गॅब्रिएलचा हातहि खिशांतील बांसरीकडे गेला. आपलें दुःख विसरून तो एक लोकप्रिय गीत वाजवूं लागला. ओकच्या वादनांत विलक्षण गोडवा होता. त्या स्वरलहरींनीं श्रोत्याप्रमाणें त्याला स्वतःलाहि उत्साह वाटूं लागला. तो तसाच वाजवीत राहिला. अर्ध्या तासांत त्याला बरीच कमाई झाली.

जत्रेंत चौकशी करतां ओकला कळलें कीं वेदरबरी नांवाचें गाव तेथून पांच सहा मैलांवर असून त्यापलीकडील शॉट्सफर्ड या गावीं दुसरे दिवशीं अशीच जत्रा भरणार होती. दोन महिन्यांपूर्वीं बाथशीबा जेथें गेली तेंच हें वेदरबरी गांव ही बातमी ऐकून ओकला अंधारांतून एकदम प्रकाशांत आल्यासारखें वाटूं लागले. वेदरबरी येथें रात्र काढावी आणि नंतर शॉटस्फर्डला जावें असें ठरवून तो वेदरबरीच्या वाटेनें चालूं लागला.

ओक तीन-चार मैल चालून गेला तों अंधार पडूं लागला. वाटेंत एका झाडाखालीं सोडून ठेवलेला एक छकडा त्याला दिसला. त्यांत थोडेसें गवत तेवढें होतें. वेदरबरीला जाऊन रात्रीच्या निवाऱ्यासाठीं पैसे मोजण्याऐवजीं या छकड्यांत, गवतावर पडूनच रात्र काढावी असा त्यानें विचार केला. थोडा फराळ करून त्यानें अर्धें गवत खालीं अंथरलें; आणि बाकीचें पांघरुणा-

सारखें अंगावर ओढून घेऊन तो अगदीं आरामांत पसरला. ओकसारख्या अंतर्मुख वृत्तीच्या माणसाला आपल्या मनांतली हुरहूर काढून टाकणें अशक्य होतें. प्रणय आणि व्यवसाय या दोन्ही क्षेत्रांतील दुर्दैवी घटनांचा विचार करीत असतांच ओकला झोंप लागली.

......तो एकाएकीं दचकून जागा झाला तेव्हां त्याचा छकडा खूप जोरानें चालला होता. ढोलावरच्या टिपरीसारखें त्याचें डोकें गवतावर ताडताड उडत होतें. ओक जर सधन असता तर या परिस्थितींत त्याला भीतीच वाटली असती. पण दुर्दैवी मनुष्याला स्वतःबद्दलच्या भीतीची विस्मृति होते. ओकनें बाहेर पाहिलें. आकाशांत सप्तर्षींच्या ताऱ्यांनीं ध्रुव ताऱ्याशीं जवळ जवळ काटकोन केला होता. म्हणजे रात्रींचे नऊ वाजले असावेत असें त्याच्या ध्यानांत आलें. छकड्याच्या पुढील भागांत दोन व्यक्तींचें संभाषण चाललें होतें. हे लोक आहेत तरी कोण हें कळून घेण्यासाठीं ओक त्या संभाषणाकडे कान देऊन ऐकूं लागला.

एक आवाज आला. " आवा है लई देखणी पण लई तोऱ्याची ! "

गाडी हांकणाऱ्याचा अडखळता आवाज आला, " तसंच दिसतंय् बरं का ?"

" सार लोक तेंच म्हणतात; आवा लई नोकझोकाची. "

" असेल–असेल सारे म्हणात्यात तर असेल तसंच. आपल्याला तर मान वर करून पहायचा धीर होत नाहीं तिच्याकडे. "

" अन् लोक म्हणतात, बाजा पण लई झोकांत वाजविते - एखादं भजन वाजिवलं तरी इतकं गोड लागतं कीं जशी काय लावणीच घुमतेय एखादी !"

या गप्पा ऐकतांना एक विचित्र जाणीव ओकच्या मनाला चाटून गेली की हे लोक बाथशीबाबद्दलच बोलत असावेत. परंतु तसा निश्चित

पुरावा नव्हता. या लोकांना धास्ती वाटूं नये म्हणून ओक मागच्यामागें, त्यांना नकळत खालीं उतरला.

गांवांत जाऊन कुठें निवाऱ्याला रहावें कीं एखाद्या गंजीच्या आडोशाला पडून बिनखर्चानें रात्र काढावी अशा विचारांत ओक एका फाटकावर बसला. तेवढ्यांत त्याच्या डावीकडे सुमारें अर्ध्या मैलावर नेहमींपेक्षां निराळा असा एक प्रकाश दिसूं लागला. पहातां पहातां तो वाढूं लागला. कुठें तरी आग लागली होती हें खास. फाटकावरून उडी टाकून नांगरलेल्या शेतांतून ओक त्या प्रकाशाच्या दिशेनें चालूं लागला. तो जसजसा जवळ जाई तसतसा तो जाळ अधिकाधिक मोठा दिसूं लागे. त्या प्रकाशांत गवताच्या उडव्यांच्या आकृति दिसूं लागल्या. ओकच्या थकलेल्या चेहेऱ्यावर ज्वालांची भडक नारिंगी छटा खेळूं लगाली आणि त्याची आंकडी चांदीसारखी चमकूं लागली. गवताचा एक लांबलचक ढीग धडधडून जळत होता. तो वांचविणें आतां अशक्य झालें होतें. मध्येंच गवताची एक पेटती पेंढी खसकन् आवाज करीत खालीं कोसळली. लांबलेल्या ज्वाला वांकड्या तिकड्या होऊन नाचूं लागल्या. गवताच्या गंजीमागें ढगासारखा धूरच धूर पसरला होता; त्या अर्धपारदर्शक पडद्यामागें जळत असलेले गवताचे दुसरे ढीग पिवळट रंगाचे दिसत होते. जवळच्या गवताच्या काड्या जळूं लागल्या म्हणजे त्या वळवळणाऱ्या लाल भडक किड्यांच्या जुडग्यांसारख्या दिसत. ज्वालांचे चमत्कारिक आकार तयार होत आणि एखाद्या घरट्यांतून पक्षी वर उडावेत तशा ठिणग्या त्यांतून उडत.

ओकला प्रथम वाटलें होतें त्यापेक्षां ही परिस्थिती अधिक धोक्याची होती. धुराचा एक लोट बाजूला झाल्यावर जळत्या गवताच्या गंजी-जवळच असलेली एक गव्हाची उडवी त्याला दिसली. तिला लागूनच दुसऱ्या उडव्यांची एक रांग उभी होती. शेतावरील बहुतेक धान्य तेथेंच पडलें होतें; व तें सर्व धोक्यांत होतें.

कुंपणावरून उडी मारून आंत गेल्यावर गॅब्रिएलला आगी-जवळ असलेले दुसरे अनेक लोक दिसले. एक शेतकरी धांवत धांवत

येऊन घाईघाईनें दुसऱ्याला हांका मारीत होता. शेतकऱ्यांचा एक मोठा घोळकाच तेथें जमलेला असून उसळत्या ज्वालांबरोबर त्यांच्या सावल्याहि तेथें उडत बागडत होत्या. सारेच धांवाधांव करीत होते, मेहनत करीत होते. पण त्यांत कोणतीहि सुसूत्रता नव्हती.

धान्याच्या उडव्या दगडी पायंड्यावर ठेवल्या होत्या. एकदां कां ज्वाला त्यांच्याखालीं जाऊन पोचल्या असत्या म्हणजे साराच ग्रंथ आटोपला असता. गॉब्रिएलने शेजारच्या माणसाला ओरडून सांगितलें, "एखादी ताडपत्री आणा." उडव्या झांकण्याची मोठी ताडपत्री आणून त्यांनीं ती पडद्याप्रमाणें धरली. "आता कांहींजण पाण्याची बादली घेऊन येथें उभे रहा आणि हा पडदा सारखा ओला ठेवा." अशी ओकनें सूचना दिली. अशा रीतीनें ज्वालांचा खालचा मार्ग रोखला गेल्याने त्या सरळ वर उसळल्या आणि उडव्यांच्या वरच्या टोंकावर हल्ला चढवूं लागल्या. गॉब्रिएल ओरडला "शिडी!" "गंजीला लावून ठेवलेली शिडी जळून कोळ झाली." धुरांतून भुता सारखी दिसणारी एक आकृति उत्तरली, धान्यांच्या पेंढ्यांचीं टोकें पकडून आपले पाय रोवीत आंकडीचा दांडा पेंढ्यांत खुपशीत ओक कसाबसा एक धान्याच्या उडवीची भिंत चढून वर जाऊन बसला. तेथें पडलेले निखारे तो आपल्या आंकडीनें झाडून खालीं टाकूं लागला. तेथूनच ओरडून एक शिडी एक फांदी आणि पाणी आणण्यास त्यानें सांगितलें.

मघांशी गाडींत बसलेल्या बिली स्मॉलबरी या शेतकऱ्याला आतां एक शिडी सांपडली होती. तिच्यावरून चढून दुसरा एक शेतकरी, ओकच्या शेजारीं येऊन बसला. उडवीच्या शिखरावर खूप धूर झाला होता. त्यांतच एका हातांत आंकडी आणि दुसऱ्या हातांत एक फांदी घेऊन तेथें पडणाऱ्या ठिणग्या, निखारे झटकून टाकण्यांत गॉब्रिएल गुंतला होता. खालीं दुसरे लोक आगीशीं झगडत होतेच पण त्याचा फारसा उपयोग होत नव्हता.

आगीची धग लागणार नाहीं अशा बेतानें एक तरुण स्त्री घोड्यावर बसून देखरेख करीत होती. तिच्याजवळ दुसरी स्त्री उभी होती. ती म्हणत होती. "हा वरचा माणूस धनगर दिसतोय्, त्याची आंकडी कशी

तळपतेय उडवीवर ! चांगला उमदा उडी दिसतोय हा.'

घोड्यावरील स्त्रीनें विचारलें, " कोणाचा नोकर आहे हा धनगर ! "

" कोणाला माहीत नाहीं. कोणी अगदीं नवखा माणूस आहे म्हणतात. "

" धान्याच्या कोठाराला धोका नाहीं ना आतां ! मालकिणीनें विचारलें.

जॉन कोगन नांवाचा कुणबी उत्तरला, " आतां धोका नाहीं असं वाटतं पन् जर का ही इथली उडवी पेटती तर कोठार बी खलास झालं असतं. " तो पठ्ठा बसलाया नव्हे का उडवीवर ! पवनचक्कीवानी गरगरा हात फिरवीत ! त्याचीच बहाद्दरी ही सारी."

तोंडावर घेतलेल्या पदरातून गॅब्रिएलकडे पहात मालकीण म्हणाली, "चांगला झटून काम करणारा दिसतोय हा माणूस. येथेंच धनगर म्हणून राहिला असता तर फार बरं झालं असतं. "

आग आटोक्यांत आल्यावर गॅब्रिएल उडवीवरून खालीं उतरूं लागला. मालकिणीनें जवळच्या बाईला सांगितलें, " तो माणूस खालीं उतरला कीं सांग त्याला माझा निरोप —फार उपकार झाले तुमचे म्हणून ! "

हा निरोप मिळाल्यावर, या मालकाकडेच नोकरी मागतां येईल असा विचार गॅब्रिएलच्या मनांत चमकून गेला. तो त्या स्त्रीला म्हणाला, " कुठें आहेत तुझे मालक ? "

" मालक नाहींत मालकीण हे आमची " ती बाई उत्तरली. जवळ उभा असलेला एक कुणबी म्हणाला, " मालकीणबाई नवखी आहे इथं. तिचा काका वारला एकाएकीं, अन् ही बाई बघायला ,लागली

इथला सारा कारभार. चांगली मोकळ्या हाताची आहे बाई, बरंका, धनगर बाबा!"

धूर, धग, धाग, डाग यांनीं ओकचा चेहरा अगदीं ओळखूं न येईल असा झाला होता. अंगांतला अंगरखा चिंब भिजून, त्याला जळून भोकें भोकें पडलीं होतीं. त्याच्या आंकडीचा दांडा जळून जाऊन वीतभर आंखूड झाला होता. दारिद्र्यानें गांजलेला, ओशाळा झालेला गॅब्रिएल घोड्यावरील मालकीणीकडे गेला. आदरानें आपली हॅट उचलून, जरा घुटमळत तिच्या पायांशी उभा राहून त्यानें प्रश्न केला, "एखादा धनगर हवाय कां तुम्हाला बाईसाहेब ?"

तोंडावर घेतलेलें अवगुंठन उचलून तिनें आश्चर्यानें ओककडे पाहिलें.

गॅब्रिएल ओक आणि त्याची कठोर हृदयाची प्रेयसी बाथ-शीबा हे अशा योगायोगानें पुनः समोरासमोर आले होते!

ती कांहीं बोलली नाहीं. ओकनें जरा शरमून पुनः विचारलें, "एखादा धनगर हवाय् कां तुम्हाला बाईसाहेब ?"



# ७. 'अंधारांतील भेट.'



चमत्कारिक प्रकाराला हंसावें कीं, रडावें हें बाथशीबाला कळेना. ओकच्या स्थितीबद्दल तिला थोडीं दया आली आणि त्यांतच स्वतःच्या सुस्थितीबद्दल थोडें बरेंहि वाटले. मागें ओकने बोलून दाखविलेले प्रेमाचे शब्द ती जवळ जवळ विसरून गेली होती.

गांभीर्याचा आव आणून ती हलक्या आवाजांत म्हणाली, " होय मला एक धनगर हवा आहे. पण–"

जवळ उभे असलेले कुणबी म्हणाले, " माणूस अशी लायक है कामाला बाईसाब ! "

" बरं, मग त्याला दिवाणजीला भेटायला सांगा." बाथशीला बोलली आणि मग अगदीं व्यवहाराच्या भूमिकेवरून सारी वाटाघाट सुरू झाली. दिवाणजी भेटल्यावर त्याच्याबरोबर बोलणें करण्यासाठीं ओक निघून गेला.

बाथशीबा आपल्या नोकराना म्हणाली, " तुम्हांला बरंच जादा काम पडलं. थोडा फराळ करायला येतां घरीं ? "

नोकराचा एक म्होरक्या म्हणाला. " वॉरनच्या दुकानांत काय खान्यापिन्याचे असेल ते पाठवून द्या म्हणजे आरामांत बसून खाऊंपिऊं तिथं."

बाथशीबा घोड्यावरून निघून गेली आणि नोकरहि खेड्यां-तल्या पथिकाश्रमाकडे निघाले. दिवाणजी ओकला म्हणाला, " ठीक, मग कामावर येण्याबद्दल आता सारं ठरलं. मी जातों घरीं आतां, राम राम ! "

" इथं कोठें रहायची सोय करतां येईल कां तुम्हाला ? " ओकनें विचारलें.

त्यावर " नाहीं " असें तुटकपणें दिवाणजीनें उत्तर दिलें. तो म्हणाला, " या सरळ रस्त्यानें वॉरनच्या दारूदुकानाकडे सारे लोक गेले आहेत. तिथें गेलास तर कोणी तरी सांगेल तुला जागेबद्दल माहिती "

दिवाणजी निघून गेल्यावर ओक खेड्याकडे निघाला. बाथशीबाशीं झालेल्या भेटीचें त्याला नवल वाटत होतें. तिच्याजवळ रहायला मिळणार म्हणून त्याला आनंद वाटला. नॉर्कोब येथील ही साधीसुधी मुलगी आतां या साऱ्या शेतीवाडीवर सराईतपणें इतक्या लवकर देखरेख करायला लागली तरी कशी, याचेंहि त्याला नवल वाटूं लागलें.

ग्रॅब्रिएल एका जुनाट झाडाजवळून जात असतां कोणी तरी त्या झाडामागें उभें आहे असें त्याला दिसलें. त्याच्या पावलाच्या आवाजाने दचकून एक कृश देहयष्टीची मुलगी सहजपणें पुढें झाली. गॅब्रिएलनें तिला विचारलें, " वॉरनच्या दारूदुकानाकडे जाण्याचा रस्ता हाच काय ? " माहिती मिळवण्यापेक्षां त्या मुलीचा आवाज ऐकण्याचीहि त्याची अधिक इच्छा होती.

ती म्हणाली, " या उताराच्या थेट खालीं आहे तें दुकान. तुम्ही वेदरबरीचे रहिवासी दिसत नाहीं ! " तिनें भीत भीत विचारलें.

" छे, मी इथला नवा धनगर आहे. एवढ्यांतच आलों मी या गांवांत. " त्या मुलीच्या पायाशीं एक गाठोडें पडलेलें दिसत होतें. ओकची नजर तिकडे लागलेली पाहून आर्जवीच्या स्वरांत ती त्याला म्हणाली. " तुम्ही मला इथं पाहिलंत याबद्दल एक दोन दिवस तरी कोणाजवळ बोलूं नका—नाहीं ना बोलणार ! "

ओक म्हणाला, " मी बोलू नये असं तुम्हाला वाटत असलं तर बोलणार नाहीं. "

" फार मेहेरबानी झाली तुमची." ती मुलगी म्हणाली, " मी गरीब आहे. आणि माझ्याबद्दल लोकांत वाच्यता व्हायला नको आहे मला. "

गॅब्रिएल म्हणाला, " अशा थंडींत तुमच्या अंगावर कांहीं तरी गरम हवं, तुम्ही घरांत जावं हे बरं."

ती म्हणाली, " आतां तुम्ही इथून गेलांत तर फार बरं होईल मला जाऊं द्या माझ्या वाटेनं. "

" मी हा चाललोंच " ओक धुटमळत म्हणाला. "तुमची परिस्थिति बरी दिसत नाहीं, माझ्याकडून अल्पशी भेट घ्यायला नकार देऊं नये तुम्ही. मला एकच शिलींग देतां येईल सध्यां. "

" ठीक आहे घेतें मी तो " ती मुलगी कृतज्ञतेनें म्हणाली.

तें नाणें देतांना तिच्या मनगटाला गॅब्रिएलच्या बोटांचा स्पर्श झाला तेव्हां तिची नाडी थाड थाड उघड आहे असें त्याला कळून आलें. कांहीं तरी भयंकर प्रसंगांत ती मुलगी सांपडली असावी असें त्याला वाटू लागलें. परंतु त्यानें विचारल्यावरहि ती कांहींएक सांगेना. आपल्या भेटीचा प्रकार गुप्त ठेवण्याबद्दल मात्र तिनें गॅब्रिएलला बजाविलें.

ती मुलगी त्या झाडाजवळच निस्तब्ध उभी राहिली आणि गॅब्रिएल उदास मनःस्थितींतच वेदरबरीच्या खेड्यांत शिरला.



## ८. " गोष्टीं घराकडिल मी वदतां गड्यारे !"



रनच्या दारूदुकानांभोंवतीं आयव्हीच्या वेलानें आच्छादिलेली एक जुनी भिंत होती. पुढील दाराला एक चौकोनी कांच बसविलेली असून त्यांतून बाहिरच्य भिंतीवर शेकोटीचे लाल किरण पडत होते. आंत जमलेल्या लोकांचा आवाज ऐकूं येत होता. ओकनें आपला हात दारावर चांचपडत फिरवला. त्याच्या हाताला एक चामड्याची वादी लागली. त्यानें ती ओढल्यावर आंतील खिटी निघून दार उघडलें. आंतील खोलींत फक्त भट्टींतून येणारा लालसर प्रकाश पसरला होता. भट्टीच्या तोंडाशीं एक पांढऱ्या केसांचा अगदीं जख्ख म्हातारा कलाल बसला होता.

गॅब्रिएल आंत आल्याबरोबर सारें संभाषण एकदम थांबलें. सर्व लोक कपाळाला आंठ्या घालून, डोळे बारीक करून त्याच्याकडे पहात होते. मध्येंच कांहीं लोक जरा विचार करून उद्‌गारले, " अरे हा तर नवा धनगर दिसतोय्. ये ये आंत, तुझं नांव मात्र माहीत नाहीं आम्हांला. "

" राम राम मंडळी; माझं नांव गॅब्रिएल ओक."

म्हाताऱ्या कलालानें आपली मान हळूंहळूं फिरवून म्हटलें, " नॉर्कोंबच्या गेबल ओकचा नातू तर नव्हेस तूं ? "

" माझे वडील आणि आजोबा यांचेंहि नांव गॅब्रिएलच होतें," ओक शांतपणें म्हणाला.

—" आतां कुठें चाललास तूं ! "

" इथंच राहायचा विचार आहे," ओक म्हणाला,

म्हातारा म्हणाला, " अरे कैक वर्षे तुझे आजोबा, तुझी आजी, तुझा बाप या साऱ्यांना ओळखत होतों मी. माझा मुलगा जेकब आणि तुझे वडील अगदीं सख्या भावासारखे वागत. यानंतर इतर कुशल प्रश्न होऊन म्हाताऱ्याच्या मुलानें ओकपुढें सायडर पेयानें भरलेला एक मोठा अगदीं जुनाट पेला आणून ठेवला. त्यांतील सायडर, ( ॲपल फळांचा रस ) आतां चांगली गरम झाली होती. तो पेला बाहेरून राखेनें माखलेला असला तरी आंतून चांगला स्वच्छ होता. " पाहुण्यासाठीं स्वच्छ पेला आणा " असा म्हाताऱ्यानें हुकूम सोडला तेव्हां ओकनें म्हटलें, " राख, माती स्वच्छ असेल तर त्याबद्दल माझी कधींच तक्रार नसते, असूं द्या हाच " असें म्हणून त्यानें तो पेला तोंडाला लावून एक घोट घेतला आणि तो आपल्या शेजाऱ्याकडे सरकवला. ओकच्या या समजूतदारपणाची प्रशंसा झाली.

यानंतर इतर काहीं लोकांनीं त्या पेयाचे घोट घेतल्यावर 'जोसेफ पुअरग्रास याला अजून थेंबहि मिळाला नाहीं' असें जॉन कोगन नांवाचा एक थट्टेखोर शेतकरी म्हणाला. पुअरग्रास हा गृहस्थ फार लाजाळू असल्यानें साऱ्यांच्या थट्टेचा विषय झाला होता. जेकब स्मॉलबरी त्याला म्हणाला, " काय जोसेफ ! तूं आपल्या बायकोच्या तोंडाकडेहि वर मान करून पहात नाहींस म्हणे ! "

लाजून चूर होत जेकब म्हणाला, " नाही बुवा ! तिच्याकडे मी फारसं पाहिलंच नाहीं. अन् जेव्हां पाहिलं तेव्हांहि मी अगदीं लाजून लालबुंद झालों होतो. " म्हातारा त्याला छेडीत म्हणाला, " ही लाजण्याची संवय फार जुनी नाही कां ? "

" खरं आहे. अगदीं लहानपणापासून. माझ्या आईला त्याबद्दल फार हळहळ वाटे.

" हा प्रकार थांबविण्यासाठीं कधीं चारचौघांत जाऊन तसा प्रयत्न केला होतास कां पुअरग्रास ? "

जेकब उत्तरला, " अहो सगळ्या प्रकारच्या लोकांत वावरून पाहिलंय मी. ग्रीन हिलच्या जत्रेंत सर्कसला नेलं होतं मला; तिथं कांहीं बायका अगदीं अपुऱ्या वस्त्रानिशीं, घोडदौड करीत होत्या, घोड्यावर उभ्या राहिल्या होत्या. पण या प्रकारानें माझा लाजरेपणा रेसभर कमी झाला नाहीं. लाजरेपणा आमच्या कुटुंबांत वंशपरंपराच चालत आला आहे.

जॉन कोगन म्हणाला, " बरं कां, हा मनुष्य फार भित्राहि आहे. एकदां स्वारी चांगली तर्र होऊन यालबरीच्या जंगलांतून घरीं यायला निघाली होती.—"

लाजाळू पुअरग्रास आपली अस्वस्थ मनःस्थिति लपविण्या-साठीं तोंडावर बळेंच हसूं आणीत म्हणाला, " नको, ती गोष्ट सांगूं नको. " तिकडे लक्ष न देतां कोगन पुढें म्हणाला, " अन् जंगलांतून जातां जातां राजेश्री वाट चुकले. मध्यरात्र झाली, जंगलांत यांना वाट सांपडेना आणि मग घाबरून लागले कीं ओरडायला. " एक माणूस चुकला आहे ! माणूस चुकला आहे हो ! " शेजारच्या झाडावर होतें एक घुबड ओरडत " हु ऽ हु ऽ हू ! " अन् जोसेफला वाटलं. आपल्यालाच, " कोण आहे हो " म्हणून विचारलं त्यानं. थर थर कांपत म्हणतो कसा, " मी—मी—जोसेफ पुअरग्रास—वेदरबरीचा आहे, रावसाहेब ? "

हे भित्रे रावसाहेब यावर मात्र धीटपणानें म्हणाले, " छे ! छे ! हें फार झालं. मी अगदीं शपथ घेऊन सांगतों. ह्या पक्ष्याला रावसाहेब कधींच म्हटलं नाहीं. मी नुसतं म्हटलं, ' वेदरबरीचा जोसेफ पुअरग्रास. ' अन् मीं नशापाणी केलं नसतं तर तेंहि म्हटलं नसतं. "

यानंतर थोडा वेळ शांतता पसरली. गॅब्रिएलनें प्रश्न केला " राहायला हें ठिकाण कसं काय आहे ? अन् मालकीण कशी आहे ? "

जॉन कोगन म्हणाला, " आम्हांला तिची फारच थोडी माहिती आहे. फार थोडे दिवस झाले ती इथं आल्याला. तिचा काका तसा बरा माणूस होता—बायका पोरं कांहीं नव्हतीं त्याला. " आणि मग जॉन

कोगननें या काकाच्या घरीं आपण भरपूर दारू कशी झोंकत .होतों वगैरे गोष्टींचें पुराण सुरू केलें. त्याला मुद्द्यावर आणण्यासाठीं ओकनें विचारलें, " या एव्हरडीन बाईच्या आईबापांशीं ओळख होती कां कोणाची ? "

म्हातारा कलाल म्हणाला, " तिचा बाप होता आपला साधासुधा, पण तिची आई मात्र फार देखणी होती. त्याला तिचं इतकं कौतुक वाटे कीं तिला पहाण्यासाठीं रात्रींतून तीन वेळां दिवा लावून तो तिच्याकडे पाही ! "

जॉन कोगननें ती माहिती पुढें चालू केली, " एव्हरडीन बाईचा बाप फार चंचल मनाचा पण त्याचा इलाज नव्हता त्याला. तो मला म्हणे; हिच्याहून कोणी आणखी देखणी बायको असावी अशी नाहीं माझी इच्छा. पण काय करूं, ती माझी सरोची बायको म्हणूनच मन ओढ घेत दुसरीकडे. अखेर तो काय करी, बायकोला लग्नाची आंगठी काढून ठेवायला सागे. तिच्याजवळ बसला म्हणजे लग्नाआधीच्या नांवानें तिला हांक मारी; जसं कांहीं लग्न झालंच नाहीं; असा वागला म्हणजे मग त्याला प्रीति वाटूं लागे तिच्याबद्दल. अशा रीतीनें दोघं गोडीनें राहिलीं "

मध्येंच एक दुसरा माणूस म्हणाला, " त्यांची मुलगी लहान होती तेव्हां नव्हती दिसत इतकी देखणी. "

" तिचा चेहरा जितका गोड आहे तितका स्वभाव गोड असला म्हणजे झालं, "

यानंतर संभाषणाचा ओघ हा म्हातारा जख्ख कलाल किती वयाचा असावा या विषयाकडे वळला. त्याची भरपूर चर्चा संपते तों एका माणसाला ओकच्या खिशातील बांसरीचें टोंक दिसलें. तो म्हणाला, " कॅस्टर-ब्रिजच्या बाजारांत तुलाच पाहिला होता नव्हे कां, बांसरी वाजवतांना ?"

गॅब्रिएल जरा शरमून म्हणाला, " तुम्ही पाहिलं तें खरंच. फार अडचणींत असल्यानं मला तसं करावं लागलं, आजच्याइतका गरीब नव्हतों मी पूर्वी. "

मार्क क्लार्क म्हणाला, " धीर सोडूं नको. दमानें घे, तुझीहि वेळ येईल. बाकी दमला नसलास तर होऊं दे एकादं गाणं."

गॅब्रिएलनें आपली बांसरी काढून एक लोकप्रिय चटकदार गाणें तीन वेळां वाजविलें. त्याची वाजविण्याची रीत मोठी आकर्षक असून तो मधूनच अंगाला जरा झटके देई आणि पायानें ताल धरी. " वा ! बांसरी तर फार छान वाजवायला येते याला " एका श्रोता म्हणाला.

मार्क क्लार्कनें पुरवणी जोडली, " बाकी बांसरी वाजवतांना अशी वांकडींतिकडीं तोंड केल्यानें माणूस एखाद्या बुजगावण्यासारखा दिसतो हें मात्र वाईट आहे."

जोसेफ पुअरग्रास मवाळपणें म्हणाला, " एरवी धनगर दादा तसा दिसायला तूं फार उमदा गडी आहेस."

' आहे खरा ' इतर लोकाहि म्हणाले.

ओकनें मात्र मनाशीं निश्चय केला की, बाथशीबासमोर आपण कधीं बांसरी वाजवायची नाहीं.

हळूं हळूं तेथें जमलेले लोक निघून गेले. जॉन कोगननें गॅब्रिएलला आपल्या घरांत निवारा दिला होता. त्याच्याबरोबर तो निघून गेला.

बाकी राहिलेले लोकाहि निघून जाण्याच्या विचारांत असतां थोड्या वेळानें फ्रे नांवाचा एक माणूस घाईघाईनें तेथें परत आला. त्याची बावरी चर्या पाहून जोसेफनें विचारलें, " अरे काय भानगड आहे ! "

—" तो पेनीवेज दिवाणजी ! तरी मी म्हटलं होतंच!"

—" काय ! कांहीं चोरी-बिरी करतांना सांपडला कां तो !"

" हो ! चोरी करतांनाच. म्हणजे असं झालं. एव्हरडीनबाई

घरीं गेल्यावर सारा बंदोबस्त ठीक आहे कीं नाहीं हें पहायला निघाली होती. ती आंत जाऊन पहाते तों पेनीवेज् दिवाणजी अर्धा बुशेल बार्ली पिशवींत घेऊन कोठाराच्या पाय-या दबत दबत उतरत होता. अन् मग ती जी माजरीसारखी त्याच्या अंगावर धांवली म्हणतां— शेवटीं थोडक्यांत सांगायचं म्हणजे जेव्हां आपण खटला-बिटला भरत नाहीं म्हणून तिनं सांगितलं तेव्हां दिवाणजींनीं कबूल केलं कीं, आपण एकंदरींत पांच पोतीं बार्ली पळवली म्हणून. लगेच त्याची उचलबांगडी झाली. आतां प्रश्न असा कीं नवा दिवाणजी कोण होणार ?"

ही बातमी सांगून हेनरी फ्रे तो जुनाट पेला रिकामा करतो तोंच सुसान टॉलचा नवरा अधिकच घाईत तेथें आला. "सगळीकडे झालेली बातमी ऐकली का तुम्ही !" तो विचारूं लागला.

—"पेनीवेज दिवाणजबिद्दलचीच ना ?"

—"पण त्याशिवाय दुसरी !"

सारे म्हणाले, "छे, कांहीं एक नाहीं—लेशमात्र नाहीं."

"एव्हरडीन बाईची सर्वांत लहान वयाची मोलकरीण फॅनी रॉबिन हिचा पत्ता लागत नाहीं. दोन तास झाले, तिच्यासाठीं कड्या कुलपं लावायला सारे खोळंबलेत. त्यांत गेले कांहीं दिवस ती फार उदास दिसत होती. म्हणून साऱ्यांना काळजी. जिवाचं कांहीं बरं वाईट केलंन् कीं काय पोरीनं ?"

जोसेफ घाबरून म्हणाला, "जळाली असणार ती"

टॉल म्हणाली, "बुडाली असणार ती"

बिली स्मॉलबरी तपाशिलांत शिरत म्हणाला, "बापाचा वस्तरा फिरवला असेल तिनं गळ्यावरून."

'आतां झोंपायला जाण्याआधीं आपल्यापैकीं दोघांतिघांशीं

एव्हरडीन बाईला बोलायचं आहे कांहीं तरी. ही दिवाणजीची भानगड आणि त्यांत या पोरीची भर. बाईला वेड लागायची पाळी आलीय्.'

हे सारे शेतकरी गल्लींतून पुनः बाथशीबाच्या वाड्याकडे निघाले. ते तेथें पोहोंचल्यावर बाथशीबा त्यांना खिडकींतून म्हणाली, " उद्यां सकाळीं दोघं तिघं भोंवतालच्या खेड्यांतून तपास करून या. फॅनी रॉबिन कोणाला दिसली होती कां याची चौकशी करा. आपण सारे आग लागलेल्या जागीं होतों तेव्हांच तो निघून गेली असावी. "

जेकब स्मॉलबरीनें विचारलें, " आपल्या भागांत कोणी तरुण येत असे कां तिच्याकडे ? "

बाथशीबा म्हणाली. " मला माहीत नाहीं; पण हें फारसं शक्य दिसत नाहीं. कोणी सभ्य पोरगा तिचा प्रियकर असता तर तो वाड्याकडे आला असता. मेरी ॲन म्हणते कीं डोक्यावर कांहीं घातल्याशिवाय नुसत्या नेसू वस्त्रानिशी ती बाहेर पडली होती. यामुळेंच मला फार भीति वाटते "

शेजारच्या खिडकींतून मेरी ॲनचा आवाज आला, " मला नीटसं दिसलं नाहीं पण तिच्याबरोबर एक गाठोडं असावं असं वाटतं मला. या बाजूला कोणी तरुण नव्हता तिच्यामागें. तिचा प्रियकर एक शिपाई असावा. तो कॅस्टरब्रिजमध्यें रहातो. "

बाथशीबानें विचारलें, " तुला ठाऊक आहे त्याचें नांव ? "

" नाहीं बाईसाहेब. तिनं अगदीं गुप्त ठेवलं होतं तें " मेरी ॲन म्हणाली.

विल्यम् स्मॉलबरी म्हणाला, " कॅस्टरब्रिजच्या बराकींत गेलों तर कदाचित् मला शोध करतां येईल याचा. "

बाथशीबा उत्तरली " ठीक आहे. फॅनी उद्यां परत आली नाहीं तर हा माणूस कोण आहे याचा जाऊन शोध कर आणि त्याची भेट

घे. तिला कोणी मित्र नाहींत कीं सगेसोयरे नाहींत म्हणून मला जास्त जबाबदारी वाटते. अशा एखाद्या माणसाच्या नादीं लागून कांहीं नुकसानीत न सांपडो बिचारी. आणि त्यांत अधिक ही दिवाणजींची भानगड, पण त्याच्याबद्दल आतां बोलवत नाहीं मला. ठीक आहे, मी सांगितल्याप्रमाणें करा तुम्ही." असें म्हणून तिनें खिडकी लावून घेतली.

—"होय बाईसाहेब" म्हणून सारे कुणबी निघून गेले.

त्या रात्रीं कोगनच्या घरीं गॅब्रिएल ओकच्या मिटलेल्या डोळ्यांपुढें अनेक कल्पना नदीच्या प्रवाहासारख्या वहात होत्या. रात्रीच्या वेळींच बाथशीबाची मूर्ति त्याच्या डोळ्यांपुढें ठशठशीतपणें दिसे. आतांहि तिच्या-बद्दल तो हळुवारपणें विचार करीत होता. या विचाराबरोबरच नोकोंबहून आपलीं थोडीं भांडींकुंडी आणि पुस्तकें घेऊन येण्याविषयींचे बेतहि तो आंखीत होता. त्याच्या संग्रहीं असलेली पुस्तकें अगदीं मोजकीं असलीं तरी त्यांच्या सतत अभ्यासानें त्यानें भरपूर माहिती मिळविली होती. आपलें सामान आणून वेदरबरी येथें तो नव्या जीवनाला सुरुवात करणार होता.



## ९. "हा कोण गडे आला?"



कच्या नव्या मालकीणीचें घर म्हणजे एक जुनाट वाडा होता. त्याच्या दर्शनी भागाच्या भिंतींत दगडी खांब बसविले असून फरसबंदीवर, भोंवतालच्या घरांच्या वळचणीवर पिवळट रंगाचें शेवाळ आणि कांहीं वनस्पती यांची वाढ झाली होती. दारासमोरील खडी व वाळू टाकलेल्या रस्त्याच्या बाजूंनाही असेंच हिरवट रंगाचें शेवाळ वाढलें होतें.

या वाड्यांतील जिना मक्कम ओक लांकडाचा असून त्याचे कठडे देखील जाडजूड आणि पलंगाच्या कांतीव खुरांसारखे होते. तो जिना गोल वळणें घेत वर चढत गेला होता. वरच्या मजल्यावरील फळ्यांत किड्यांनीं पोखरून असंख्य भोकें पाडलीं होतीं. एखादें दार उघडलें किंवा लावलें कीं त्याबरोबर आंतली एखादी खिडकी तसाच आवाज करी. कोणी भरभर चालूं लागलें कीं घर हालू लागे आणि चालणाऱ्यामागून फळ्यांचा करकर आवाज येई.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं बाथशीबा आणि तिची मोलकरीण लिडी स्मॉलबरी या खालीं बसून कागदपत्रें, पुस्तकें बाटल्या वगैरे जुन्या वस्तूंतून निवड करीत होत्या. वाड्याच्या पूर्वीच्या मालकाच्या या साऱ्या वस्तू होत्या. अर्धवट उघडलेल्या दारांतून मेरी ॲनच्या खराट्याचा आवाज येत होता. मध्येंच बाथशीबा म्हणाली, "तुझं झाडणं जरा थांबीव. आवाज येत आहे कसला तरी. खराटा थांबल्यावर वाड्याकडे येणाऱ्या घोड्याच्या टापा ऐकूं येऊं लागल्या. दारावर कोणीतरी चाबकाच्या दांड्यानें टकटक असा आवाज करीत होतें.

मेरी ॲन, लिडी आणि बाथशीबा या साऱ्याच धुळीनें

माखल्या असल्यानें अखेर स्वयंपाकघरांत असलेल्या कोगन नांवाच्या बाईनें पुढें होऊन दार उघडलें. दाराबाहेरून एक घनगंभीर आवाज आला, " मिस् एव्हरडीन आहेत कां घरीं ? "

--" बघून येतें रावसाहेब ' असें म्हणून कोगनबाई बाथशीबाच्या खोलींत आली.

स्त्रियांच्या बाबतींत त्यांची वेषभूषा म्हणजे त्यांच्या चेहेरेपट्टीचाचएक भाग असतो. कपडे अस्ताव्यस्त असणें म्हणजे चेहेऱ्यावर विद्रूपपणा किंवा जखम झाल्यासारखेंच. बाथशीबा एकदम म्हणाली, " माझ्या या अशा अशा अवस्थेंत मला नाहीं भेटतां येणार त्याला. आता काय करावं ? "

लिडीनें सुचविलें, " त्याला सरळ निरोप पाठवा, धुळीनें माखून अगदीं सोंग झाल्यानें मला खालीं येतां येत नाहीं म्हणून. "

— कोगनबाईनें खालीं येऊन निरोप सांगितला, "बाईसाहेब बाटल्या बिटल्या झाडताहेत अन् धुळीनें माखल्या आहेत. "

" ठीक आहे, मला एवढंच विचारायचं होतं फॅनी रॉबिनबद्दल कांहीं बातमी कळली कां ! " त्या मनुष्यानें अगदीं सहजपणें म्हटलें.

—' नाहीं रावसाहेब, पण आज रात्रीं कळेल बहुधा; चौकशी चालूं आहे "

घोड्याच्या टापांचा आवाज दूर दूर होत गेला आणि दार बंद झालें. बाथशीबानें विचारलें, " हा बोल्डवुड कोण ! "

" वेदरबरी बुद्रुक इथला एक जमिनदार शेतकरी आहे.

—" विवाहित ! "

—" नाहीं बाईसाहेब. "

—“ वय काय त्याचें ? ”

—“ चाळीस असावें. चागला देखणा, श्रीमंत, दिसायला जरा करडा आहे तो. ”

—“ फॅनीबद्दल कां चौकशी करतो हा ? ” बाथशीबानें विचारलें.

—“ बाळपणापासून तिला कोणी आप्तमित्र नसल्यानें त्यानेंच तिचा सांभाळ केला, शिक्षण दिलं आणि तुमच्या काकाच्या घरीं कामाला लावलं. तसा तो फार मायाळू आहे. पण—”

—“ पण काय ? ”

—“ बायकांच्या बाबतींत फार चमत्कारिक. पंचक्रोशींतल्या झाडून साऱ्या मुलींनीं त्याच्यासाठीं खटपट करून पाहिली. पण त्यानं कोणाला दाद म्हणून दिली नाहीं. ”

बाथशीबा त्रासून म्हणाली, “ आज हा सारा काय गोंधळ चाललाय् ! मेरी ॲन तूं आपली जा झाडायला, नाहीं तर कर दुसरं काहीं तरी. मला त्रास देण्यापेक्षा लग्न करून मोकळी कां झाली नाहींस आतांपर्यंत ?’

मेरी ॲन म्हणाली, “ बाईसाहेब मी नको कां म्हटलं होतं ? पण गरीब मला नको होता, अन् श्रीमंताला मी नको होतें—म्हणून मी राहिलें अशी त्रिशंकुसारखी अधांतरी ”

लिडीनें धीर करून बाथशीबाला प्रश्न केला, “ पण बाईसाहेब, तुम्हाला कोणी घातली होती कां मागणी ? ”

बाथशीबा प्रथम बोलणार नव्हती. पण शेवटीं बोलण्याचा मोह होऊन ती म्हणालीच, “ एका माणसानें मला घातली होती मागणी. ” हे शब्द बोलतांना किसान ओकची मूर्ति तिच्या डोळ्यांसमोर उभी राहिली.

लिडीनें उद्गार काढला, “ किती छान ! अन् तुम्ही त्याला

नकार दिला नाहीं कां ? "

" माझ्या तोलाचा नव्हता तो. "

" असं तोऱ्यानं सांगतां येणं म्हणजे किती छान असेल नाहीं ! नाहींतर आमच्या सारखींना कोणी विचारायचा अवकाश कीं ' होय ' म्हणून आम्ही मोकळ्या व्हायच्या. तुम्ही मात्र सांगितलं असेल ' मी तुमच्यापेक्षां वरचढ आहे ' नाहींतर चक्क सुनवलं असेल ' माझं खेटर अडलंय तुझ्य'शीं लग्न करायला. ' पण काय बाईसाहेब, तुमचं मन होतं कां त्याच्यावर ? "

" छे, मला तो तसा थोडा आवडत असे खरा. "

" आतांहि आवडतो कां तो ? "

" छे, अर्थात् नाहीं. पण हीं कोणाचीं पावलं वाजताहेत, ? ,' बाथशीबानें विचारलें. लिडीनें मागच्या खिडकींतून अंगणांत पाहिलें. कामगारांची एक रांग मागील दाराकडे येत होती. बाथशीबानें सांगितलें, " मेरी ॲनी त्याना स्वयंपाकघरांत बसवून ठेव मी कपडे करीपर्यंत, आणि मग पाठवून दे दिवाणखान्यांत. "



# १०. “ जोहार ! मायबाप जोहार ! ! ”



र्ध्या तासानंतर बाथशीबा नीटनेटके कपडे करून लिडी-बरोबर दिवाणखान्यांत आली. खालच्या बाजूला सारे लोक जमले होते. एका टेबलाशीं बसून बाथशीबानें कामगारांचें हजेरीपुस्तक उघडलें आणि पैशाची थैली शेजारीं ठेवली. बाथशीबा नोकरांना उद्देशून म्हणाली, “ प्रथमतः मला दोन गोष्टी सांगायच्या आहेत. पहिली म्हणजे चोरी केल्यामुळें दिवाणजीला मी कामावरून काढून टाकलं आहे. आतां दिवाणजीशिवायच मीच सारा कारभार पहाणार आहे. दुसरी गोष्ट म्हणजे फॅनीबद्दल ऐकलं आहे कां कोणी कांहीं ?

—“नाहीं बाईसाहेब, ” सारे म्हणाले.

“ विल्यम् स्मॉलबरी गेला का कॅस्टरब्रिजला ?” बाथशीबानें विचारलें.

“ होय बाईसाहेब, सहा वाजतां येतों म्हणून निश्चितपणें म्हणाला होता तो, पण अजून आला नाही. ”

घड्याळांत पाहून बाथशीबा म्हणाली, “ आतांशीं पावणे सहा होत आहेत. येईल तो एवढ्यांत. बरं जोसेफ पुअरग्रास हजर आहे कां ? ”

“ होय रावसाहेब – नव्हे – बाईसाहेब. ”

“ तूं काय काम करतोस ? तुझा पगार काय ? ”

“ छकड्यावर असतों मी वर्षभर; शिवाय पेरणीच्या वेळी पांखरांना हांकून देणं वगैरे कामं करतों मी. नऊ शिलिंग, नऊ पेन्स माझा

पगार. ”

“ बरोबर ! हा तुझा पगार, आणि वर बक्षिशी म्हणून हे दहा शिलिंग नवी वहिवाट सुरू झाल्याबद्दल. ”

अशा रीतीनें अनेक गडी, बायका यांनीं आपापली हजेरी लावून पगार घेतला. शेवटीं हेनरीनें सुचविलें, “ आपल्या नव्या धनगराच्या हाताखाली एक गडी पाहिजे. केनी बॉल नांवाचा पोरगा चालेल. ”

ओककडे वळून बाथशीबा थंडपणें म्हणाली, “ ठीक, गॅब्रिएल ओक ! तुझा मदतनीस हा केनी बॉल. तुझं काम नीट ध्यानांत आलं ? ”

—दाराशी उभा असलेला ओक म्हणाला, “ आलं आहे एव्हरडीन बाई ! जें माहीत नाहीं त्याबद्दल मी चौकशी करीन. ” बाथशीबा इतक्या थंडपणे बोलते याचें त्याला आश्चर्यच वाटलें. गतगोष्टीं ज्याला माहीत नाहींत त्याला सांगूनहि खरें वाटलें नसतें कीं ओक आणि त्याच्या समोरची सुंदर स्त्री याचा कधीं पूर्वपरिचय असेल म्हणून.

पडवीत कोणाचीं तरी दाणदाण पावलें वाजूं लागलीं आणि सारे एकदम म्हणाले “ हा विली स्मॉलबरी आला कॅस्टरब्रिजहून. ” दिवाण-खान्यांत येऊन विल्यम् आपलें तोंड पुशीत उभा राहिला. त्याचे बूट बर्फानें माखले होते.

“ काय बातमी आहे ? ” बाथशीबानें त्याला विचारलें.

“ बाईसाहेब ! थोडक्यांत सांगायचें म्हणजे ती लष्कराबरोबर पळून गेली आहे. मी कॅस्टरब्रिजच्या छावणींत गेलों तेव्हां तिथले लोक म्हणाले ‘ अकरावं घोडदळ आतांच निघून गेलं आणि नवीन पलटण तिथ आली आहे. हें अकरावं घोडदळ आपल्या खेड्यावरूनच पुढं गेलं. ”

गॅब्रिएल लक्षपूर्वक ऐकत होता. तो म्हणाला “ त्यांना जातांना मी पाहिलं ”

विल्यम म्हणाला, “ रस्यांतून बँड वाजवीत ते गेले खरे. ”

" बरं त्या माणसाचं नांव कळलं कां तुला ? "

" नाहीं, कोणालाच माहीत नव्हतं तें. पण तो साध्या शिपाया-पेक्षां वरच्या दर्जाचा असावा असं वाटतं मला. "

बाथशीबा म्हणाली, " आज रात्रीं तरी आणखी कांहीं बातमी मिळेलसं वाटत नाहीं मला. तुमच्यापैकीं कोणी एक बोल्डवुडकडे जा आणि आपल्याला कळलं तेवढं त्याला सांगा. " बाथशीबा उठून उभी राहिली. कामगाराचा निरोप घेण्यापूर्वीं डौलदारपणें तिनें त्यांना चार शब्द सांगितले. ती म्हणाली, " आतां नीट लक्षांत ठेवा. मालकाऐवजीं मालकीण आहे तुम्हाला. अजून या कामात मी नीटशी रुळलें नाहीं. पण माझ्याकडून होईल तितका कसोशीनें प्रयत्न करणार आहे मी. तुम्ही नीट मनोभावानें चाकरी केली तर मीहि तुमच्या कामाचं चीज करीन. तुमच्यांत कोणी कामचुकार नसतील असं धरून चालतें मी. पण असलेच तर त्यांनीं असं बिलकूल समजूं नये कीं या बाई माणसाला चांगलं काम आणि वाईट काम यातला फरक कळणार नाहीं म्हणून ! "

" छे छे ! असं होणार नाहीं बाईसाहेब " सारे उद्गारले.

बाथशीबा पुढें म्हणाली " तुमच्या अगोदर मी उठणार आहे. तुम्ही शेतावर येण्याआधीं मी न्याहारी आटोपून तेथें जाऊन पोहोंचेन. थोडक्यांत म्हणजे माझ्या कामगिरीनें तुम्हाला नवलच वाटेल. " सारे ' राम राम ' करून निघून गेल्यावर त्याच्यावर अधिकार गाजविणारी ही चिमुकली मूर्ति दिवाणखान्यातून ऐटीनें बाहेर पडली.

~~~

*
~~~

# ११. " सख्या मी तुझी कधीं होणार ? "



दरबरीच्या उत्तरेला असलेल्या शहरांतील ती एक सैन्यांतील छावणी होती. छावणींतील बराकीभोंवताली एक उंच भिंत असून जवळूनच एक नदी वहात होती. ती हिंवाळ्यांतील एक अंधारी रात्र असून सारखा हिमवर्षाव होत होता, आणि सारें वातावरण उदास होतें. अंधारलेल्या आणि ढगांनीं भरलेल्या आभाळांतून शुभ्र हिमाचे पुंजकेच्या पुंजके जमिनीवर येऊन पडत आणि वितळून जात. जमीन पुनः होती तशी खडकाळ आणि उघडी दिसे.

त्या अंधाऱ्या रात्रीं हा सारा देखावा अगदीं अंधुक असा दिसत होता. नदीच्या सपाट भागावर ती भिंत सरळ रेषेसारखी उभी राहिली होती. त्यामागील बराकी अस्पष्ट, लंब-चौकोनासारख्या दिसत असून वरच्या मजल्यावरील चौरस खिडक्यांच्या आकृत्या अंधुकपणें दिसत होत्या. मधूनच दबलेल्या आवाजांतले दहा ठोके पडले. हळूं हळूं हिमवर्षाव कमी होऊं लागला. अशा वेळीं एक मनुष्याकृति नदीच्या तीरावर येऊन उभी राहिली.

" एक-दोन- तीन—चार—पांच "

असे आंकडे मोजीत ती आकृति कांहीं पावलें पुढें सरली. ती बराकीच्या खिडक्या मोजीत असावी. खालीं वांकून तिनें बर्फाचा एक गोळा उचलून पांचव्या खिडकीच्या रोखानें फेंकला. प्रथमतः असे कांहीं गोळे नेम चुकून दुसरीकडेच पडले. अखेर एक तुकडा पांचव्या खिडकीवर जाऊन आदळला. एक दोन वेळां असें झाल्यावर खिडकी उघडण्याचा आवाज येऊन आंतून एका मनुष्यानें विचारलें, " कोण आहे तें ? " हा प्रश्न सराईत आवाजांत आलेला होता. लष्करांतील शिपायांनीं लग्न करणें अधिकाऱ्यांना आवडत नसल्यानें अशा चोरून मारून भेटीगांठीं यापूर्वी

अनेकदां झाल्या असाव्या.

नदीपलीकडील आकृतीनें विचारलें, " सार्जेंट ट्रॉय आहेत कां

खिडकींतून आवाज आला, " होय, कोणती मुलगी तूं ? "

" फ्रँक ! मला ओळखलं नाहींस ? मी तुझी पत्नी, फॅनी रॉबिन. "

भिंतीमागून आश्चर्याचा उद्‌गार आला, " फॅनी ! तूं कशी आलीस इथें ? "

" तुमच्या खोलीची खिडकी कोणती म्हणून मी चौकशी केली."

—" तूं येशील अशी कल्पना नव्हती मला. उद्यां मी कामावर आहे. "

" तूंच म्हणालां होतास ' ये ' म्हणून ! मी आल्यानं तुला आनंद झाला नाहीं का फ्रँक ? "

" होय, झाला आहे अर्थात्. "

" तुला येतां येईल का माझ्याजवळ ? "

"छे ! छे ! बिगुल वाजला, दारं बंद झालीं. मला रजा नाहीं आतां. उद्यां सकाळ होईपर्यन्त आम्ही सारे तुरुंगांत आहोंत असंच म्हणेनास ! बरं तूं आलीस कशी इथं वेदरबरीहून ? "

" थोडं चालत, थोडं छकड्यांत बसून. "

" आश्चर्य आहे ! "

" अन् फ्रँक, तूं वचन दिलं होतंस तें केव्हां होणार ? "

" आपल्याला बुवा नाहीं आठवत नीटसं, काय म्हणतेस तूं? "

" मागायला हवंच कां ? आपण लग्नं केव्हां करायचं ? "

" आलं ध्यानांत. हें पहा, आधीं तुला चागले कपडे लागतील त्यासाटीं. "

" आहेत माझ्याजवळ पैसे त्यासाठीं. धार्मिक विधीन लग्न करायचं कां परवाना घेऊन ( नोंदणीनें )? "

" धार्मिक पद्धतीनं करावंस वाटतं मला. "

" फ्रॅंक ! तुला वाटेल मी भलती आगाऊ आहे. " ती आकृति म्हणाली, " पण माझं प्रेम आहे तुझ्यावर. कितीतरी वेळां तू मला सांगितलस आपण लग्न करूं म्हणून अन् मी—" बोलतां बोलता तिला रडूं कोसळलें.

" रडूं नको आतां. नुसता मूर्खपणा आहे हा. लग्न करीन म्हणून मी सांगितलं असलं तर खरोखर करीनच मी तसं. "

" बरं. मग आपल्या लग्नाची सूचना देऊं मी माझ्या भागांतल्या देवळात ? तूं देशील तुझ्या भागांत ? उद्यां ? "

" उद्या नव्हे, थोड्या दिवसांनीं ठरवूं आपण. "

" अधिकाऱ्याची ( लग्नाला ) परवानगी काढलीस तूं ? "

" नाहीं ! अद्याप नाहीं. "

" असं कसं झालं ? "

" खरं म्हणायचं तर मी विचारायलाच विसरलों. तुझं इथं येणं अगदीं अनपेक्षित आहे. "

" होय आहे खरं असं. उगीच त्रास दिला मी तुला. मिसेस् ट्रीलकडे उतरलें आहे मी. उद्यां येऊन भेटशील मला ? इथं छावणीभोंवताली वाईट चालीच्या बायका फिरतात नेहमीं. मी इथें आलें तर मीहि त्यांतलीच आहे असें वाटेल साऱ्याना. "

"बरोबर आहे ! मीच येईन तुला भेटायला. अच्छा, नमस्ते."

खिडकी बंद करण्याचा आवाज आला आणि नदीपलीकडील ती लहानशी आकृति निघून गेली. त्यानंतर, "वा ! वा ! सार्जेंट" म्हणून मोठ्यानें हंसण्याचा आणि कोणीतरी त्याला दटावीत असल्याचा अस्पष्ट आवाज आला. सगळीकडे हंशा पिकला आणि अखेर तो आवाजहि नदीच्या भोंवऱ्यांच्या आवाजांत मिसळून गेला.



## १२. "तुझी रे सारी उलटी तऱ्हा !"



शेतांतील व्यवस्था स्वतः पहाण्याचा बाथशीबानें निर्णय घेतला त्याचें पहिलें प्रत्यंतर म्हणजे त्यानंतरच्या बाजारच्या दिवशीं ती स्वतः कॅस्टरब्रिजच्या दाणेबाजारांत जाऊन हजर झाली.

या बाजारांत व्यापाऱ्यांची गर्दी झाली असून सारे एकमेकांशीं बोलत होते. बहुतेकांच्या हातांत लवचीक 'ॲश'

झाडाच्या छड्या होत्या. डुकरें, मेंढ्या, आणि पाठमोरे असलेले शेजारी यांना डिंवचण्यासाठीं त्या छड्यांचा उपयोग होत असे. सौदा जमवायचा म्हणजे प्रत्येक व्यापारी ती छडी बगलेंत दाबून, तळहातावर मूठभर धान्य नमुन्याच्या पिशवींतून काढून दाखवी. त्याची नीट तपासणी झाल्यावर तें धान्य जमिनीवर फेंकून दिलें जाई. त्या शहरांतल्या अर्धा डझन कोंबड्या याची वाटच पहात असून लगेच त्या धान्यावर झडप घालीत.

या साऱ्या जाडजूड शेतकऱ्यांच्या गर्दींत एकाच स्त्रीची आकृति चपळाईनें इकडून तिकडे फिरत होती. तिचा पोशाख नाजुक आणि नीटनेटका होता. धडधडत्या भट्टया पेटत असलेल्या जागेंत एखादी थंडगार झुळूक खेळावी तसा परिणाम बाथशीबाच्या अस्तित्वानें तेथें घडून आला होता. तिनेंहि आपल्या नमुन्याच्या छोट्या पिशव्या आणल्या होत्या. हळूं हळू तीहि सराईतपणें तळहातावर धान्य ओतून, कॅस्टरब्रिजमधील पद्धतीप्रमाणें गिऱ्हाइकांच्या डोळ्यांसमोर धरूं लागली.

बाथशीबाच्या एकंदर चेहेरेपट्टीवरून आणि एका उंच माणसाशीं तिने घातलेल्या वादावरून तेथील लोकांना वाटूं लागलें कीं ही पोरगी चिमुरडी दिसली तरी तिच्यांत भरपूर दम आहे.

बहुतेक शेतकरी एकमेकांना विचारीत, " कोण रे ती ? "
" एव्हरडीन जमिनदाराची पुतणी ! वेदरबरीची शेतीवाडी पहाते. दिवाणजीला हांकलून देऊन सारा व्यवहार आपणच पहाणार असं तिनं शपथेवर सांगितलं आहे "

हें ऐकून श्रोता आपली मान हलवी.

पहिला म्हणे, " भारी हट्टी आहे पोर ! हें ठीक नाहीं. पण या जुनाट बाजारांत तिनं चैतन्य आणलं आहे. यासाठींच तिचा अभिमान वाटायला हवा आपल्याला. "

अशा रीतीनें या शनवारच्या बाजारांत बाथशीबाला खरेदी-विक्रींत कितपत यश मिळालें असेल तें अलाहिदा. पण एक मुलगी म्हणून तिने फत्ते मिळाविली यांत मात्र बिलकुल शका नाहीं. सारे तिच्या आकर्षक व्यक्तिमत्वानें भारून गेले होते. याला एकच अपवाद असल्यानें तो मात्र आधिकच उठून दिसत होता. स्त्रियाचें अशा बाबतींकडे बारकाईनें लक्ष असल्यामुळे हा अपवाद तिच्या चटकन् लक्षात आला.

हा मनुष्य सभ्य दिसणारा असून त्याची चेहेरेपट्टी ठसठशीत व रेखीव होती. तो वागण्यांत ताठर असून, त्याची चर्या शांत दिसत होती. गांभीर्य हेंच त्याचें वैशिष्ट्य होतें.

बाजारचे व्यवहार आटोपल्यावर लिडी आणि बाथशीबा यांची धमणी दुडक्या चालीनें घराकडे निघाली. चहा, साखर, कापड वगैरे बाथशीबाने खरेदी केलेल्या जिनसांचीं पुडकीं मागें पडलीं होतीं.

बाथशीबा म्हणत होती. " लिडी ! सुटलें बाई एकदांची या दिव्यातून. आता पुढल्या वेळेला मला नाहीं इतक अवघड वाटणार. कारण साऱ्या पुरुषांनीं मला एकदां पाहून घेतलं आहे. त्याची संवय होईल त्यांना. पण आज सकाळीं मात्र अगदीं लग्नाला उभं राहिल्यागत वाटत होत मला. साऱ्याचे डोळे अगदीं माझ्याकडे लागलेले. "

लिडी उतरली, " मला माहीतच होतं असं होईल. पुरुष मेले असेच डोळे फाडून पहातात बायकांकडे. "

" पण या साऱ्या लोकांत एकच माणूस शहाणा निघाला. त्यानं मुळीच पाहिलं नाहीं माझ्याकडे. चांगला देखणा होता तो. उभार अंगकाठीचा, चाळिशीच्या वयाचा असेल. कोण ग असेल तो ! "

लिडीला या माणसाबद्दल कांहीच कल्पना नसल्यानें बाथशीबा जरा हिमुसली झाली. तिची धमणी जरा पुढें जाते तों एक उमदा घोडा जोडलेली, ठेंगणी–ठुसकी गाडी खूप वेगानें त्याच्या मागून येऊन पुढें गेली. बाथशीबा म्हणाली, " अग तो बघ ! तोच तो ! "

तिकडे एक नजर टाकून लिडी उद्गारली, " अग बाई ! हा तर जमिनदार बोल्डवुड ! मागं तुम्हाला भेटायला आला होता, अन् तुम्ही त्याला भेटूं शकलां नाहींत तोच तो. "

बिलकुल मान बळवून न पहातां, नाकासमोर पहात बोल्डवुड गाडी हांकीत होता. बाथशीबा आणि तिचें सौंदर्य जणू काय त्याच्या गांवींहि नव्हतें. बाथशीबा म्हणाली, " हा माणूस नेहमीं भोंवतालच्या जगापासून अगदीं दूर दूर असल्यासारखा, आणि नेहमीं विचारांत गढल्यासारखा कां वागतो याचं नवल वाटतं मला. " लिडी म्हणाली, " खरं खोटं कोणाला ठाऊक. लोक मात्र म्हणतात कीं तरुण वयांत ही स्वारी चांगलीच रंगेल होती. कोणा स्त्रीनें त्याची प्रेमनिराशा केली तेव्हांपासून झाला हा असा. "

बाथशीबा एकदां म्हणे हें शक्य नाहीं, एकदां म्हणे असें असूं शकेल. लिडी तिच्या साऱ्या बोलण्याला आपली हो ला हो करीत होती. अशा रीतीनें बोलत बोलत त्या दोघीं वेदरबरीला येऊन पोंचल्या.



## १३. " न कळतां पद अग्निवरी पडे. "

ते रा फेब्रुवारी, रविवारची ती दुपार होती.

जेवणखाण आटोपल्यावर बोलायला कोणी नसल्यानें बाथशीबानें लिडीला आपल्या घरीं आपल्याजवळ बसवून घेतलें होतें. हिंवाळ्याचा अंधारलेला दिवस असल्यानें तो वाडा अगदींच उदास दिसत होता. त्यांत बाथशीबानें नवीनच आणलेला पिआनोही कसासाच दिसे. एखाद्या उथळ ओढ्यासारखी लिडीची सारखी बडबड चालली होती. टेबलावर कातडी बांधणीचें बायबलचें पुस्तक पडलें होतें त्याच्याकडे पाहून लिडी म्हणाली " बाईसाहेब ! बायबल आणि एक किल्ली यांच्या सहाय्यानें आपलं लग्न कोणाशीं होणार हें जाणून घेतलंत कां तुम्ही कधीं ?'

बाथशीबा म्हणाली, " पुरे हा चहाटळपणा लिडी. अशा गोष्टी कधीं घडतात कां ? "

लिडी उत्तरली, " हें पहा, कोणी यावर विश्वास ठेवतात, कोणी ठेवत नाहींत. माझा आपला विश्वास आहे बापडीचा. "

एकदम उडी मारून, आपलें पूर्वीचें बोलणें विसरून बाथशीबा उत्साहानें म्हणाली " बरं तर पाहूं या आपण पडताळा ! जा. पुढच्या दाराची किल्ली घेऊन ये. "

तिनें बायबल उघडलें. वाचतांना त्याच्या जुनाट पानांवरून ओळीखालून बोटें फिरविल्यामुळें जागोजाग कागद घांसून गेला होता. ' बुक ऑफ रूथ ' या विभागांतील एक ठराविक कडवें तिनें शोधून काढलें. तें वाचून तिला हुरूप वाटला अन् शरमल्यासारखेंहि झालें. ग्रंथांतलें अमूर्त

ज्ञान आणि मूर्त रूपांतील तिचा मूर्खपणा हीं समोरासमोर आलीं होतीं बाथशीबा लाजली असली तरी तिनें आपला हट्ट चालू ठेवला आणि पुस्तकांतल्या जागीं किल्ली ठेविली. त्याच जागेवर एखादी लोखंडी वस्तु ठेवल्याची एक गंजल्यासारखी खूण दिसत होती. त्यावरून यापूर्वीहि त्या जुनाट ग्रंथाचा कोणीतरी तसाच उपयोग केला असावा असें दिसून येत होतें.

"आतां न हलतां गप्प बसून रहा." बाथशीबा म्हणाली.

तिनें एक कडवें उच्चारलें. पुस्तक फिरवून घेतलें (आणि मनांत कोणत्या व्यक्तीचा विचार येतो हें पाहिलें.) एखाद्या गुन्ह्यांत पकडली गेल्याप्रमाणें ती शरमिंदी झाली. लिडीनें उत्कंठेनें विचारलें, "कोणाबद्दल पडताळा पाहिलांत तुम्ही?"

"मी नाहीं सांगत जा!" बाथशीबा उत्तरली.

यानंतर बोल्डवुड आणि त्याची चर्चमधील बेफिकीर वागणूक या विषयाकडे दोघींचें बोलणें वळलें. बाथशीबा जरा गप्प झाली होती. मध्येंच तिला कांहीं आठवण होऊन ती म्हणाली, "काल मी विकत घेतलेलें * व्हॅलेंटाइनचें कार्ड जवळ जवळ विसरलें होतेंच मी!"

---

[*टीप--व्हॅलेंटाइन ही एक जुनी चाल असे. १४ फेब्रुवारी रोजीं तरुण मुलेंमुली निनांवीं प्रेमकाव्यें एकमेकांना पाठवीत. एकमेकांवर प्रेम असलेल्या युगुलांना ही एक चांगली संधि असे. सही नसली तरी व्हॅलेंटाइनचें कार्ड कोणाकडून आलें याचा त्यांना अंदाज करतां येई. परंतु याखेरीज उगीच गंमत म्हणून तरुण मुलेंमुली कांहींतरी खरडून एकमेकांना अशीं कार्डें पाठवीत. बाथशीबानेंहि केवळ गंमत म्हणून केलेल्या या प्रयोगाचें पर्यवसान किती भीषण झालें आणि त्यामुळें तिलाहि किती मनस्ताप भोगावा लागला हें पुढील प्रकरणांत हार्डीनें परिणामकारक रीतीनें गोविलें आहे.]

" व्हॅलेंटाइन! कोणाला पाठविणार तें बाईसाहेब? बोल्डवुडला कां?"

" छे! टेडी कोगन् या पोराला. त्याला मी कांहींतरी बक्षीस देईन म्हणून म्हटलं होतं. तो चकित होईल हें मिळाल्यानं. माझी लिहिण्याची पेटी आण. आतांच पत्ता लिहून टाकतें मी!"

त्या पेटींतून एक चित्रविचित्र रंगांत रंगविलेलें कार्ड बाथशीबानें बाहेर काढलें. त्याच्या मध्यभागीं वैयक्तिक मजकूर लिहिण्यासाठीं थोडी जागा मोकळी ठेविली होती. बाथशीबा म्हाणाली, " या मोकळ्या जागेंत काय लिहायचं?" लिडी चटकन् म्हणाली, " अशी एकादी कविता लिहा तिथं!"

**गुलाब आहे लाल लाल**
**अन् व्हायोलेट आहे निळं**
**कार्नेशन गोड किती**
**तशी तुझी गोडी अति**

बाथशीबा उत्तरली " हेंच असूं दे. त्या गोंडस मुलाला अगदीं शोभेल असं आहे हें." बारीक वळणदार अक्षरांत तिनें या ओळीं लिहून काढल्या. तें कार्ड पाकिटांत टाकून, पत्ता लिहिण्यासाठीं तिनें शाईत लेखणी बुडविली. लिडीला मात्र अजून रहावत नव्हतें. ती अर्धवट भीत आणि अर्धवट हंसत हंसत धीर करून बाथशीबाला म्हणाली, " हें कार्ड त्या मठ्ठ म्हाताऱ्या बोल्डवुडलाच पाठवलं तर काय बहार होईल, अगदीं चकित होईल तो!"

कांहीं म्हटलें तरी बाथशीबाच्या मनांत बोल्डवुडबद्दल राहून राहून विचार येत होतेच. भोंवतालच्या साऱ्या लोकांनीं आपली वहावा केली असतां या एकाच मनुष्यानें आपल्याबद्दल तुच्छता दाखवावी आणि लिडीसारख्या स्त्रीच्या ती लक्षांत यावी याचें तिला वैषम्य वाटत होतें. थोड्या वेळानें ती सहजगत्या म्हणाली, " आपण नाणें फेंकून ठरवूं या कोणाला कार्ड

टाकायचें तें. पण आज रविवार, आज नाणं फेकणं बरोबर नाहीं."

लिडी म्हणाली, "मग स्तोत्रसंग्रह फेंकूनच ठरवूं या. उघडा पडला तर टेडीला—बंद होऊन पडला तर बोल्डवुडला."

स्तोत्रसंग्रह गरगरत वर गेला आणि खालीं पडला तो बंद असलेल्या स्थितींतच !

बाथशीबानें तिला येत असलेली एक जांभई झांकून लेखणी हातांत घेतली, अगदीं सहजगत्या पत्रावर बोल्डवुडचा पत्ता लिहिला. ती म्हणाली, "मेणबत्ती पेटव. कोणतं सील लावायचं पत्रावर? हें दोन कबूतरांच्या चित्राचें नको. या दुसऱ्यावर कांहीं विनोदी वाक्य आहे म्हणतात, तें लावून पाहूं. तें बरं नसलं तर आणखी दुसरं." लाल भडक लाखेवर खालील शब्द उमटले होते.

"माझ्याशीं लग्न करा!"

त्याच संध्याकाळीं हें पत्र गेलें आणि दुसरे दिवशीं वेदरबरीला बोल्डवुडच्या घरीं जाऊन पोंचलें.

सहज गंमत म्हणून अविचारानें बाथशीबाच्या हातून हें कृत्य घडलें. प्रेमाची माहिती बाथशीबाला होती; पण ती केवळ प्रेक्षक या नात्यानें. प्रेमाविषयींचें तिचें स्वानुभवाचें ज्ञान मात्र अद्याप शून्यच होतें.



## १४ " शर लागला तुझा गे ! "



न्ट व्हॅलेंटाइन दिनाच्या संध्याकाळीं बोल्डवुड नेहमींप्रमाणें शेकोटीजवळ बसून जेवण करीत होता. भिंतिवरील कपाटावर एक घड्याळ असून त्यांवर पंख पसरलेल्या एका गरुडाची मूर्ति ठेवली होती. बाथशीबानें पाठविलेलें पत्र या घड्यांवर ठेविलेलें असून बोल्डवुडची नजर वारवार त्या पत्रावर खिळून रहात असे. त्यावरील " **माझ्याशीं लग्न करा** " हे शब्द त्याला ठसठशीतपणें उठून दिसत होते. बाथशीबानें हे शब्द सहजपणें, विशेष विचार न करतां लिहिले परन्तु बोल्डवुडच्या नीटनेटक्या, सनातनी आणि गंभीर अशा घरांत त्यांना विशेष गांभीर्याचें स्वरूप प्राप्त झालें होतें. हें पत्र सकाळीं हातांत पडल्यापासून बोल्डवुडला वाटूं लागलें कीं आपल्या जीवनाची चिरेबंदी चौकट हळूं हळूं कां होईना, प्रेमाच्या कल्पनेकडे झुकत चालली आहे. लाटांवर तरंगणाऱ्या गवताच्या काड्या पाहून कोलंबसला ज्याप्रमाणें एक नवें जग जवळ येऊं लागल्याची जाणीव झाली तसेंच हें लहानसें पत्र आल्यापासून बोल्डवुडलाहि वाटूं लागलें होतें. एका क्षुद्र वस्तूनें निराळ्याच प्रचंड वस्तूचें सान्निध्य सूचित केलें होतें.

झोंपीं जातांना बोल्डवुडने तें व्हॅलेन्टाइनचें कार्ड आरशाच्या एका कोंपऱ्यांत लावून ठेविलें. असें पत्र मिळण्याचा त्याच्या जीवनांतील हा पहिलाच प्रसंग होता. या कार्डाकडे पहात असतां, त्याच्या मनांत विचार आला,——आपल्या नांवानें लिहिलेल्या याच कागदावरून एखाद्या स्त्रीचा हात हळुवारपणें फिरला असेल. आपणाला न दिसलेल्या तिच्या डोळ्यांनीं आपल्या नांवाच्या अक्षरांच्या रेषा अन् रेषा न्याहाळल्या असतील. आपलें नांव लिहीत असतां, आपलें काल्पनिक चित्रहि तिच्या मनानें पाहिलें असेल. तें नांव

लिहीत असतांना तिची जिवणी, तिचे ओठ यांच्यावरहि एखादी भावना प्रकट झाली असेल. कोणती असेल बरें ती भावना ?

अशाच विचारांत बोल्डवुडला झोंप लागली. मध्येंच त्याला जाग आल्यावर पुनः तें पत्र त्याच्या नजरेस आलें. त्या पाकिटांत आणखी कांहीं आहे कीं काय हें पहाण्यासाठीं त्यानें मुद्दाम उठून तें पाकीट उलटें-पालटें करून पाहिलें. परंतु त्यांत दुसरें कांहींहि नव्हतें, "**माझ्याशीं लग्न करा**" या त्या पाकिटावरील शिक्क्याच्या मजकुराचा त्यानें मोठ्यानें उच्चार केला.

सकाळीं बोल्डवुड उठला व कपडे करून शेतावर निघाला. ती ऐन हिंवाळ्यांतील सकाळ होती. आकाशाच्या मध्यावर गडद जांभळा रंग चढला असून, उत्तरेकडे आणि पूर्वेकडे मात्र काळसर धूसर छटा पसरली होती. पूर्व क्षितिजावर सूर्याचें अर्धें बिंब वर आलें होतें. त्याभोंवतीं किरणांचीं प्रभा मात्र दिसत नसून, सूर्यबिंब एकाद्या पांढऱ्या शेकोटींतल्या दगडावर धगधगत असलेल्या पितळाच्या गोळ्यासारखें दिसत होतें. पश्चिम क्षितिजावर चंद्र क्षीण होऊन टेकला होता. त्याचा रंग काळ्या पडलेल्या पितळासारखा होता. जमीन हिमवर्षावानें झांकून गेली होती. कडाक्याच्या थंडीनें त्या बर्फाचा पृष्ठभाग कांचेसारखा कडक आणि गुळगुळीत बनला होता. पूर्वेकडून येणाऱ्या लाल प्रकाशांत त्याच्यावर संगमरवरासारखी चकाकी आली होती.

वाटेंत गाडीच्या चाकांचा आवाज ऐकूं येऊन बोल्डवुड मागें वळला. तो टपालाचा टांगा होता. गाडीवानानें एक पत्र पुढें करतांच तें घेऊन बोल्डवुडनें लगेच फोडलें. त्याला वाटलें कीं, मागील पत्राप्रमाणें आज देखील एखादें निनांवीं पत्र आपल्याकडे आलें असेल. गाडीवान म्हणाला, " रावसाहेब, हें पत्र आपल्या नांवाचें नाहीं. मला वाटतें आपल्या धनगराचें असावें. " त्या पत्रावरील पत्ता असा होता.

—नव्या धनगराला देणें.

—बेदरबरीची वाडी,

— कॅस्टरब्रिज नजीक.

बोल्डवुड उत्तरला, "अरेरे ! चूक झाली ! हें पत्र माझें नव्हे, आणि माझ्या धनगराचेंहि नव्हे. तें मिस् एव्हरडीनच्या धनगराचें आहे. तें गॅब्रिएल ओकला द्या आणि सांगा कीं, 'तें मी चुकीनें फोडलें.'

याच वेळीं पूर्वाक्षितिजाच्या पार्श्वभूमीवर उठून दिसणारी एक काळी मनुष्याकृति त्याच्या नजरेस आली. ती आकृति गॅब्रिएल ओकची असून त्याच्या मागें त्याचा कुत्रा जॉर्ज हाहि होता.

बोल्डवुड म्हणला, "तोच त्या टेकडीवरचा मनुष्य. मीच त्याला हें पत्र नेऊन देतों."

हें पत्र देण्यांत बोल्डवुडला एक नवी संधि मिळणार होती. कांहींतरीं निश्चय केल्यासारखा भाव त्याच्या चेहऱ्यावर दिसूं लागला. गॅब्रिएल टेकडी उतरून वॉरनच्या दारू-दुकानाकडे निघाला होता; बोल्डवुडहि त्याच्या मागून निघाला.



## १५. "तत्तम्य किमपि द्रव्यं । योहि यस्य प्रियो जनः ॥"



वॉरनच्या दारू-दुकानांत अनेक गांवकरी नेहमींप्रमाणें जमलेले होते. बाथशीबाबद्दलच त्यांच्या गप्पा चालल्या होत्या. तिनें नवीन आणलेल्या पिआनोविषयीं या खेडवळांना फार कुतूहल वाटत होतें. बाथशीबानें सारें सामान-सुमान, चित्रें, कोच वगैरे वस्तू नवीनच विकत घेतल्या होत्या. त्याबद्दलहि हे गांवकरी गंभीरपणें चर्चा करीत होते. तेवढ्यात बाहेरून हांक आली, "गांववाले! जागा आहे कां थोडी आंत या आतांच जन्मलेल्या कोंकरांसाठीं?" साऱ्यांनीं उत्तर दिलें, "आहे कीं! या धनगर दादा!" ओक आपल्या खांद्यावर चार नुकतींच जन्मलेलीं कोंकरें टाकून या ठिकाणीं आला होता. त्यानें नॉर्कोंबहून जाऊन आणलेला त्याचा कुत्रा जॉर्ज हाहि त्याच्या मागोमाग येत होता.

पुअरग्रासनें विचारलें, "या हंगामांत कोंकरांची वीण कशी काय आहे?"

ओक म्हणाला, "फार दगदगीचें काम आहे हें. गेला पंधरवडाभर मी आणि केनी यांना रात्रीं झोंप नाहीं. बर्फ म्हणूं नका, पाऊस म्हणूं नका, अगदीं भिजून चिंब झालों तरी कामाला खळ नाहीं."

"बरींच जुळींहि झालीं आहेत असें ऐकतों!"

"हो, खूपच! कांहीं विचारूं नको. या वर्षींचा प्रकार कांहीं निराळाच! मार्चअखेरपर्यन्त हें काम कांहीं संपेलसें दिसत नाहीं!"

केनीकडे वळून गॅब्रिएल म्हणाला, "उरलेलीं कोंकरें आंत

आण, आणि मग तूं जा मेंढ्यांकडे शेतावर. मीं थोड्या वेळानें आलोंच मागून."

गॅब्रिएलच्या हाताखालील पोरगा केनी हा एक हंसऱ्या मुद्रेचा मुलगा असून त्याची जिवणी एकाद्या लहान वर्तुळासारखी होती. आंत येऊन त्यानें आणखी दोन कोंकरें खालीं ठेवलीं आणि सांगितल्याप्रमाणें तो निघून गेला. ओकनेंहि आपल्या खांद्यावरील कोंकरांना खालीं उतरून शेकोटीजवळ ठेविलें आणि त्यांच्यावर गवताचें पांघरूण घातलें.

गॅब्रिएल म्हणाला, "नॉर्कोंब्रला कोकरांसाठीं आमची एक झोंपडी असे. इथें तशी नसल्यानें अशक्त कोकरांना अडोशाला नेऊन ठेवायला फार त्रास पडतो. ही तुमची निवाऱ्याची जागा नसती तर मग काय झालं असतं कुणास ठाऊक?"

यानंतर नॉर्कोंब येथें काय काय बदल झाले आहेत याबद्दल ओक आणि म्हातारा कलाल यांचें बोलणें चालू असतां त्यानें मध्येंच ओकला म्हटलें, "नवी मालकीण आल्यापासून इथेंहि किती बदल झाले याबद्दलच बोलणें चाललें होतें आतां." हे शब्द ऐकून ओकला बराच राग आला. तेथील लोकांकडे वळून तो म्हणाला, "काय म्हणणं आहे तुमचं तिच्याबद्दल?" मार्क क्लार्क उत्तरला, "मालकिणीच्या अभिमानाबद्दल आणि ऐटीबद्दल हे लोक सडकून टीका करीत होते. पण मी म्हणतों वागूं द्या कांहीं काल तिला मनासारखं. किती गोड चेहेरा आहे तिचा! तिच्या लाल चुटुक ओठांवर मला अगदीं अस्सं करावसं वाटत!" असें म्हणून रंगेल मार्क क्लार्कनें एक विचित्र, चिरपरिचित आवाज स्वतःच्या ओठांनीं काढला.

गॅब्रिएल कडकपणें म्हणाला, "मार्क! आतां ऐकून ठेव नीट. यापुढें एव्हरडीन बाईबद्दल असलं बेछूट बोलणं खपायचं नाही मला, समजलास?"

मार्क क्लार्क मोकळेपणानें म्हणाला, "खुशाल! नाहींतरी आम्हांला कुठली अशी संधि मिळायला बसलीय् हो!"

जोसेफ पुअरग्रासकडे रागीट चेहऱ्यानें पहात ओक म्हणाला, " अन् मला वाटत तूहि मालकिणीविरुद्ध बोलत होतास ! "

भीतीनें थरथर कांपत जोसेफ म्हणाला, " छे छे छे ! एक शब्द काढला नाहीं मी तोंडातून. मालकीणबाई आहे तीच बरी आहे. पण मॅथ्यू आतांच म्हणत होता-- "

त्याच्याकडे मोहरा वळवीत ओकनें विचारलें, " मॅथ्यू मून ! काय म्हणणं आहे तुझं ? "

इकडे मॅथ्यूचीहि गाळण उडाली होती. तो म्हणाला, " मी ? तुम्हाला ठाऊक आहे आपण कधीं कोणाला फट् म्हणणार नाहीं ! "

'असो. कोणी तरी तिच्याबद्दल बोलत होतें हें खरें.' गॅब्रिएल हा तसा स्वभावानें सभ्य आणि मवाळ होता. पण वेळ आली म्हणजे तो लगेच चढाऊ वृत्ती धारण करूं शके. आपली भक्कम मूठ टेबलाच्या मध्यावर आदळून तो म्हणाला, " या गांवाच्या पंचक्रोशींत जर कोणाला आमच्या मालकिणीबद्दल वावगा शब्द काढतांना मीं ऐकलं तर माझ्या या मुठीचा प्रसाद त्याला मिळेल. हें खोटं ठरलं तर नांव बदलून ठेवा माझं ! "

या बोलण्यावर साऱ्यांनीं आपण त्या गांवचेच नाहीं असें दाखविण्याचा प्रयत्न केला. मार्क क्लार्क आणि हेन्री हे लगेच गॅब्रिएल ओकच्या हुषारीबद्दल स्तुतीपर शब्द बोलूं लागले. त्याला मॅथ्यूनेंहि हसून पुष्टी दिली. अखेर ओकनें जरा चिडून विचारलें, " कुणी सांगितलें तुम्हाला मी एवढा षारहु आहे म्हणून ? "

मॅथ्यू म्हणाला, " तें तर सगळीकडेच झालंयू. तुम्हांला ताऱ्यांकडे पाहून वेळ सांगतां येते; छायायंत्रें तयार करतां येतात, अगदीं पुस्तीसारख्या वळणदार अक्षरांत फडेशाही नांवें रंगवितां येतात गाड्यांवर. अहो तुमचे हे सारे गुण पाहिल्यावर एव्हरडीन बाईनें तुम्हालाच दिवाणजी नेमायला हवं होतं असं मत आहे आम्हां साऱ्यांचं. "

ओक मोकळेपणानें म्हणाला, "खरं सांगायला हरकत नाहीं, माझीहि तशीच अपेक्षा होती. पण इच्छा असली तर जातीनें व्यवस्था पहाण्याचा एव्हरडीन बाईला पूर्ण अधिकार आहे."

यापूर्वी मृतवत् पडलेलीं कोकरें शेकोटीची सुखकर ऊब लागून गवतावर आपले हातपाय झाडूं लागलीं आणि 'बें बें' करूं लागलीं. हळूहळू त्यांची गडबड वाढूं लागली. यावर ओकनें एक डबा काढून त्यांतील दूध एका लहान चहाच्या किटलींत ओतलें. तिच्या तोटींतून दूध कसें चोखून घ्यावें हें त्या कोकरांना तो शिकवूं लागला, आणि तीं कोकरेंहि ही कला अगदीं झपाट्यानें शिकलीं.

हें चाललें असतां बोल्डवुड जमीनदार दार उघडून आंत आला आणि म्हणाला, "हं! ओक, मला वाटलंच होतं तूं इथं असशील म्हणून. थोड्या वेळापूर्वी मला टपालाचा टांगा भेटला. माझंच समजून एक पत्र मी फोडलं पण मला वाटत तें तुझंच असावं. न कळतां हें घडलं माफ कर."

गॅब्रिएल म्हणाला, "त्यांत कांहीं एक बिघडलं नाहीं बोल्डवुड रावसाहेब." जरा बाजूला जाऊन ओकनें तें पत्र वाचलें. त्यांतील हस्ताक्षर त्याच्या ओळखीचें नव्हतें. तें पत्र असें:--

--अज्ञात मित्रास,

मला तुमचें नांव माहीत नाहीं. पण या ओळी तुम्हाला पोंचतील असें मला वाटतें. मी अविचारानें एका रात्रीं वेदरबरी सोडून आलें त्यावेळीं तुम्हीं माझ्याशीं फार मायेनें वागलांत याबद्दल मला तुमचे आभार मानायचे आहेत आणि तुम्ही दिलेली रक्कम परत करायची आहे. शेवटीं गोड तें सारेंच गोड. सार्जंट ट्रॉय नांवाच्या अकराव्या घोडदळांतील तरुणावर माझें मन बसलें होतें. त्याच्याशीं माझें लवकरच लग्न होणार आहे हें कळविण्यास मला आनंद वाटतो. त्यांच्या पलटणीचा मुक्काम सध्यां याच गांवांत आहे. ते चांगले

कुलशीलाचे असून कोणाकडून मी अशी रक्कम देणगी म्हणून घ्यावी हें त्यांना पसंत पडणार नाहीं.

या पत्रांतील मजकूर तुम्ही सध्यां तरी गुप्त ठेविला तर माझ्यावर फार उपकार होतील. लग्न झाल्यावर दोघे जोडीनें येऊन वेदरबरीच्या लोकांना चकित करण्याचा आमचा बेत आहे. वेदरबरीमध्येंच यांचें बाळपण गेलें होतें. पुनः एकदां तुमचे आभार मानून रजा घेते.

—फॅनी रॉबिन.

गॅब्रिएल बोल्डवुडला म्हणाला, "आपण वाचलंत कां हें पत्र? वाचलं नसलं तर तुम्हाला वाचण्यासारखं आहे. फॅनी रॉबिनबद्दल तुम्हाला आस्था वाटते हें माहीत आहे मला."

बोल्डवुडनें तें पत्र वाचल्यावर त्याचा चेहरा कष्टी झाला. तो म्हणाला, "गरीब बिचारी फॅनी! तिला ज्या गोष्टी निश्चित वाटतात त्या अद्याप घडून आल्या नाहींत, आणि तिनं ध्यानांत ठेवावं कीं त्या कदाचित् घडून येणारहि नाहींत."

गॅब्रिएलनें विचारलें, "सार्जेंट ट्रॉय हा मनुष्य कसा काय आहे?"

बोल्डवुड हलक्या आवाजांत उत्तरला "हं! या बाबतींत फारशी आशा न ठेविलेलीच बरी. तसा तो हुषार मनुष्य आहे. त्याची आई फ्रेंच असून एका कुटुंबांत मुलावर देखरेख करीत असे आणि लॉर्ड सेव्हर्न या गृहस्थाशीं तिचा स्नेह होता. एका गरीब, वैद्यकीय व्यवसायातील मनुष्याशीं तिचा विवाह झाला आणि त्यानंतर लौकरच या मुलाचा जन्म झाला. लॉर्ड सेव्हर्नच्या मृत्यूनतर या पोरानें कॅस्टरब्रिज येथें वकिलाकडे कांहीं काळ कारकुनी केली आणि मग तो अविचारानें सैन्यांत दाखल झाला. फॅनीला वाटलं तशा रीतीनं इथं येऊन लोकांना तो चाकित करूं शकेल याची मला शंकाच वाटते. अगदीं मूर्ख पोरगी!"

एवढ्यांत घाईघाईनें दार उघडून केनी बॉल धांपा टाकीत अ त आला आणि म्हणाला, " आणखी दोन मेंढ्याना जुळीं झालींत. "

फॅनीबद्दलचे विचार झटकून टाकून ओक एकदम उठला आणि केनीला शाबासकी देऊन म्हणाला, " चल, तें डांबराचं भांडं आण. या कोकरावर एकदां खुणा करून टाकूं म्हणजे आटपलं. ओकनें आपल्या खिशातून मालकीणीच्या नांवाचा शिक्का काढला आणि तो डांबरांत बुडवून कोकरांच्या पृष्ठभागावर उठविला. आपलीं चार कोकरें उचलून ओक मेंढवाड्याकडे निघून गेला. मघाशीं मेल्यासारखीं दिसणारीं कोकरें आतां चांगलींच बाळसेदार आणि टुणटुणीत दिसूं लागलीं होतीं.

बोल्डवुडही ओकच्या मागोमाग थोडें अंतर चालून गेला आणि त्यानें आपलें खिशांतलें पाकिट उघडून त्याच्यापुढें धरलें. त्यांत एक पत्र दिसत होतें. तो वरकरणी बेफिकीरपणा दाखवीत म्हणाला, " मला तुला विचारायचं आहे थोडं. हें हस्ताक्षर कुणाचं आहे तें ओळखता येईल तुला ?"

तिकडे नजर टाकून ओक चटकन म्हणाला, " एव्हरडीन बाईचं. " तिच्या केवळ नामोच्चारानें त्याच्या चेहेऱ्यावर जरा लाली चढली. मग त्याच्या मनांत एक नवा विचार येऊन तो जरा अस्वस्थ झाला. हा प्रश्न विचारला यावरूनच तें पत्र निनांवीं असावें हें त्याच्या ध्यानांत आलें. बोल्डवुड गंभीरपणें म्हणाला, " हें पहा, अशा व्हॅलेंटाइनची खरी गम्मत म्हणजे तें कोणी लिहिलं असावं याविषयीं आतां चौकशी होणार या अपेक्षेंतच "

परंतु त्याच्या चर्येवरून 'गम्मत' या शब्दाऐवजीं " यातना " हा शब्द त्याला अधिक शोभून दिसला असता.

गॅब्रिएलचा निरोप घेऊन हा एकटा आणि आंतील गांठीचा मनुष्य न्याहारी करण्यासाठीं आपल्या घराकडे परत फिरला. त्यानें तें पत्र पुनः कपाटावर ठेवून दिलें. गॅब्रिएलनें दिलेल्या माहितीच्या अनुरोधानें या पत्राच्या एकंदर प्रकरणावर. काय प्रकाश पडतो याचा तो विचार करूं लागला.

# १६. "तूं तिथें अन्-मी इथें हा!"



ऑल सेंट्स् नांवाच्या एका जुनाट ख्रिस्ती देवळांत एके दिवशीं सकाळीं कांहीं भक्त मंडळी रोजच्या उपासनेसाठीं जमली होती. स्त्रिया आणि मुलें यांचाच अधिक भरणा या मंडळींत होता. हें देऊळ एका लष्करी छावणीच्या गांवांतलें होतें. प्रवचनावाचून उपासना आटोपली आणि भक्त मंडळी निघून जाण्याच्या बेतांत होती, तोंच त्यांच्या कानांवर ऐटदार पावलांचा आवाज आल्यानें ते जरा थबकले. देवळांत टांचा लावलेल्या बुटांचा आवाज येणें जरा नवलाचेंच होतें. त्यामुळें सारे लोक त्या पदध्वनीच्या दिशेनें पाहूं लागले. लाल गणवेश घातलेला एक घोडदळांतील तरुण शिपाई बाजूच्या दालनांतून आंत आला. त्याच्या बाहीवर सार्जंट पदाच्या तीन फिती लावलेल्या होत्या. त्याचीं पावलें जोरानें पडत असलीं तरी त्याला एकंदरींत संकोचल्यासारखें वाटत होतें आणि हा संकोच मुद्रेवर दिसूं न देण्याचा त्यानें निश्चय केल्यासारखा दिसत होता. स्त्रियांच्या गराड्यांतून तो बाहेर पडल्यावर त्याच्या चेहऱ्यावर जरा लालसर छटा चढली होती. देवळाच्या कमानींतून सरळ पलीकडे जाऊन तो पवित्र वेदीच्या कठड्याजवळ एकटा जाऊन उभा राहिला.

देवळांतील धर्मगुरुचा एक तात्पुरता मदतनीस उपासना चालवीत होता. त्यानें अंगावरील पांढरा झगा अजून उतरला नव्हता. आंत आलेल्या पाहुण्याकडे पाहून तो त्याच्या मागोमाग प्रसाददीक्षा देण्याच्या जागेकडे गेला. शिपायाच्या कानांत त्यानें कांहींतरी सांगितलें. त्यानें तेथील कारकुनाला बोलाविलें.त्या कारकुनानें आपल्या मध्यम वयस्क स्त्रीच्या कानांत कांहीं सांगितलें आणि ते सारे प्रार्थनावेदीच्या पायऱ्या चढून वर गेले.

" एकादं लग्न दिसतंय , थांबूं या आपण. " काहीं स्त्रिया हलक्या आवाजांत म्हणाल्या. बहुतेक भक्तमंडळी खालीं बसली.

देवळाच्या मनोऱ्याच्या पश्चिम बाजूकडील एक मोठी घंटा वाजली. साडेअकरा वाजल्याचे टोले पडले. काहीं प्रेक्षक कुजबुजले, " अहो पण नवरी मुलगी कुठें आहे ? "

तो तरुण सार्जंट देवळांतल्या एखाद्या जुनाट खांबाइतकाच निश्चलपणें आणि ताठरपणें उभा होता. क्षणामागून क्षण चालले होते आणि देवळांतील शांतता आतां साऱ्यांच्या ध्यानांत येण्यासारखी होती. कोणीहि देवळांत आलें नाहीं आणि आंतील कोणीहि व्यक्तीनें हालचाल केली नाहीं. पावणेबाराचे ठोके पडले आणि त्या आवाजानें बरेच लोक दचकले.

एक आवाज आला, " नवरी कुठें बेपत्ता झाली कुणास ठाऊक ! "

आणि मग हळूंहळूं कृत्रिमपणें खांकरण्याचे, पायांनीं चाळवाचाळव करण्याचे आवाज येऊं लागले. अखेर फक्त फिदीफिदी हंसण्याचा आवाज आला. तरी तो शिपाई बिलकूल हलला नाहीं. आपली टोपी हातांत घेऊन तो एकाद्या खांबासारखा ताठ उभा राहिला होता.

घड्याळाची टिक्‌टिक् सुरू होती. आतां स्त्रियांनीं आपली अस्वस्थता झुगारून दिली. आवाज अधिकाधिक प्रमाणांत येऊं लागले आणि अखेर तेथें भकास शांतता पसरली. या प्रकारणाची अखेर काय होते हें कळून घेण्यासाठीं सारे थांबले होते. पुनः मनोऱ्यांतील घड्याळाच्या घंटेचा आवाज आला. बारा वाजले होते. धर्मगुरु आंतल्या खोलींत निघून गेला आणि कारकूनहि तेथून नाहींसा झाला. शेवटीं त्या शिपायानें आपलें तोंड फिरविलें आणि देवळाच्या गाभाऱ्यांतून तो निश्चयी मुद्रेनें सरळ पुढें बाहेर निघून गेला. त्याचे ओंठ घट्ट मिटलेले होते आणि साऱ्याच्या नजरांना त्यानें धैर्यानें तोंड दिलें होतें.

देवळाच्या समोरच्या बाजूस फरसबंदीचा एक चौक होता. भोंवतालच्या जुनाट लांकडी इमारतीमुळें त्या चौकावर दाट सांवली पडली होती. देवळाच्या दारांतून निघून तो तरुण त्या चौकांतून पलीकडे जात असतां एक ठेंगणी स्त्री त्याला भेटली. तिच्या चेहेऱ्यावर आधींच अतिशय काळजीची छटा होती. आणि त्या तरुणाला पाहिल्यावर भयानें तिची जवळ जवळ त्रेधाच उडाली.

आपला क्रोध आटोक्यांत ठेवण्याचा प्रयत्न करीत, तिच्याकडे रोखून पहात पहात ट्रॉय म्हणाला, " ठीक आहे नाहीं ? "

ती स्त्री काकुळतीला येऊन म्हणाली " फ्रँक ! माझ्या हातून चूक झाली. मला वाटलं तें कळस असलेलं देऊळ म्हणजेच **ऑल सेंट्स्** नांवांचें देऊळ. तूं सांगितलंस त्याप्रमाणें अगदीं साडेअकराच्या ठोक्याला मी त्या देवळाच्यां दाराशीं उभी राहिले. पावणेबारा पर्यन्त मी तिथं तुझी वाट पाहिली, आणि मग मला आढळून आलें कीं मी उभी होते त्या देवळांचं नाव **ऑल सोल्स्** असें होतें. पण मला फारशी भीति वाटली नाहीं. कारण मी विचार केला, ' आज जमलं नाहीं तर उद्यां. '

ट्रॉय म्हणाला, " मूर्ख पोरी, माझ्या पदरीं मूर्खपणा बांधलास तूं. चूप कांहीं बोलूं नकोस आतां. "

तिनें भकास मुद्रेनें विचारलें, " फ्रँक, उद्यां होईल कां रे आपलं लग्न ? "

त्याच्या हंसण्याचा एक घोगरा आवाज आला. तो म्हणाला, " उद्यां ! बराच काळ उलटून जाईपर्यंत असला अनुभव पुनः घेण्याची माझी तयारी नाहीं, हें तुला निक्षून सांगतों मी. "

ती कांपऱ्या स्वरांत त्याची समजावणी करीत म्हणाली, " पण तसं म्हटलं तर ही चूक कांहीं मोठी भयंकर नव्हती. फ्रँक ! कधीं करायचं रे आपण लग्न ? "

" कधीं ? परमेश्वरालाच ठाऊक कधीं तें. " तो जरा कुत्सितपणें म्हणाला आणि तिच्याकडे पाठ फिरवून जलदीनें निघून गेला.

## १७. " ही कोण मधुराननना ? "



शनिवारीं बोल्डवुड कॅस्टरब्रिजच्या मंडईत नेहमींप्रमाणें बसला असतां त्याच्या स्वप्नांत सतत येणारी रमणी त्याच्या डोळ्यासमोर प्रत्यक्ष येऊन उभी राहिली. बोल्डवुडनें धीर करून तिच्याकडे डोळे भरून पाहिलें. यापूर्वी बोल्डवुडची स्त्रियाकडे पहाण्याची दृष्टी म्हणजे त्या जणूं काय धूमकेतूसारख्या कुठेंतरी दूर असलेल्या वस्तू असाव्यात अशी असे. आता मात्र त्यानें बाथशीबाला नीट न्याहाळून पाहिलें. तिचे काळेभोर केंस, रेखीव चेहेरेपट्टी, गोल हनुवटी आणि गळा हे विशेष त्याच्या नजरेंत भरले. तिचा बांधा, झगा, आणि तिच्या जोड्याचे तळवे देखील त्याच्या नजरेंतून निसटले नाहींत.

बोल्डवुडला ती सुंदर वाटली. त्याच्या हृदयांत कालवाकालव होऊं लागली. तो चाळीस वर्षांचा झाला असला तरी यापूर्वी त्यानें कोणाहि स्त्रीकडे इतकें लक्षपूर्वक पाहिलें नव्हतें. त्यामुळें ती खरोखरच सुंदर आहे कीं नाहीं याबद्दल त्याची खात्री होईना. त्यानें हळूंच आपल्या शेजाऱ्याला विचारलें, " काय हो त्या एव्हरडीन बाईला देखणी समजतात कां लोक ? "

शेजारचा मनुष्य उत्तरला, " वा ! समजतात तर ! फार सुंदर पोरगी आहे ती. पहिल्या खेपेस ती इथं आली तेव्हां साऱ्याचे डोळे नुसते खिळून राहिले होते तिच्यावर. "

एखाद्या स्त्रीवर मनुष्याचें एकदां मन जडलें आणि तिच्या-विषयीं अनुकूल मत ऐकूं आलें कीं तो त्यावर अगदीं भोळेपणानें विश्वास ठेवतो. मग एखाद्या पोरानें असें मत दिलें असलें तरी त्या मताला राजमान्य कलावंताच्या मताइतकी किंमत तो देऊं लागतो. बोल्डवुडचें आतां समाधान झालें होतें. याच सुंदर स्त्रीनें " **माझ्याशीं लग्न करा.** " असें त्याला म्हटलें

होतें. पण तिनें असा चमत्कारिक मार्ग कां पत्करला असेल हा बोल्डवुडला प्रश्नच पडला.

बाथशीबा यावेळीं अगदीं शांतपणें एका उमद्या तरुण शेतकऱ्याशीं खरेदीविक्रीचा व्यवहार करीत होती. एखाद्या हिशेबाच्या वहीच्या पानाकडे तिनें जितकें निर्विकारपणें लक्ष दिलें असतें तितकेंच लक्ष देऊन त्या शेतकऱ्याच्या चेहऱ्याकडे ती पहात होती. हा मनुष्य बाथशीबाला पटण्यालारखा नव्हता तरीहि बोल्डवुडला उगीचच त्याचा मत्सर वाटूं लागला. बाथशीबाला मात्र या साऱ्या प्रकाराची पूर्ण जाणीव होती. बोल्डवुडची नजर आपल्या मागोमाग फिरत आहे हें तिच्या लक्षांत आलें. हा तिचा मोठा विजय होता. झाला हा प्रकार सहाजिकपणें घडून आला असता तर तो तिला अधिक बरा वाटला असता. परन्तु आपल्या फाजील अक्कलहुशारीमुळें हा प्रकार घडून आला हें तिला पूर्णपणें माहीत होतें, यामुळें आपण एखाद्या कृत्रिम फुलाची किंवा मेणाच्या फळाची जेवढी किंमत करतों तेवढीच किंमत तिला आपल्या या यशाची वाटत होती.

इतक्या शांत वृत्तीच्या आणि आदरणीय मनुष्याला आपण स्वतः आणि लिडी यांनीं उगीच गम्मत म्हणून कां होईना मुद्दाम चिडविलें याबद्दल तिला खरोखर हळहळ वाटूं लागली. पुढील खेपेस बोल्डवुडची भेट झाली म्हणजे आपण त्याची माफी मागावी असा तिनें जवळ जवळ निश्चयहि केला. परंतु या बाबतींत शोचनीय गोष्ट एवढीच होती कीं, झाला हा प्रकार कुचेष्टेनें केला अशी त्याची समजूत झाली तर माफी मागितल्यामुळें तिनें केलेला गुन्हा अधिकच गंभीर स्वरूपाचा झाला असता; कारण तिच्या बोलण्यावर त्याचा विश्वासच बसला नसता. बरें, या प्रकारामुळें बोल्डवुडनें खरोखरच आपली मनधरणी करावी अशी सूचना करण्याचा तिचा हेतु होता असें निष्पन्न झालें तर ही कबुली देण्यानें तिच्या फाजीलपणाचा पुरावाच दिल्यासारखें होणार होतें ! म्हणून तिनें याबद्दल त्यावेळीं शब्दहि काढला नाहीं.

## १८. "आलों तुझ्याच दारीं."



ट्ल वेदरबरी फार्म नांवाच्या एका जुनाट वाड्यांत बोल्डवुड रहात असे. त्या पंचक्रोशींत अमीरउमरावांच्या पंक्तीला बसूं शकेल असा बोल्डवुड हा एकच मनुष्य होता. त्याचें रहातें घर रस्त्यापासून बरेंच आंत होतें. त्यामागें घोड्यांचे तबेले होते. तबेल्यांच्या उघड्या दारांतून अर्धा डझन घोडे दिसत असून ते सातू आणि गवत यांचें चर्वण करीत होते. एक शिंगरू पलीकडील मोकळ्या गोठ्यांत भटकत होतें. मधूनच घोड्याच्या लाथेचा किंवा त्यांना बांधून ठेविलेल्या दोरांचा अवाज येई. या जनावरांच्या मागल्या बाजूस स्वतः बोल्डवुड येरझाऱ्या घालीत होता. तबेला हीच त्याची मठी. येथेंच आपल्या चतुष्पाद आश्रितांच्या घांसदाण्याची देखरेख करीत हा सडाफटिंग मनुष्य आपल्या विचारांत गर्क होऊन संध्याकाळ उलटेपर्यंत फिरत असे. कधीं कधीं तर कोळिष्टकांनीं भरलेल्या खिडक्यांतून चंद्रकिरण आंत येत किंवा भोंवतीं संपूर्ण अंधार पडे तरी बोल्डवुडची स्वारी तेथेंच असावयाची.

बोल्डवुडचा बांधा चांगला भरदार, उंच असा असून त्याचा लालसर चेहरा आतां खालीं वळला होता. त्याच्या भव्य कपाळावर सुतासारख्या थोड्या बारीक आडव्या रेषा होत्या. तेवढें सोडल्यास त्याचें कपाळ चांगलें तुळतुळीत होतें. त्याच्या मनाची समता ढळण्यासारखें थोडेंहि कारण घडलें कीं तो एकदम एका टोंकाला जात असे. मनांत एखादी भावना जागृत झाली कीं मग ती त्याच्यावर आपला संपूर्ण अंमल चालवूं लागे. असा अंमल न चालविणारी क्षीण भावना मनांत असलीच तर ती सुप्तावस्थेंत राही. बोल्डवुडच्या स्वभावांत थिल्लर अथवा खेळकर प्रकारांना स्थानच नव्हतें. मग

त्याला बरें म्हणा वाईट म्हणा. तो दिसावयाला नेहमीं गंभीर असे यामुळें रंगेल लोकांना तो आपल्या बैठकींतला वाटत नसे; तरी जीवनातल्या साऱ्याच गोष्टी थट्टेवारी न नेणारे जे लोक होते त्यांना त्याचा सहवास आवडण्यासारखा होता.

बाथशीबाला कल्पनाहि नव्हती कीं अशा रहस्यपूर्ण आणि मूक व्यक्तीच्या मनांत आपण सहज, निष्काळजीपणानें जें बीज पेरलें त्याची इतक्या झपाट्यानें वाढ होत असेल. बोल्डवुडची मनोवृत्ति जर तिला माहीत असती तर मात्र तिला आपला दोष भयंकर वाटला असता. परंतु तिच्या सध्याच्या मनःस्थितीच्या दृष्टीनें सुदैवाची गोष्ट म्हणजे बोल्डवुड हा कसा मनुष्य आहे याची तिला जाणीव झाली नव्हती. मात्र सध्याचें हें तिचें सुदैव भावी मनस्वास्थ्याच्या दृष्टीनें दुर्दैवच ठरणार होतें. तिलाच काय, बोल्डवुडबद्दल कोणालाच पूर्ण कल्पना नव्हती. तो काय करील, काय करूं शकेल याबद्दल कोणालाच माहिती नव्हती. कारण त्याच्या भावनेच्या ऐन भरातील कृती अद्याप कोणाच्याच नजरेस आल्या नव्हत्या.

तबेल्याच्या दाराशीं येउन बोल्डवुडनें शेतांपलीकडे आपली दृष्टि फेंकली. कुंपणाच्या पलीकडच्या बाजूला बाथशीबाच्या शेतीवाडींतील एक कुरण होतें.

ते वसंत ऋतूंतील अगदीं पहिले दिवस होते. याच काळांत मेंढ्यांना कुरणांत प्रथम चारण्यासाठीं सोडीत. यानंतर तें गवत कापणी करण्यासाठीं राखून ठेवण्यांत येई. साऱ्या वनस्पतींच्या पेशीपेशींतून जीवनरस वरवर चढूं लागला होता, झाडें डोलत होतीं, तरारत होतीं. या दूरच्या कुरणाकडे पहात असतां बोल्डवुडला बाथशीबा, धनगर ओक, आणि त्याचा मदतनीस केनी बॉल यांच्या तीन आकृती दिसल्या. अखेर पलीकडे जाऊन आपण धीटपणें तिला प्रश्न करावा, असा त्यानें निश्चय केला. बोल्डवुडच्या हृदयांतील भावनांना आतांपर्यन्त कुठेंच वाव मिळाला नव्हता. प्रेम करणारी आई नव्हती कीं मायेची बहीण नव्हती. यामुळें त्याच्या साऱ्या प्रेमळ भावना त्याच्या

शरीरांतच जणूं काय केंद्रित होऊन राहिल्या होत्या. संकोची वृत्तीमुळें तो सर्वां-पासून अगदीं अलग राहिला होता.

बोल्डवुड कुरणाच्या फाटकाशीं आला. कुरणावर गवताच्या लाटा सळसळत होत्या आणि आभाळांत पक्ष्यांच्या लकेरी घुमत होत्या. या आवाजांत मेंढ्यांच्या कळपाचा ' बें बें ' असा खालच्या स्वरांतील आवाज मिसळून जात होता.

मालकीण आणि तिचे नोकर हे एका लहान कोंकराची व्यवस्था करण्यांत गुंतले होते. एखाद्या मेंढीचें कोकरूं मेलें म्हणजे दुसऱ्या मेंढीच्या जुळ्या कोंकरांपैकीं एक तिला त्याबद्दल देण्यांत येई. मेलेल्या कोकराचें कातडें त्या कोंकरावर बसवून त्याला त्या मेंढीजवळ सोडीत. गॅब्रिएल हें कातडें बसविण्याचें काम करीत होता. यानंतर ती मेंढी आणि तें नवें कोकरूं यांच्यामध्यें स्नेहभाव उत्पन्न होईपर्यन्त त्यांना एका बंदिस्त जागेंत ठेवण्यात येई. अशा चौकटीच्या जागेचें उघडें दार हातांत धरून बाथशीबा उभी होती.

वरील काम आटोपल्यावर बाथशीबानें वर पाहिलें तों कुरणाच्या दाराशीं, संपूर्ण फुललेल्या एका विलो झाडाखालीं उभा असलेला बोल्डवुड तिला दिसला. तिच्या चेहऱ्यावरील भाव गॅब्रिएलच्या नजरेस आले. त्यांचा संबध बोल्डवुडनें दाखविलेल्या पत्राशीं लावीत गॅब्रिएलनें तर्क केला कीं, बाथशीबाचाच कांही तरी नखरेलपणाचा हा प्रकार असावा. तो कोठपर्यन्त जाऊन पोंचला असावा हें मात्र त्याला कळलें नव्हतें.

गॅब्रिएल आणि बाथशीबा यांच्या हालचालींवरून बोल्डवुडला एवढें कळून आलें कीं आपण येथें आलों आहोंत याची या दोघांनाहि दखल आहे. एकदम तोंडावर प्रखर प्रकाश पडावा तसा या जाणिवेनें तो अस्वस्थ झाला. अजून तो रस्त्यावरच होता. आपण सरळ रस्त्यानें निघून गेलों तर शेतांत शिरण्याचा आपला विचार होता असें या दोघांच्या लक्षात येणार नाही अशी त्याला आशा वाटली. याच संकोच वृत्तीनें तो पुढें झटकला.

बाथशीबाला आपली भेट हवीशी वाटते कां नकोशी वाटते याचा अंदाज तिच्या वागणुकीवरून त्याला घेतां आला नाहीं; कारण स्त्रियांच्या मनाची पारखच त्याला नव्हती.

बाथशीबाबद्दल म्हणावयाचें तर बोल्डवुड कांहीं कामासाठीं किंवा उगीच वेळ जात नाहीं म्हणून या रस्त्यानें हिंडत असेल अशी तिची चुकीची समजूत मुळींच झाली नाहीं. तिच्या लक्षांत आलें कीं बोल्डवुड तेथें आला होता तो आपल्याला भेटण्यासाठींच. सहजपणें ओढून टाकलेल्या काडीचा एवढा मोठा वणवा झालेला पाहून ती फार अस्वस्थ झाली. लग्नासाठीं लटपटी खटपटी करणारी ती स्त्री नव्हती, किंवा जाणून बुजून पुरुषांच्या प्रेमाशीं निष्काळजीपणें खेळ खेळण्याचीहि तिची प्रवृत्ति नव्हती. तिनें अगदीं कानाला खडा लावून घेतला कीं यापुढें कोणत्याहि हालचालीनें किंवा दृष्टि-क्षेपानें सुद्धां या मनुष्याच्या संथ जीवनांत कोणताहि अडथळा आणावयाचा नाहीं.



## १९. " तुझा मी, हो गडे माझी "



खेर बोल्डवुडनें बाथशीबाची भेट घेतलीच; पण त्यावेळीं ती घरीं नव्हती. स्त्री म्हणून बाथशीबाचा विचार करतांना, शेतीवाडीची धनीण म्हणून तिला कांहीं कामें आहेत या गोष्टीचा त्याला विसरच पडला होता. बाथशीबाची शेतीवाडी जवळ जवळ आपल्याच शेतीवाडीएवढी मोठी असल्यानें यावेळीं ती कांहींतरी शेतावरच्या कामांत गुंतली असणार हें मागून त्याच्या लक्षांत आलें. आतांपर्यंत त्यानें तिला ऱ्याच अंतरावरून पाहिलें होतें. पण तिच्याशीं त्याचें

संघट्टन वाढलें नव्हतें. यामुळें नेहमीं पहात असूनहि त्याला ती परकीच राहिली होती. यामुळेंच ती त्याला प्रणयाच्या दृष्टीनें कितीतरी आकर्षक वाटूं लागली होती. तिचे दोष त्याच्या नजरेआडच राहिले होते. त्याच्या नजरेच्या टप्प्यांत असूनहि, आणि त्याच्याचसारखीच हाडामांसाची पुतळी असूनहि ती त्याला एखाद्या देवतेसारखी वाटूं लागली होती.

अखेर बोल्डवुडनें निश्चय केला कीं आतां अधिक वाट पहा-यची नाहीं आणि क्षुल्लक अडचणींनीं नाउमेदहि व्हावयाचें नाहीं. मे महि-न्याच्या अखेरचा हा काळ होता. आतां बाथशीबावर प्रेम करणें त्याच्या अगदीं अंगवळणीं पडलें होतें.

तिच्या घरीं चौकशी करतां त्याला कळलें कीं मेंढ्यांना आंघोळ घालण्याच्या हौदावर ती गेली आहे, त्यावर तिची भेट घेण्यासाठीं तो तेथें गेला.

मेंढ्या धुण्याचा हौद हा अगदीं गोल आकाराचा असून, कुर-णांत विटांनीं बांधून काढला होता. त्यांतील पाणी अगदीं स्वच्छ होतें. हौदा-भोंवतीं बटरकप आणि डेझी या रान फुलांचे ताटवेच्या ताटवे पसरले होते. बाजूनें नदी एखाद्या छायेसारखी संथपणें वहात होती. तिच्या कांठावरील झाडींतून तीन कोकिळांचे आवाज निस्तब्ध वातावरणांत घुमत होते.

खालीं पहात विचारमग्न स्थितींत बोल्डवुड हौदाकडे चालला होता. नदीचा एक ओढा या हौदांत एका बाजूनें शिरून, दुसऱ्या बाजूनें बाहेर वाहून जात होता. धनगर ओक, जॉन कोगन, मून, पुअरग्रास, केन बॉल आणि दुसरे शेतकरी अगदीं ओलेचिंब होऊन या हौदांत मेंढ्या धूत उभे होते. बाजूला घोडदौडीचा नवा पोषाख करून, घोडीची लगाम हाताला गुंडाळून नोकरांवर देखरेख करीत बाथशीबा बाजूला उभी होती. कोगन आणि मॅथ्यू मेंढ्यांना पाण्यांत ढकलीत. कांठावर उभा असलेला गॅब्रिएल

कुबडीसारख्या एका काठीनें त्यांना पाण्याखालीं बुचकळून काढी. मेंढ्यांची लोंकर पाण्यानें चिंब भिजून जड झाली कीं त्या गटांगळ्या खाऊं लागत. त्याच कुबडीचा आधार देऊन तो त्यांना हौदाच्या वरच्या बाजूला, प्रवाहाच्या विरुद्ध दिशेनें बाहेर काढी. त्यांच्या लोंकरींतील सर्व मळ प्रवाहाबरोबर खालीं वाहून जाई. केनी बॉल आणि जोसेफ त्यांना वर काढून घेत. हे दोघेही या कामात गुतल्यानें पाण्यानें अगदीं निथळत होते.

बोल्डवुडनें जवळ येऊन बाथशीबाला राम राम केला तो अगदीं संकोची वृत्तीनेंच. तिला वाटूं लागलें कीं तो जणूं काय मेंढया धुण्याचा देखावा पहाण्यासाठींच आला असावा, तिला भेटण्यासाठीं नव्हे. बाथशीबा नदीच्या कांठाने थोडी लांब निघून जात असतां तिच्या मागून येणाऱ्या बोल्डवुडचा पदध्वनि तिच्या कानावर पडला. प्रणयाचा सुगंध आपल्याभोंवतीं पसरत आहे अशी जाणीव तिला होऊ लागली. न थांबतां, न वळतां, उंच वाढलेल्या लव्हाळ्यांतून बाथशीबा थेट पुढें निघाली; तरी बोल्डवुडनें चिकाटीनें तिचा पिच्छा पुरविला. नदीच्या वळणापलीकडे ते दोघे पोचले. बोल्डवुडनें हांक मारली. " मिस् एव्हरडीन ! "

—तिच्या शरिराला कंप सुटून ती मागें वळली.

बोल्डवुड सरळपणें म्हणाला, " कोणतीहि प्रस्तावना केल्याशिवाय एकदम तुम्हाला कांहींतरी सांगण्यासाठीं मी आलों आहे. तुम्हाला पाहिल्यापासून माझें जीवन माझ्या मालकीचें राहिलें नाहीं. तुम्हाला लग्नाची मागणी घालण्यासाठीं मी आलो आहे. माझें वय एकेचाळीस. मी कधींहि लग्न करणार नाहीं असं लोक समजत आणि आतांपर्यंत मीहि अविवाहितच रहाण्याचा विचार केला होता. पण तुम्हाला पाहिल्यापासून माझ्यांत बदल घडून आला आहे. तुम्ही माझें पत्नीपद स्वीकारावें अशी माझी उत्कट इच्छा आहे. "

बाथशीबा अडखळत म्हणाली, " हें पहा, बोल्डवुड ! मला जरी तुमच्याबद्दल आदर वाटत असला तरी तुमची मागणी स्वीकारणं योग्य

होईल असं मला वाटत नाहीं."

--येथवर बोल्डवुड गंभीरपणें बोलत होता आणि तिनेंहि त्याला गांभीर्यानेंच उत्तर दिलें होतें. यामुळें आवरून ठेवलेल्या भावनांचा बांध फुटून बोल्डवुड म्हणाला,

"तुमच्यावाचून माझं जीवन मला ओझ्यासारखं वाटूं लागलंय्. मला तुमची गरज आहे. माझं तुमच्यावर प्रेम आहे, त्रिवार आहे हें मला तुम्हांला सांगायचंय्."

—बाथशीबानें कांहींच उत्तर दिलें नाहीं.

"आशेला तुम्ही थोडी जागा ठेवली नसती तर मी कदाचित् बोललोंहि नसतों." बोल्डवुड पुनः म्हाणाला.

बाथशीबा स्वतःशीं म्हणाली, "हा सारा त्या व्हॅलेंटाइनचा प्रताप! जळो तें मेलें व्हॅलेंटाइन!" पण उघडपणें ती शब्दहि बोलली नाहीं.

बोल्डवुडचें बोलणें चालूंच होतें, "माझ्यावर प्रेम करणं तुम्हांला शक्य असेल तर तसं सांगून टाका, पण तसें नसेल तरी नाहीं मात्र म्हणूं नका!"

अखेर बाथशीबाला सांगावें लागलें, "हें पहा बोल्डवुड! मला तुमच्याबद्दल आदर वाटतो हें मी सांगितलंच. पण मला तुमच्याशीं लग्न करणं शक्य नाहीं. माझ्या दृष्टीनें तुम्ही भलतेच गंभीर आहांत. मी गंमती-साठीं कां होईना, तें व्हॅलेंटाइन पाठवायला नको होत. स्वाभिमान असलेल्या कोणाहि स्त्रीनें तें पाठवलं नसतं. क्षमा करा मला. माझ्या अविचाराबद्दल तुम्ही क्षमा केलीत तर मी शपथेवर सांगेंत-यापुढें पुनः कधींहि—"

—बोल्डवुड म्हणाला, "छे! छे! अविचार म्हणू नका! मी तुम्हांला केव्हां तरी आवडूं शकेन याची पूर्वसूचना म्हणून तुम्ही तसं केलं अशीच कल्पना असूं द्या माझी."

जरा स्मित करीत बाथशीबानें उत्तर दिलें, “ मला तुमच्या-बद्दल प्रेम वाटत नाहीं हें मात्र निश्चित आहे. ”

बोल्डवुड आजीजीनें म्हणाला, “ एवढयांतच पति म्हणून माझ्याबद्दल विचार केला नाहीं तरी थोड्या आस्थेनें तरी विचार कराल कां तुम्ही ! कदाचित् तुम्हाला मी वयानें अधिक प्रौढ वाटत असेन. पण ध्यानांत ठेवा, तुमच्याच वयाच्या कोणत्याहि मनुष्यापेक्षां मी तुमची अधिक काळजी घेईन. तुम्हांला कोणतीहि चिंता म्हणून राहूं देणार नाहीं. शेतावरचीं, गोठ्याचीं, सारीं कामें नोकर करतील. तेवढी ऐपत आहे मला. तुम्हाला उन्हातान्हांत बाहेर जाण्याचीहि जरुरी लागणार नाहीं. आणखी काय सांगूं ! तुमच्याविषयीं मला काय काय वाटतं हें फक्त ईश्वरालाच माहित आहे. ”

कांहीं झालें तरी बाथशीबा तरुणच होती. या आंतल्या गांठीच्या माणसानें आपल्याला काय वाटतें तें इतक्या सरळपणें सांगून टाकलें होतें कीं, तिला त्याच्याबद्दल सहानुभूति वाटूं लागली.

ती म्हणाली, “ नको ! सांगूं नका हें सारं. तुम्हाला माझ्या-बद्दल इतकं वाटावं आणि मला तुमच्याबद्दल कांहींच वाटूं नये हें सहन होत नाहीं मला. जाऊं या आपण. साऱ्यांच्या लक्ष्यांत येईल आपण येथें आलों हें. तुम्ही हें सारं मला सांगणार आहांत याची मला जाणीव नव्हती. मला धडपणें सुचतहि नाहीं कांहीं. सध्यां हा विषय राहूं द्या इथेंच. तुम्हाला माझ्यामुळें एवढया यातना झाल्या. माझ्यासारखी वाईट मीच ! ”

बोल्डवुड इतका भावनावश होऊन बोलला होता कीं त्याची तिला भीतीच वाटूं लागली.

तो म्हणाला, “ मग तुम्ही निश्चित नकार दिला असें तरी णूं नका. ”

“ मला कांहीं करतां येत नाहीं. मी उत्तर देऊं शकत नाहीं. ” बाथशीबा गोंधळून म्हणाली.

"मग या विषयावर पुनः बोलायला हरकत नाहीं ना मला?"

" हं!"

" तुमच्याबद्दल विचार करीत जाऊं मी! आणि तुमच्या प्राप्तीची आशा ठेवूं मी?"

" नको! तशी आशा ठेवूं नका. जाऊं या आपण परत!'

" मग उद्यां भेटेन मी पुनः "

" नको! मेहेरबानी करून नको. मला वेळ द्या थोडा!"

" होय! कितीहि वेळ देईन मी तुम्हाला. मी वाट पाहीन."

बाथशीबा वळून निघून गेली. कितीतरी वेळ बोल्डवुड जमिनीकडे पहात तसाच उभा राहिला होता.

## २०. अप्रियस्यापि पथ्यस्य वक्ता श्रोता—




ल्डवुडबद्दल बाथशीबाच्या मनांत बिलकुल प्रेम नसल्यामुळें त्याच्या मागणीचा ती अगदीं शांतपणें विचार करीत होती. तसेंच म्हटलें तर तिच्या स्थितींतीलच काय, तिच्याहून वरच्या दर्जाच्या स्त्रियांपैकीं अनेकांनीं त्या मागणीचा मोठ्या आनंदानें स्वीकार केला असता आणि त्याबद्दल खूप जाहिरातहि केली असती. भावनेच्या दृष्टीनें काय, किंवा व्यवहाराच्या दृष्टीनें काय, तिच्यासारख्या जगांत एकट्या पडलेल्या मुलीनें अशा सुस्थितींतील, सभ्य मनुष्याशीं लग्न करून मोकळें व्हावें हें योग्यच ठरलें असतें. लग्नाचें स्थळ म्हणून पाहिल्यास बोल्डवुडमध्यें दोष दाखविण्यास कुठेंहि जागा नव्हती.

तसा तो तिला आवडत होता, त्याच्याबद्दल तिला आदरहि वाटत होता, पण इतकें करूनहि पति म्हणून तो तिला नको होता. जगांत असें दिसून येतें कीं, सामान्य पुरुष लग्न करतात तें लग्न केल्याशिवाय स्त्रीवर स्वामित्व मिळवतां येत नाहीं, म्हणून ! आणि सामान्य स्त्रिया पतीचा स्वीकार करतात त्याचें कारण म्हणजे त्यांनें स्वामित्व स्वीकारल्याशिवाय लग्न करणें शक्य होत नाहीं म्हणून. एकूण काय, ध्येयें निराळीं असलीं तरी दोघांचीहि पद्धत अखेर एकच. परंतु शेतीवाडीची मालकीण म्हणून बाथशीबाची परिस्थिती वैशिष्ट्यपूर्ण अशी होती. कांहीं म्हटलें तरी तिची नाखुषी कायम राहिलीच. बोल्डवुडला नकार देणें अनुदारपणाचें होईल असें ती एकीकडे म्हणत असतांनाच पाठोपाठ म्हणे कीं, ' जीव गेला तरी बेहत्तर, मी त्याच्याशीं लग्न करणार नाहीं. '

वरील प्रकार घडला त्याच्या दुसऱ्या दिवशीं गॅब्रिएल ओक बागेच्या खालच्या बाजूला मेंढ्यांची लोंकर कातरण्यासाठीं कात्रीला धार लावीत आहे असें तिला दिसलें. भोंवतालच्या साऱ्या झोंपड्यांतून हेंच काम सुरू होतें. सगळीकडे धार लावण्याचे आवाज ऐकूं येत होते. जणूं काय एखादी लढाईची मोहीम सुरू होण्यापूर्वी शस्त्रास्त्रें सज्ज करण्याची तयारीच चालली असावी !

केनी बॉल गॅब्रिएलसाठीं धारेचा गोल दगड वरखालीं फिरवीत होता. तें चाक वरखालीं होई त्याबरोबर त्याचें डोकेंहि वरखालीं होत होतें. बाथशीबानें तेथें येऊन थोडा वेळ त्याच्याकडे न बोलता पाहिलें आणि मग ती म्हणाली, " मी फिरवीन थोडा वेळ धारेचा दगड, गॅब्रिएल ! मला थोडा वेळ तुझ्याशी बोलायचं आहे. केन दुसऱ्या कामासाठीं निघून गेल्यावर बाथशीबा धारेचा दगड फिरवूं लागली, आणि गॅब्रिएल कात्रीला धार लावूं लागला. थोड्या वेळानें ती म्हणाली, "माझ्या डोक्यात जसं कांहीं चक्र फिरायला लागलंयूं, मला बोलतांच येत नाहीं. तूं फिरवशील थोडा वेळ चाक गॅब्रिएल ! मी धरतें कात्री. " गॅब्रिएल दगड फिरवूं लागल्यावर

बाथशीबानें विषय काढला, " मी आणि बोल्डवुड काल बोलत बोलत लव्हाळ्यांमागें गेलो होतों त्याबद्दल कामगार लोक कांहीं बोलत होते काय हें मला तुला विचारायचंय्! काय म्हणाले ते ? "

गॅब्रिएल उत्तरला, ते म्हणाले " वर्ष सरायच्या आधींच बोल्डवुड आणि तुम्ही यांचं शुभमंगल होणार ! "

बाथशीबा म्हणाली, "त्यांच्या तोंडावरून मला वाटलंच तसं ! हें बोलणं अगदीं मूर्खपणाचं आहे असं तूं सांग सर्वांना. याच कामासाठीं आलें होतें मी. "

गॅब्रिएल आश्चर्यानें तिच्याकडे पहातच राहिला आणि म्हणाला, " बोल्डवुडनें जर खरोखरच तुम्हांला लग्नाची मागणी घातली असली तर केवळ तुम्हांला बरं वाटावं म्हणून, 'त्यानें मागणी घातलीच नाहीं' असं खोटं मी कधीं सांगणार नाहीं. तुम्हांला बरं वाटावं म्हणून मी आजवर खूप प्रयत्न केले, पण त्यांत माझा कांहींच फायदा झालेला नाहीं. "

बाथशीबा जरा मऊ स्वरांत म्हणाली, " त्याच्याशीं माझं लग्न होणार हें खरं नाहीं एवढंच तूं सांगावं अशी माझी इच्छा होती. "

गॅब्रिएल म्हणाला, " तुमची तशी इच्छा असली तर तसं सांगतां येईल त्यांना मला. आणि तुम्ही जें कांहीं केलं त्याबद्दल माझं मत देखील सांगतां येईल त्यांना. "

" असेल, पण मला तुझं मत नको आहे. "

" मला वाटलंच होतं ! " गॅब्रिएल कडवटपणें म्हणाला आणि मुकाट्यानें दगड फिरवूं लागला. कांहीं वेळानें बाथशीबा आपण होऊनच म्हणाली, " बरं, माझ्या वागणुकीबद्दल तुझं मत आहे तरी काय ? "

" एकाद्या विचारी, विनयी आणि सुंदर स्त्रीला न शोभण्यासारखें हें तुमचें वागणें आहे. "

क्षणांत बाथशीबाचा चेहरा रागानें लालमडक झाला. यानंतर गॅब्रिएलनें उच्चारलेले शब्द म्हणजे एक घोडचूक होती. तो बोलून गेला, " माझे शब्द उर्मटपणाचे आहेत याची जाणीव आहे मला; पण मला वाटलें कीं ते तुमच्या हिताचे ठरतील." बाथशीबा कुत्सितपणें म्हणाली, " तुझं मत कळलं मला. तुझ्याबद्दलचं माझं मत मात्र इतकं हीन आहे कां तूं केलेली निंदा म्हणजे सूज्ञ लोकांनीं केलेली स्तुतीच असं मला वाटतं. बरं माझ्या वागणुकींतील अयोग्य भाग तरी कोणता ? मी तुझ्याशीं लग्न केलं नाहीं हाच असेल कदाचित् ? " गॅब्रिएल शांतपणें म्हणाला, " तसा प्रकार बिलकुल नाहीं. या बाबतीचा विचार करणं मी केव्हांच सोडून दिलंय् "

" आणि तशी इच्छा करणंहि सोडून दिलं असशील ! नाहीं ? " ती म्हणाली. यावर त्यानें ' नाहीं ' म्हणावें अशीच तिची अपेक्षा दिसली. गॅब्रिएलला काय वाटत असेल तें असो; त्यानें अगदीं थंडपणें तिच्याच शब्दाचा पुनरुच्चार केला, " होय तशी इच्छा करणंहि सोडून दिलं आहे. "

" तुम्ही माझं मत विचारतां म्हणून सांगतों कीं केवळ गंमत म्हणून बोल्डवुडसारख्या माणसाशीं तुम्ही चालविलेला पोरखेळ अगदीं निषेधार्ह आहे. एखाद्या माणसाबद्दल आपल्याला कांहीं वाटत नसतां त्याला उगीच आशा दाखवणं योग्य नव्हे; आणि जरी तुमचं मन खरोखरच त्याच्याकडे ओढ घेत असलं तरी त्याला व्हॅलेंटाइनचं निनांवी पत्र पाठविण्याखेरीज दुसरे पुष्कळ चांगले योग्य मार्ग होते. "

बाथशीबानें कात्री खालीं ठेवली. ती उद्गारली, " माझ्या खासगी वागणुकीबद्दल मी कोणाहि माणसाला टीका करूं देणार नाहीं. असला प्रकार मी मिनिटभराहि चालू देणार नाहीं. या आठवड्याच्या अखेर शेत सोडून तूं निघून जा ! " भावनेच्या भरांत तिचा अधर कंप पावूं लागला.

गॅब्रिएल शांतपणें म्हणाला, " ठीक आहे ! तसंच करतों मी अगदीं आतां जा म्हटलं तर त्यापेक्षां बरं वाटेल मला. "

" तर मग आत्तांच चालता हो. "

बाथशीबाच्या डोळ्यांतून अंगार वर्षत होता. त्याच्याकडे न पहातांच ती रागानें म्हणाली—' मला तोंड दाखवूं नको यापुढें. '

" ठीक आहे ! मिस् एव्हरडीन, तसंच होईल. "

आणि आपली काठी घेऊन धीरगंभीर पावलें टाकीत गॅब्रिएल बाथशीबाच्या शेतावरून निघून गेला.

---

## २१. " धांवरे रामराया–किती अंत पहासी ! "



दरबारीचे कळप सोडून गॅब्रिएल ओक निघून गेला, यावर चोवीस तास उलटले असतील नसतील. रविवारीं संध्याकाळीं जोसेफ पुअरग्रास, मॅथ्यू मून, फ्रे आणि पांचसहा कामगार बाथशीबाच्या घराशीं धांपा टाकीतच आले. पुअरग्रास म्हणाला—
"साठ"

मून म्हणाला—" सत्तर. "

फ्रे म्हणाला, " इतकीं मेंढरं कोंवळ्या क्लोव्हरच्या ( एक वनस्पती ) शेतांत घुसलीं आहेत आणि साऱ्यांना रोगाची बाधा झाली आहे. तात्बडतोब इलाज झाले नाहींत तर साऱ्या दगावतील. "

एक कामगार पुनः पुनः तेंच घोळून सांगूं लागल्यावर बाथशीबा लगेच त्या शेताच्या दिशेनें धांवत म्हणाली, " गाढव आहांत सारे ! मेंढरांना बाहेर काढायचें सोडून मला कशाला सांगायला आलांत ? " तिचे

काळेभोर डोळे आतां तेजानें नुसते लखलखत होते. ती खूप रागावली म्हणजेच अत्यंत सुंदर दिसे.

बाथशीबाच्या मागोमाग सारे कामगार क्लोव्हरच्या शेतांत गर्दी करून घुसले. क्लोव्हर खाल्ल्यानें तट्ट फुगलेल्या बहुतेक मेंढया जमिनविर पडल्या होत्या. त्यांना उचलून आणि इतरांना हांकून साऱ्यांनीं शेजारच्या शेतांत नेलें. थोड्याच वेळांत दुसऱ्या मेंढयाहि पटापट जमिनीवर निपचीत पडल्या. बाथशीबाच्या कळपांतील या निवडक मेंढया असून त्यांची अशी दशा झालेली पाहून दुःखानें तिचा ऊर भरून आला. पुष्कळ मेंढयांच्या तोंडाला फेंस सुटला होता आणि त्यांना धांप लागली होती. साऱ्यांचीं पोटें अगदीं भयंकर फुगलीं होतीं.

बाथशीबा असहायपणें म्हणाली, "आतां मी करूं तरी काय!"

—टॉल नांवाचा एक कामगार म्हणाला, "या मेंढयांना वांचविण्याचा एकच उपाय आहे. या कामासाठीं तयार केलेल्या सुईनें त्यांच्या पोटाला भोंक पाडलं पाहिजे."

बाथशीबानें विचारलें, "तुला करतां येईल कां तें ?"

"नाहीं बाईसाहेब ! आम्हाला येत नाहीं आणि तुम्हालाहि येत नाहीं. इंचभर इकडे तिकडे सुई घुसली कीं मेंढी मेलीच समजा."

जोसेफ जवळ येऊन म्हणाला, "आजूबाजूच्या भागांत हें काम करूं शकेल असा एकच मनुष्य आहे !"

"कोण तो ? बोलवूं या आपण त्याला !" बाथशीबा म्हणाली.

मॅथ्यू म्हणाला, "धनगर ओक ! खरा हुषार मनुष्य आहे तो."

बाथशीबा खवळून म्हणाली, "खबरदार त्या माणसाचं नांव घेतलंत तर माझ्या समोर ! तोच कशाला पाहिजे ? बोल्डवुडलाहि माहीत असेल."

मॅथ्यू उत्तरला, " छेः बाईसाहेब, त्याला माहीत नाहीं. त्याच्याच मेंढयांना परवां बाधा झाली होती तर त्यानें ओकला घोडयावरून बोलावणं पाठवलं आणि त्यानेंच येऊन साऱ्या मेंढया वांचविल्या."

बाथशीबा निश्चयानें म्हणाली, " नाहीं मी कधीं त्याला बोलवणार नाहीं. "

याच वेळीं एका मेंढीचे स्नायू अगदीं भीषण यातना होऊन पिळवटले गेले आणि तिनें उंच उडी घेतली. धाडकन् खालीं येऊन ती निश्चेष्ट पडली. बाथशीबानें जवळ जाऊन पाहिलें तर ती मेंढी मेली होती.

दुःखावेगानें हात चोळीत बाथशीबा म्हणाली, " काय करूं ! करूं तरी काय मी ? —पण नां हीं ! नाहींच बोलावणार मी त्याला !"

' मी बोलावणार नाहीं ' या बाथशीबाच्या शब्दांचा अर्थ ' मला बोलावावें लागेल ' असा होत होता. अखेर एका कामगाराकडे वळून ती म्हणाली, " कुठें रहातो ओक सध्यां ! "

" त्या दरीपलीकडल्या झोंपड्यांत ! "

बाथशीबा म्हणाली, " या घोडीवरून जलदीनें जा आणि त्याला माझा निरोप सांग कीं, या क्षणीं इथं परत यायला पाहिजे तुला म्हणून. "

जीन घातल्याशिवाय, केवळ एका दोरीचा लगाम करून तो कामगार घोडीवर बसून शेतांतून भरधांव निघाला. मध्यंतरीं शेतांत जाऊन, मेंढ्यांचें अंग चोळून त्यांना थोडा आराम वाटावा यासाठीं कामगारांनीं प्रयत्न केले पण ते व्यर्थच. बाथशीबा सारखी येरझाऱ्या घालीत होती. तिची घोडी परत येतांना दिसली. पण ती एकटीच होती. गॅब्रिएलचा पत्ताच नव्हता. तिच्यावरील स्वार जवळ आल्यावर बाथशीबानें विचारलें, " काय झालं ! "

" राहीन, राहीन " गॅब्रिएल म्हणाला.

आणि मग बाथशीबानें त्याच्याकडे पाहून पुनः एकदां स्मित केलें.

## २२. "मेंढ्यांवरी लोंकर दाट भारी!"



जूनची पहिली तारीख असून मेंढ्यांची लोंकर कातरण्याच्या हंगामाची अखेर होती. सगळीकडे हिरवेंगार आणि टवटवीत गवत पसरलें होतें. झाडाच्या प्रत्येक फांदींतून आणि अंकुरांतून जीवनरस नुसता ओसंडून चालला होता. अनेक तऱ्हेच्या वनस्पती, नाना तऱ्हेचीं फुलझाडें यांना सर्वत्र बहर आला होता. अशा वेळीं एका प्रशस्त जुनाट कोठारांत बाथशीबाचे कामगार मेंढ्यांची लोंकर कातरण्या-साठीं गोळा झाले होते. हें कोठारघर त्या खेड्यांतील चर्च (देवालया) इतकेंच प्राचीन होतें. पिढ्यान् पिढ्या तक्तपोशीवर मळणी झाल्यामुळें त्या काळ्याभोर फळ्या अगदीं तुळतुळीत झाल्या होत्या. या कोठाराची पश्चिमे-कडील मोठीं दारें खूपसा उजेड आंत यावा म्हणून सताड उघडीं टाकलीं होतीं. तक्तपोशीवर लोंकर कातरणारे कामगार गुडघे टेकून बसले होते आणि सूर्याचे उतरते किरण त्यांच्या अंगावर पडत होते. त्यांच्या हातांतील वरखालीं होणाऱ्या लखलखीत कात्र्यांवर सूर्याचे किरण पडले म्हणजे त्यांतून तेजाच्या हजारो शलाका एकदम इतक्या उजळून बाहेर पडत कीं एखाद्या अधू दृष्टीच्या मनुष्याच्या डोळ्यांना अंधारीच यावी. या कात्र्यांखालीं एक पकडून ठेविलेली मेंढी भीतीनें धापा टाकीत पडली होती. गॅब्रिएल कामगारांवर देखरेख करीत होता आणि तीन बायका खालीं पडलेली लोंकर गोळा करीत होत्या. या साऱ्या नोकरांमागें उभी राहून बाथशीबा त्यांच्यावर देखरेख करीत होती.

लोंकर कातरतांना एखाद्या जनावराला इजा तर होत नाहीं ना, आणि त्यांची लोंकर अगदीं खालवर कातरली जात आहे ना याकडे ती बारकाईनें लक्ष पुरवीत होती. गॅब्रिएल मधून मधून स्वतः एखाद्या मेंढीची लोंकर उतरून घेई. मधूनच दुसऱ्यांच्या कामावर नजर ठेवी. त्यांच्यासाठीं योग्य मेंढ्या निवडून देई. या कामगारासाठीं खाणेंपिणेंहि मधून मधून पुरविण्याचें काम तो करीत होता. गॅब्रिएलनें एक भिजून पळालेली मेंढी ओढून लोंकर कातरण्याचे जागीं आणून फेंकली. बाथशीबा जवळ उभी राहून ओकचें हस्तकौशल्य निरखून पाहूं लागली. ती जवळ उभी राहून पहात आहे एवढ्यानेच बिचाऱ्या गॅब्रिएलचा आत्मा सुखावला होता.

गॅब्रिएलनें त्या मेंढीच्या डोक्यावरील लांब केंस पहिल्या झटक्यांत कापून टाकले, आणि मग गळ्याभोंवतालची लोंकर उतरविली. गळा आणि खांदा यांवरील लोंकर निघाल्यावर खालील त्वचा गुलाबी दिसूं लागली. बाथशीबा म्हणाली, " अपमानानें शरमल्यासारखी दिसयेय् ती. " गॅब्रिएलची कात्री अशा कौशल्यानें चालली होती कीं प्रत्येक क्षणीं असें वाटे कीं आतां मेंढीचें कातडें कात्रीच्या पात्यांत सांपडलेंच, परंतु तसें कधींच होत नसे. जवळ असलेल्या बाथशीबाशीं बोलण्याची गॅब्रिएलला इच्छा नव्हती. बाथशीबाचीच सारखी बडबड चालली होती. खूपशी बडबड करूनहि कधीं कधीं त्यात कांहींच अर्थ नसतो, आणि मूकपणांतहि कधीं कधीं खूपसा अर्थ सामावलेला असतो. बाथशीबाची बडबड आणि गॅब्रिएलचा मूकपणा यांच्या बाबतींत हाच प्रकार घडत होता. याच सुखाच्या भरांत त्यानें त्या मेंढीला दुसऱ्या कुशीवर वळविलें. तिच्या डोक्यावर आपला गुडघा रोंवून, गळ्याखालील भागावरून कात्री पुढें नेत नेत पाठ व बाजूवरील लोंकर कातरून अखेर शेपटीवरील लोंकर कातरून आपलें काम संपविलें.

गॅब्रिएलच्या कात्रीचा शेवटचा आवाज संपतांच घड्याळाकडे पाहून बाथशीबा म्हणाली, " भले शाबास ! किती लवकर आटपलं काम ! "

आपलें तोंड पुशीत गॅब्रिएलनें विचारलें " किती वेळ लागला ? "

" या मेंढीच्या कपाळावरील पहिला झुपका कातरल्यापासून साडेचोवीस मिनीटं लागलीं एकूण. अर्ध्या तासाच्या आंत सारं काम उरकलेलं पहिल्यानेंच पहातें आहे मी आज. "

गॅब्रिएलनें हांक मारली, " केन बॉल ! "

केनी डांबराचें भांडें घेऊन पुढें पळत आला. लोंकर कढलेल्या मेंढीच्या अंगावर बाथशीबाच्या नांवाचा शिक्का बसला. धांपा टाकीत, बाहेर उभ्या असलेल्या, तिच्याप्रमाणेंच साफ झालेल्या मेंढीच्या कळपांत ती जाऊन मिसळली. मग मेरीॲन पुढें आली. सारी लोंकर तिनें गोळा करून मागच्या बाजूस नेली. ती साडेतीन पौंड भरली.

परंतु गॅब्रिएलचा आनंद नियतीला पाहवला नाहीं. ओकला वाटलें होतें कीं आतां आपलें काम सुरूं असेपर्यंत बाथशीबा आपल्याजवळच उभी रहाणार. तेवढ्यांत त्या कोठाराच्या कोपऱ्यांत बोल्डवुड येऊन उभा राहिला. बाथशीबाकडे येऊन तो हलक्या आवाजात बोलूं लागला. ते दोघे काय बोलत आहेत हें गॅब्रिएलला ऐकूं येत नव्हतें. त्यांच्या बोलण्याकडे त्याला दुर्लक्ष करवत नव्हतें परंतु तें ऐकण्यासाठीं त्यांच्या जवळ जाऊन उभें राहूं नये इतपत स्वतंत्र वृत्ति त्याचे अंगीं होती. त्या दोघांचें बोलणें आटोपलें आणि बोल्डवुड बाथशीबाचा हात धरून तिला मोठ्या अदबीनें बाहेर घेऊन गेला. बाहेर असलेल्या तुळतुळीत मेंढ्यांजवळ उभे राहून ते दोघे पुनः बोलूं लागले. बाथशीबा जमिनीवर पडलेल्या गवताच्या एका काडीकडे संथपणें पहात होती आणि हळुहळू तिचे गाल अधिकाधिक लाल होत चालले होते, बिचारा गॅब्रिएल हिरमुसला होऊन आंत लोंकर कातरीत बसला होता.

सुमारें पंधरा मिनिटेंपर्यंत बाथशीबा बोल्डवुडला सोडून घरांत गेली आणि त्यानंतर घोडदौडीच्या वेळीं घालण्याचा हिरव्या रंगाचा अगदीं तंग पोषाख करून बाहेर आली. ओकची नजर या

दोघांवरून हालेना. बोल्डवुडच्या हालचालींकडे लक्ष देत असतांच त्याचें लोंकर कातरण्याचें काम चालू होतेंच. यामुळें मध्येंच एका मेंढीच्या कंबरेला कातर चावली आणि तिनें एकदम उडी मारली. बाथशीबानें तिकडे पाहिलें तों ती मेंढी रक्तबंबाळ झालेली तिला दिसली. ती गॅब्रिएलला ठपका देत म्हणाली, " गॅब्रिएल ! दुसऱ्या लोकांना तूं इतक्या कडकपणें वागवतोस आणि तूं स्वत: आतां काय केलं आहेस तें पहा. "

एखाद्या प्रेक्षकाला या उद्‌गारांत तक्रार करण्यासारखें कांही दिसलें नसतें. परंतु ओकला मात्र हे शब्द अगदीं जिव्हारीं जाऊन झोंबले. त्याला कळत होतें कीं या मेंढीला झालेल्या जखमेचें कारण आपण नसून स्वत: बाथशीबाच होय. कारण तिनेंच आपल्या वागणुकीनें त्या मेंढीची लोंकर कातरणाऱ्या गॅब्रिएलला जिव्हारीं जखम केली होती. तिच्या बोलण्यांतील खोंच अशी होती कीं त्यामुळें आपण तिच्यापेक्षां आणि बोल्डवुडपेक्षां हलक्या दर्जाचे आहोंत याची जाणीव गॅब्रिएलला सतत होत रहावी.

जणूं काय कांहीं झालेंच नाहीं अशा बेफिकीर आवाजांत गॅब्रिएलनें आरोळी दिली, " बाटली ! " केनी बॉल बाटली घेऊन पुढें धावला. मेंढीच्या जखमेवर मलम लावून ओकनें लोंकर कातरण्याचें काम पुढें सुरू केलें. बाथशीबा बोल्डवुडबरोबर घोड्यावरून जातां जातां गॅब्रिएलला बजावून गेली, " कोठारांत माझी जागा घे, आणि कामगारांकडून नीट काम करून घे. "

बोल्डवुडची बाथशीबाविषयींची आस्था आतां चार चौघांच्या चर्चेचा विषय झाली होती. एक कामगार स्त्री म्हणाली, " याचा अर्थ आतां दोघांचें लौकरच लग्न लागणार. " त्यावर दुसरा कामगार म्हणाला, "बरं झालं. लग्न करायचंच तर एखाद्या परक्याच्या गळ्यांत माळ घालण्याऐवजीं शेजाऱ्याशीं लग्न केलेलं काय वाईट ? यावर त्या दोघांच्या वागणुकीची चर्चा सुरू झाली. एक तर म्हणाला, " मागं आपण मेंढया धूत होतों हौदांत, त्यावेळींच हा बोल्डवुड तिला कुंपणाआड घेऊन गेला. त्यावेळीं त्यानें तिचें चुंबन घेतलं असेलच, " गॅब्रिएल उसळला, " हें धडधडीत खोटं आहे ! "

वरचे उद्गार काढणारा हेनरी हळूंच म्हणाला, "ओकबुवा तुम्हाला हो कसं कळलं हें ?"

ओक म्हणाला, "कारण तिथं काय झालं हें सारं तिनं आपण होऊन मला सांगितलं होतं" इतरांपेक्षां आपण कोणी निराळे आहोंत असा त्याच्या बोलण्याचा झोक होता.

यावर जरा चिडून हेनरी म्हणाला, "एखाद्या दिवाणजीला शोभेल एवढा शहाणपणा असला म्हणजे कांही स्वर्गाला हात लागले असं समजायला नको. मी आपला साधा माणूस असलों तरी 'दुसऱ्या एखाद्या' माणसापेक्षां मला जास्त अक्कल आहे."

ओकनें न बोलतां लोंकर कातरण्याचें आपलें काम सुरूं ठेवलें. त्याच्या मनाची शांतता आतां नष्ट झाली होती. अलीकडेच शेतीवाडीला एखाद्या दिवाणजीची फार गरज भासूं लागली होती आणि आज ना उद्यां इतर सर्वांना डावलून ही जागा गॅब्रिएलच्या वांट्याला येणार अशी चिन्हें बाथशीबाच्या वागणुकीवरून दिसूं लागलीं होतीं. शेतीवाडीच्या दृष्टीनें त्याला या जागेची फारशी आकांक्षा नव्हती. दुसऱ्या मनुष्याशीं बाथशीबाचें लग्न जोंपर्यंत झाले नाहीं तोंपर्यंत आपल्या प्रेयसीजवळ येण्याचा एक मार्ग या दृष्टीनें त्याला त्या जागेची मातब्बरी वाटत होती. तिच्याबद्दलचे आपले आडाखे अंधुक आणि अस्थानीं होते असें त्याला वाटूं लागले. त्यानें तिला दिलेला नीतिपाठ म्हणजे तर एक घोडचूकच होती. बोल्डवुडशीं उगीच नखऱ्यानें वागण्याऐवजीं अखेर ती आपल्याशींच चंचलपणें वागली असें गॅब्रिएलला वाटूं लागलें. आतां त्यालाहि हळू हळू वाटू लागलें कीं आपल्यापेक्षां या अशिक्षित बांधवांची समजूतच खरी ठरून, एक दिवशीं बोल्डवुड हा बाथशीबाचा पति होणार. तिच्या चंचलपणामुळें त्याला मरणप्राय यातना होत होत्या तरीहि बाथशीबाविषयींची त्याची भक्ति अभंगच राहिली.

— o —

# २३. " प्रीतिचा भिकारी आला ! "



मेंढ्यांची लोंकर काढण्याचें काम संपल्यावर साऱ्या कामगारांना एक जेवण देण्यांत आलें. घराबाहेरील कुरणावर एक लांब टेबल ठेवण्यांत येऊन त्याचें एक टोंक खिडकींतून बाथशीबाच्या मुख्य दालनांत ठेवलें होतें. त्या टोंकाशीं बाथशीबा बसली असल्यानें घरांत बसूनहि कामगारांच्या मेळाव्यांत असल्यासारखी ती दिसे. या वेळीं बाथशीबाच्या भावना जरा अधिकच उचंबळून आल्यासारख्या दिसत होत्या. तिच्या काळ्याभोर केंसांच्या विरोधामुळें तिचे लाल झालेले गाल आणि आरक्त ओंठ अधिकच उठून दिसत होते. टेबलाच्या दुसऱ्य टोंकाशीं असलेली जागा तिनें जेवणाला सुरुवात होईपर्यन्त मुद्दाम मोकळी ठेविली होती. त्यानंतर त्या जागीं बसून बाजूच्या लोकांकडे लक्ष ठेवण्यास तिनें गॅब्रिएलला सांगितलें. याच क्षणीं बोल्डवुड दारांतून आंत शिरला आणि उशीर झाल्याबद्दल त्यानें बाथशीबाची माफी मागितली. ठराविक योजनेप्रमाणेंच तो येथें आला असावा हें उघडच दिसत होतें. बाथशीबा म्हणाली, " गॅब्रिएल, तुला पुनः उठावें लागणार आहे. कृपा करून ती जागा बोल्डवुडला देतोस कां ? " ओक मुकाट्यानें पूर्वीच्या जागीं जाऊन बसला.

आज बोल्डवुड नेहमीपेक्षां अधिक खुषींत दिसत होता. त्याचे कपडेहि नवे असून रंगीबेरंगी होते.

जेवण संपल्यावर जॉन कोगननें स्वतः होऊन एक गाणें म्हणण्यास सुरवात केली. त्याच्यानंतर जोसेफ पुअरग्रास, स्मॉलबरी वगैरे कामगारांनींहि ग्रामीण स्वरूपाचीं गाणीं म्हटलीं. संध्याकाळ संपून रात्रीचा अंधार हळूं हळूं पसरूं लागला होता. आंतील खोलींत मेणबत्त्या पेटल्या. बाथशीबाच्या शेजारीं

बोल्डवुड जाऊन बसला आहे असें दृश्य साऱ्यांना दिसूं लागलें. बाथशीबाचें एक आवडतें गाणें होतें तें ती नेहमीं फार रंगून म्हणत असे. आज ती तें गाणें म्हणणार कीं नाहीं हाच प्रश्न होता. थोडा विचार करून बाथशीबानें रुकार दिला आणि गॅब्रिएलला बोलावून विचारलें, " तुझी बांसरी आणलीस कां तूं ? "

" होय. "

" मग मी गाणें म्हणेन तेव्हां माझी साथ कर ! " बाथशीबा म्हणाली. खिडकींत उभी राहून, कामगारांकडे तोंड करून ती गाऊं लागली. गॅब्रिएल खिडकीच्या बाजूला, उजव्या हाताला बाहेर उभा होता आणि बोल्डवुड तिच्या डाव्या हाताला खोलींत उभा होता. प्रथम तिचा आवाज जरा कांपरा आणि हळू येत होता. परंतु लौकरच तो स्वच्छ आणि स्थिर होऊन वर चढूं लागला. तिनें म्हटलेलें गाणें त्यानंतर घडलेल्या घटनांमुळें अनेक वर्षेपर्यंत तेथें जमलेल्या लोकांच्या स्मरणांत राहिलें.

**—गोड गोड बोलुन । टाकी मन मोहुन ।**
**शिपाइ सरदार । होइन भरतार ।**
**— म्हणे मोहनेला ।**
**नदीघाटावरी । छबिल्या किती नारी ।**
**परी तिच्यावाणी । दिसली नाहीं कुणी ।**
**—उभ्या दुनियेला ॥**

तिच्या गाण्याला गॅब्रिएलच्या बांसरीच्या मंजुळ स्वराची साथ होती. बोल्डवुड देखील खर्जातल्या स्वरांत हलक्या आवाजांत तिच्याबरोबर गाऊं लागला. सारे कामगार एकमेकांच्या अंगाशीं रेलून अगदीं निस्तब्धपणे तें गाणें ऐकत होते. गीत सपल्यावर साऱ्या श्रोत्यांतून पसंतीचा व आनंदाचा अस्पष्ट हुंकार वातावरणांत पसरला.

बाथशीबाशीं होणारी बोल्डवुडची वागणूक गॅब्रिएलच्या लक्षांत आल्यावांचून राहिली नाहीं. त्याच्या वागण्यांत तसें वावगें कांहीं एक नव्हतें.

साऱ्यांची नजर दुसरीकडे असली म्हणजेच ब्रोल्डवुड तिच्याकडे पाही. दुसरे तिच्याकडे पहात असले म्हणजे त्याची नजर बाजूला वळे. इतरांनीं स्तुति केली, किंवा आभार मानले म्हणजे तो स्तब्ध असे. दुसरे स्तब्ध राहिले म्हणजेच हलक्या आवाजांत तो आभाराचे शब्द उच्चारीत असे.

साऱ्या कामगारांना अखेर रामराम करून, बाथशीबा खोलीच्या आंतील बाजूला निघून गेली आणि खिडकी लावून ब्रोल्डवुडहि तिच्याबरोबरच आंत राहिला.

शांत, सुगंधी वृक्षांखाली गॅब्रिएल ओक एकटाच अंधारांत फिरत राहिला.

—आंतील खोलींत बाथशीबा आणि ब्रोल्डवुड दोघेच होते. एका ठेंगण्या खुर्चावरून उठून ती त्या खुर्चीमागें जाऊन उभी राहिली होती. त्याच खुर्चीवर आपला गुडघा टेंकून, तिच्याकडे वळून ब्रोल्डवुडनें तिचा हात आपल्या दोनही हातांत धरला होता. बाथशीबाचा नेहमीचा धीटपणा जाऊन ती कंपित आवाजांत म्हणाली होती, "तुमच्यावर प्रेम करण्याचा मी प्रयत्न करीन. जर माझी खात्री पटली कीं तुमची पत्नी म्हणून मी नीटपणें वागूं शकेन तर तुमच्याशीं लग्न करण्याला संमतिहि देईन. पण ब्रोल्डवुड! अशा महत्त्वाच्या बाबतींत थोडीबहुत साशंकता कोणाहि स्त्रीला वावगी दिसणार नाहीं. म्हणून आज रात्रीं मी निश्चित आणाभाका देऊं शकत नाहीं. सारी परिस्थिति माझ्या नीटपणें लक्षांत येईपर्यन्त तुम्ही कांहीं आठवडे वाट पहावी अशी माझी विनंति आहे."

ब्रोल्डवुड म्हणाला, "त्यानंतर तरी तुम्हांला खास वाटतं ना ......"

"मला खास वाटतं कीं ५।६ आठवड्यांनंतर म्हणजे आजपासून सुगीच्या आंत हें घडून येईल. या काळांत तुम्ही कुठें बाहेर जाणार आहात म्हणतां तिथून तुम्ही परत आल्यावर तुमच्याशीं लग्न करण्याचं वचन

मला देतां येईल असं मला वाटतं" बाथशीबा निश्चयी स्वरांत म्हणाली, तरी तिनें पुस्ती जोडली, " पण मी अजून वचन दिलं नाहीं हें मात्र नीट लक्षांत ठेवा बरं का ! '

बोल्डवुड म्हणाला, " मला एवढं पुरे. मी आणखी कांहींएक मागत नाहीं. तुझ्या त्या शब्दांसाठीं मी वाट पाहीन आतां. राम राम !"

" राम राम !" शांतपणें स्मित करीत बोल्डवुड तेथून निघून गेला.



## २४. " रणरुचिरा नीति । ना शोभे प्रेमा ती ॥ "



दि वाणजीला काढून टाकल्यामुळें बाथशीबानें अनेक कामें आपल्या अंगावर घेतलीं होतीं. त्यांपैकीं एक म्हणजे रात्रीं झोंपावयास जाण्यापूर्वी साऱ्या शेतीवाडीवर एक फेरी मारून, सर्व कांहीं ठाकठीक आहे कीं नाहीं, हें पहाणें. गॅब्रिएल संध्याकाळीं स्वतः फिरून एकदां देखरेख करून येत असेच. परंतु त्याची ही कार्यतत्परता त्याच्या मालकिणीच्या लक्षांत फारशी आलेली नव्हती आणि जो भाग तिच्या लक्षांत आला त्याबद्दल तिनें फारशी कदरहि केली नाहीं. पुरुषांच्या चंचलतेबद्दल स्त्रिया नेहमींच हळहळ व्यक्त करीत असतात. परन्तु त्यांनीं एकनिष्ठपणा दाखविला तर मात्र त्याबद्दल त्याच त्यांचा पाणउतारा करण्यास मागें पहात नाहींत. गॅब्रिएलच्या उदाहरणावरून तरी तें दिसून येत होतें.

अशी देखरेख करावयास जातांना बाथशीबा झांकण असलेला एक चोरकंदील घेऊन फिरत असे. कान्या-कोपऱ्यांतून प्रकाशाचे झोत टाकून

ती तपासणी करी. स्वतःच्या शेतीवाडीवर कांहीं दगाफटका होईल याची शंकाहि तिला नसे. कांहीं प्रकार दिसून आलाच तर तो म्हणजे एखाद्या घोड्याची व्यवस्था नीट लागली नाहीं, कोंबड्या नीट डालून ठेविल्या नाहींत किंवा एखादें दार नीट लावून घेतलें नाहीं एवढेंच.

अशाच एका रात्रीं घोडे, गाई वगैरेची देखरेख करून 'फर' झाडांच्या एका गर्द राईतून ती आपल्या घराकडे परत चालली होती. दुतर्फा उभ्या असलेल्या फर वृक्षांचीं टोंकें कमानीसारखीं एकमेकांत गुंतल्यामुळें ती सारी राई एखाद्या घनदाट अंधाऱ्या दालनाप्रमाणें दिसत होती आणि बाथशीबाच्या डोक्यावर या झाडाच्या फांद्यांचें एक छतच पसरलें होतें. या दाट अंधारांतून ती पुढें चालली असतां, तिच्यामागून येणाऱ्या पावलांचा आवाज तिच्या कानावर आला. हा रस्ता सार्वजनिक असल्यानें एखादा वाटसरू मागून येत असावा अशी तिची समजूत झाली. ती जवळ जवळ स्वतःच्या घराच्या दाराशीं येऊन पोंचली होती. तेवढ्यांत तिच्या पायघोळ झग्याच्या टोंकाशीं कांहीतरी अडकल्यासारखें होऊन तें जमिनीला खिळून बसलें. त्या धक्क्यानें ती खालीं पडायचीच, तेवढ्यांत तिनें आपला तोल सांवरला. एका पुरुषाच्या कपड्याचा आणि बटनांचा तिला स्पर्श झाला. त्या मनुष्याचा आवाज आला, "लागलं का रे तुला बाबा ?"

निसटून जाण्याचा प्रयत्न करीत बाथशीबा म्हणाली, "तसं नव्हे, आपले कपडे एकमेकांत गुंतले असावेत." बाथशीबानें आपला झगा सोडवून घेण्याचा प्रयत्न केला. परन्तु त्याचा उपयोग झाला नाहीं.

त्या मनुष्यानें विचारलें. "तुमच्याजवळ चोरकंदील दिसतोय् तो उघडूं देतां कां मला ? आतां मोकळं करतों तुम्हाला."

त्या मनुष्यानें कंदील घेऊन दार उघडतांच त्या प्रकाशांत बाथशीबाला एक आश्चर्यकारक दृश्य दिसलें. तिच्या शेजारीं उभा असलेला मनुष्य लाल भडक पोषाख केलेला एक लष्करी शिपाई होता. त्याच्या बुटाला

लावलेल्या टाचेच्या लहान चक्रांत तिच्या झग्याची किनार अडकली होती. बाथशीबा ती किनार सोडवूं लागली, पण तिचे दोरे चक्रांत इतके गुंतून बसले होते कीं, ते निघतां निघेनात. तिनें मध्येंच वर पाहिलें तर तो तिच्याकडे टक लावून पहात होता. तिनें आपली नजर खालीं वळविली. तेवढ्यांत तिला दिसून आलें कीं, हा मनुष्य तरुण सडसडीत अंगाचा असून त्याच्या बाहीवर सार्जेटपदाचे तीन पट्टे होते.

याननंतर त्यानें तें चाक सोडविण्याचा प्रयत्न केला. पण त्यालाहि तें लवकर जमेना. एकदां तर बाथशीबा रागानें म्हणाली, " मी, इथून जाऊं नये म्हणून सोडविण्याऐवजीं तुम्ही अधिकच गुंता करीत आहांत " ती रागानें बोलत होती. परंतु तो मात्र अगदीं शांतपणें, बेफिकीरीनें आणि धीटपणें तिला उत्तरें देत होता. मधून मधून तिच्या सौंदर्याची प्रशंसा करीत होता. अखेर तिनें चिडून विचारलें, " मनाची नाहीं तर जनाचीहि लाज नाहीं असे तुम्ही आहांत तरी कोण ? "

तो हंसत म्हणाला. " अहो मी इथं कोणी परका नाहीं. याच गांवांत सध्यां मुक्काम आहे माझा. माझं नांव सार्जेट ट्रॉय. घ्या सुटली गांठ एकदांची. पण मला विचाराल तर ही कधीं न सुटणारी गांठ असती तर बर झालं असतं असं मला वाटूं लागलं आहे. "

बाथशीबा हळूंच बाजूला सरली आणि पुढें निघून गेली. जातांना तिच्या कानावर त्याचे धीटपणानें उच्चारलेले शब्द आले. " सुंदरीला राम राम. "

बाथशीबानें कांहीं उत्तर दिलें नाहीं. थोडें अंतर चालून गेल्यावर धूम पळतच ती घरांत शिरली. आपल्या खोलींत जातांना लिडी या मोलकरणीच्या खोलीचें दार किलकिलें करून तिनें प्रश्न केला, " लिडी ! आपल्या गावांत कोणी सार्जेट नाहींतर देखणा शिपाई आला आहे कां रहायला ? "

ती म्हणाली, " नाहीं बाईसाहेब, कदाचित् सार्जंट ट्रॉय आला असेल रजेवर — पण मी पाहिलं नाहीं त्याला."

बाथशीबा म्हणाली, " तोच तो मनुष्य. कसा काय आहे ग तो ?"

" अग बाई ! अगदीं रंगेल अन् छटेल आहे स्वारी ! तसा तो हुशार आहे. मनांत आणल असतं तर चांगला पैसा मिळवला असता त्यानं. नावाला तसा तो एका डॉक्टरचा मुलगा. पण खरं म्हणायच तर एका सरदाराची 'कडू' अवलाद आहे ती."

बाथशीबा आश्चर्यानें उद्गारली, " अग बाई ! बरीच भानगड आहे म्हणायची ! खरं का हें सारं ?"

" होय ! कैक वर्षे कॅस्टरब्रिजच्या शाळेंत होता तो. कितीक भाषांचं ज्ञान आहे त्याला. पण आपल्या बुद्धीचा दुरुपयोग केला त्यानं अन् अखेर सैन्यांत शिरला तो. कांहीं खटपट न करतां आतां सार्जंट झालाय. सरदाराचं रक्त आहे तें, कधीं लपून राहिलंय ? अन् तोच घरीं आलाय् कां आतां ?"

थोडा राग आला तरी अशा माणसाविषयीं कायमचा राग कोणत्या स्त्रीला येऊं शकेल ? बाथशीबासारख्या मुलींना कांहीं कांहीं वेळीं अगदीं जगावेगळी वर्तणूक देखील चालूं शकते. कोणीतरी आपली स्तुति करावी, कोणीतरी आपल्यावर सत्ता गाजवावी असें तिला मनांतल्या मनांत वाटत होतें. त्यांत तो निघाला एक देखणा तरुण, चांगला पूर्वीचा गर्भश्रीमंत. आपल्या खोलींत गेल्यावर ती स्वतःशींच उद्गारली, " किती चमत्कारिक योगायोग हा ! अन् अशा चांगल्या सभ्य माणसाजवळून मी रुसून निघून आलें. हें अगदीं शोभलं नाहीं मला." त्या मनुष्यानें तिच्या सौंदर्याची अगदीं उघडपणें स्तुति केली त्यावेळीं तिला तो अपमान वाटला होता. पण आतां तो तिला तसा वाटत नव्हता हें उघड होतें.

बोल्डवुडनें तिला " तूं किती सुंदर आहेस !" असें कधींहि म्हटलें नव्हतें ही त्याची मोठीच घोडचूक होती.

## २५. "ऐसो चंचल, चपल, हट, नट, घट...."



जेंट ट्रॉय हा एक तऱ्हेवाईक मनुष्य असून त्यानें अनेक स्थित्यंतरें पाहिलीं होतीं. त्यामुळें तो चार चौघांपेक्षां निराळा असा दिसत असे. डोळ्यांसमोर असेल त्याचा विचार करावा, आजची घडी साधावी एवढेंच त्याला माहीत होतें. त्याच्या दृष्टीनें गतकाल म्हणजे केवळ कालचा दिवस. भविष्यकाळ म्हणजे फार तर उद्यांचा दिवस आणि कधीं न येणारा काळ म्हणजे परवांचा दिवस. यापलीकडे त्याने कधीं विचारच केला नाहीं आणि जिवाला काळजीहि लावून घेतली नाहीं. तो कधीं कसली आशा उराशीं बाळगीत नसे आणि त्यामुळें कधीं निराशाहि त्याच्या पदरीं येत नसे. पुरुषांशीं वागतांना तो थोडेंबहुत खरें बोलत असे पण बायकांच्या बाबतींत त्याच्या खोटें बोलण्याला सीमाच नव्हती. यामुळें रंगेल लोकांच्या समुदायांत तो चटकन लोकप्रिय होई. ही लोकप्रियता अल्पजीवी असली तरी उद्यांची बात उद्यां असें म्हणून तो त्याबद्दल बेफिकीर असे. त्याचे नैतिक आचरण प्रशंसा करण्यासारखें नव्हतें. तरी त्याचे दुर्गुण अगदीं हिडीसपणाच्या सीमेपलीकडे कधीं जाऊन पोंचत नसत. त्यामुळें लोकांनीं त्याच्या वागणुकीबद्दल नापसंती दर्शविली तरी त्यांत हंसण्यावारी नेण्याचाहि थोडा भाग असे. त्याची बुद्धि चलाख होती आणि स्वभावांत निश्चयीपणाहि होता. त्याच्या बोलण्यांत चमक असे. पण त्याचें वागणें सामान्य लोकांच्यापेक्षां हीन दर्जाचेंच असे.

मध्यम वर्गाच्या दृष्टीनें पाहिलें तर तो चांगला सुशिक्षित होता. सामान्य शिपायाचे दृष्टीनें बोलायचें तर त्याला खूपच शिकलेला म्हणावें लागेल. तो अस्खलितपणें आणि सतत बोलत राही. मनात एक विचार ठेवून तो दुसऱ्याच बाबतींबद्दल बोलूं शके. प्रेमाबद्दल

बोलत असतां त्याच्या मनांत जेवणाचे विचार येत. एखाद्याच्या बायकोकडे पहाण्यासाठीं तो तिच्या नवऱ्याची भेट घेई, आणि मनांतून उधारी ठेवण्याची इच्छा असून वरकरणी पैसे देऊन टाकण्याची भाषा बोले. अगदीं धीटपणें खुशामत केली तरी तिची स्त्रियांवर आश्चर्यकारक मोहिनी पडते, हें एक सर्वमान्य सत्य आहे. मात्र या सत्यापासून निघणाऱ्या अनेक गौण बाबतींकडे लोक फारसें लक्ष देत नाहींत. सार्जंट ट्रॉयनें या सर्व बाबतींत असामान्य कौशल्य मिळविलें होतें. स्तुति करून, गोड गोड थापा देऊन, एखाद्या ढोंगी पुरुषाला स्त्रीवर एवढी हुकुमत मिळवितां येते कीं त्यामुळें तो तिचा सर्वनाश करूं शकतो. हें सत्य अनेकाना कटु अनुभवावरून पटलेलें आहे. सार्जंट ट्रॉय अशा प्रकारच्या प्रयोगांना निढावलेला होता.

तो अगदीं सहजपणें म्हणत असे कीं बायकांशीं वागण्याचे प्रकार दोनच—एक म्हणजे त्यांची स्तुति करणें किंवा दुसरा म्हणजे त्यांना शिव्या देणें त्याच्याशीं नीटपणानें वागायला गेलांत कीं तुम्ही बुडालांतच. सार्जंट ट्रॉय हा अशा प्रकारचा मनुष्य होता.

मेंढ्यांची लोंकर कापून झाल्यावर एक दोन आठवड्यांनंतर बाथशीबा बऱ्याच उल्हसित वृत्तीनें आपल्या कुरणांत येऊन गवत कापणाऱ्या कामगारांवर देखरेख करीत होती. गडी गवत कापीत होते. कापून झालेलें गवत गाड्यांत भरण्याचें कामहि सुरूं होतें. पेंढ्या गोळा करून बायका गंजी रचीत होत्या. एका गाडीमागें सार्जंट ट्रॉय देखील गंमत म्हणून गाडींत गवत रचण्याचें काम करीत होता. बाथशीबा शेतांत आल्यावर सार्जंट ट्रॉय आपली छडी उचलून घेऊन तिच्याजवळ आला. बाथशीबा जरा लाजली, संकोचली, तिला थोडा रागहि आला.

## २६. " मधुमधुरा तव गिरा ! "




सार्जेंट ट्रॉय तिला सलाम करीत, जवळ येत म्हणाला, " त्या रात्रीं मी तुमच्याशीं बोलत असेन याची मला कल्पनाहि नसेल. तेव्हां मी जरा फटकळपणेंच बोललों याबद्दल तुमची मी हजार वेळा माफी मागतों. तुमचे काका जिवंत असतांना लहानपणीं मी याच शेतांत अनेकदां काम केलेलें आहे. आज तुमच्यासाठीं मी तीच कामगिरी केली. "

बाथशीबा म्हणाली, " मग त्याबद्दल मी तुमचे आभार मानायला हवेत कीं काय ? "

सार्जेंट फुरंगटून म्हणाला, " छे छे तसं कांहीं करूं नका !'

बाथशीबा म्हणाली, " तसं नाहीं हेंच बरं आहे. "

—"कां ? विचारूं कां तुम्हांला ? राग येणार नसेल तर ?"

—" कारण मला कशासाठींहि तुमचे आभार मानण्याची इच्छा नाहीं. "

सार्जेंट ट्रॉय म्हणाला, " एखादी स्तुति उर्मटपणासारखी वाटते. माझ्या बाबतींत तसं झालं असेलाहि पण मी आपला एक साधाभोळा, फटकळ मनुष्य आहे. मनांत आलं तें लपवून न ठेवतां मी भाबडेपणानं बोलून जातों. अन् यामुळें माझ्यावर हा मोठा गहजब ओढवला आहे. "

बाथशीबा बाजूला वळून म्हणाली, " तसं कांहीं नाहीं. पण, स्तुति करतांना देखील एकाद्या नवख्या माणसानं इतकं धीटपणानं आणि ऊर्मटपणानं वागावं हें मला खपणार नाहीं. "

सार्जेट ट्रॉय बेफिकीरीनें म्हणाला, " अस्सं. एकूण कृती-पेक्षां पद्धतीचा तुम्हाला राग आला म्हणायचा ! " हातांतील छडी फिरवीत तो बाथशीबाच्या मागून जात म्हणाला, " मिस् एव्हरडीन ! मला क्षमा कराल कां तुम्ही ? "

—" तसं नव्हे ! "

—" कां ? "

—" तुम्ही कांहींच्या कांहींच बोलतां. "

—" तुम्ही सुंदर आहांत असं मी म्हणालों आणि तशा तुम्ही आहांतच. आतांपर्यंत मी पाहिलेल्या सर्व स्त्रियांत तुम्ही सुंदर आहांत हें मी शपथेवर सांगतों. माझ्या या सांगण्यांत कांहीं विशेष नाहीं; तें उघडच आहे. मग तें सांगितल्याबद्दल तुम्हीं मला माफी कां करीत नाहीं ? "

आपण सुंदर आहोंत हें स्वतःलाहि माहीत आहे अशी कबुली बाथशीबाकडून सार्जेट ट्रॉयनें एकदां मिळविल्यावर त्याचा मोठाच विजय झाला. तो मनांतल्या मनांत हंसला. बाथशीबाच्या चर्येवरून आणि बोलण्या-वरून निर्विवादपणें दिसत होतें कीं सर्व भावी घडामोडीचें बीज त्याच वेळीं तिच्या मनांत रुजलें होतें. एवढें झाल्यावर पुढें घडणाऱ्या घटना केवळ कालमानाप्रमाणें घडत जाणार हें ठरलेंच. तिच्या जीवनाला एक निराळीच दिशा लागत होती.

बाथशीबा जरा कंपित आवाजांत म्हणाली, " तुमचं बोलणं मोठं लाघवी आहे ! लढाईत जर तुम्ही अशाच खुबीनें लढलांत तर तुम्हीं केलेल्या जखमेनें देखील शत्रूला आनंदच वाटेल. " ही कबुली देण्यांत आपली चूक झाली हें लगेच बाथशीबाच्या लक्षांत आलें. ती सुधारून घेण्याचा प्रयत्न करतांना तिनें आणखी घोडचूक केली. ती म्हणाली, " पण तुमच्या बोलण्यानं मला आनंद वाटतो असं मात्र समजूं नका हो ! "

आपल्या बोलण्यानें त्याला वाईट वाटूं नये म्हणून अखेर समजावणीच्या स्वरांत ती म्हणाली, ' बरं जाऊं द्या, आतां याचा विचार करूं नका. तुम्ही शेतांत येऊन मदत केलीत याबद्दल मी आभार मानतें तुमचे. पण एवढं ध्यानांत ठेवा, पुनः माझ्याबरोबर बोलूं नका तुम्ही. ''

'' ही फार कठोर शिक्षा झाली बाथशीबाबाई ! पण तुम्हांला माझ्याशीं बोलायची वेळच येणार नाहीं, कारण माझा मुक्काम फार थोडा आहे. मला पुनः लष्करातल्या हडेलहप्पीच्या जीवनांत परत जायचं आहे. इथल्या रुक्ष जीवनांत जो थोडा आनंद होता तो देखील तुम्ही हिरावून नेत आहांत. हं ! औदार्य हा स्त्रियांचा स्वभावगुण नाहींच म्हणायचा एकूण ! ''

—'' केव्हां जाणार तुम्ही इथून ? '' बाथशीबानें थोडया कुतूहलानें विचारलें.

—'' महिनाभरांत. ''

—'' पण माझ्याशीं बोलून तुम्हांला काय आनंद मिळणार ? ''

—'' माझा गुन्हा काय झाला याची तुम्हाला जाणीव असून तुम्ही मला हा प्रश्न कसा विचारतां ? तुमच्या प्रेमानं मी अगदीं वेडा झालोंय ? ''

—'' असं कसं होईल ! तुम्ही मला तर त्या रात्रींच एकदां पाहिलंत ! ''

'' त्यानं कांहीं फरक पडत नाहीं. वीज आपलं काम एका क्षणांतच करीत असते. तुम्हाला पाहिल्याबरोबर माझं तुमच्यावर प्रेम जडलं ''

बाथशीबा त्याच्याकडे संशयाच्या नजरेनें पहात म्हणाली, '' तुमचं इतकं प्रेम असणं शक्य नाहीं. मनुष्याला एकाएकी इतकं वाटू शकत नाहीं. आतां मी आणखी तुमचं कांहीं ऐकणार नाहीं. किती वेळ गेला ! आतां किती वाजले असतील कोण जाणे ! ''

—सार्जंट ट्रॉयनें आपल्या घड्याळांत पाहून किती वाजले तें सांगितलें आणि तो म्हणाला, " तुमच्या जवळ घड्याळ नाहीं कां ? "

——बाथशीबा म्हणाली, " सध्यां नाहीं, नवं घेणार आहे मी एक. "

" नको ! मग देणगी म्हणून या घड्याळाचा स्वीकार करा" असें म्हणून त्यानें एक चांगलें जड, सोन्याचें घड्याळ तिच्या हातांत ठेवलें. सेव्हर्नच्या सरदार घराण्यातलें हें घड्याळ असून तें त्याच्या आईला भेट म्हणून मिळालें होते. बाथशीबानें तें घड्याळ स्वीकारलें नाहीं. परन्तु ट्रॉय-बरोबर बोलणें चालणें चालू ठेवण्याचें, त्याला आपल्या शेतांत काम करूं देण्याचें वचन तिला द्यावें लागलें. ट्रॉय तेथून निघून गेल्यावर परत फिरून शेतांतील कामगारांना तोंड दाखविण्याची बाथशीबाला लाज वाटूं लागली. तिचें हृदय भावनेनें भारावलें होतें, शंकाकुल झालें होतें, आणि तिचे डोळे भरून आले होते. घराकडे परत जात असतां ती स्वतःशींच पुटपुटत होती " काय केलें हें मी ! काय याचा अर्थ ? यांतलं खरं किती हें मला कळलं तर किती बरं होईल ! "

---

## २७-२८"....ती तलवार एक तुमची, बाकी विळे कोयते"



मागील प्रसंगानंतर बाथशीबा आणि सार्जंट ट्रॉय यांचा परिचय वाढतच गेला. दुसरे दिवशीं बाथशीबा मध-माशांच्या पोळ्यांची व्यवस्था लावीत असतां सार्जंट ट्रॉयनें तेथें येऊन तिला मदत केली. एक पोळें हातांत धरून तो सहजपणें म्हणाला, " हें पोळें हातांत धरून धरून माझा हात इतका दुखायला लागला आहे कीं आठवडाभर तलवारीचे हात करून सुद्धां तो दुखला नव्हता. "

बाथशीबा कुतूहलानें म्हणाली, " तरवारीचे हात मी अजून पाहिलेच नाहींत! "

ट्रॉय म्हणाला, " पहायची इच्छा आहे कां तुमची? "

—" होय. पहावंसं फार वाटतं मला. पण एखादी छडी हातांत घेऊन केलेले वार नव्हे. खऱ्या तलवारीचे वार हवेत ते. "

ट्रॉय म्हणाला, " संध्याकाळपर्यन्त मी आणतों तलवार, " आणि खालीं वांकून त्यानें तिच्या कानांत कांहीं सूचना केली.

बाथशीबा लाजून म्हणाली, " तसं करतां येणार नाहीं मला. " थोडे आढेवेढे घेऊन अखेर थोडा वेळ कां होईना, ट्रॉयच्या सूचनेप्रमाणें एकटी येऊन त्याचे तलवारीचे हात पहाण्यास तिने संमति दिली.

बाथशीबाच्या घरासमोरील माळरानावर एक टेकडी होती. तिच्या मध्यावर बशीच्या आकाराची एक गोल दरी असून तिचा सर्व पृष्ठभाग मऊ अशा नेच्यांनीं—( फर्न या वनस्पतींनीं ) आच्छादलेला होता. या दरीच्या मध्यावर उभें राहिलें असतां सर्व बाजूंना या हिरव्यागार वनस्पती वरपर्यंत पसरलेल्या दिसत. या गोल जागेचा कांठाशीं असलेला व्यास सुमारें तीस फुटांचा होता. तळाशीं गवत आणि वनस्पती यांचा मऊ गालीचा पसरला होता. संध्याकाळचे सूर्यकिरण या जागेवर उतरत होते त्यावेळीं बाथशीबा तेथें ट्रॉयचें तलवारबाजीचें कौशल्य पहाण्यासाठीं आली.

दरीच्या मध्याशीं उभें राहून ट्रॉयनें आपली तलवार बाहेर काढली. ती वर धरून सलामीचा पवित्रा घेतला. " पहिल्यानें उजव्या बाजूचे हे चार वार, मग डाव्या बाजूचे असे चार वार, मग चार उजवे आणि चार डावे, मग खोंच मारण्याचे प्रकार हे सुरुवातीचे हात झाले. " प्रत्येक हाताचें वर्णन करून त्याचें प्रात्यक्षिक ट्रॉय करून दाखवीत होता.

" यानंतरचा हात, हा—म्हणजे आपण दाणे पेरतों तसा. "

ट्रॉयनें तो हात करून दाखविला तेव्हा एखादें उलटें इंद्रधनुष्य आकाशांत चमकून जावें तसा बाथशीबाला भास झाला.

" आतां दुसरा हात–जणूं काय कुंपण कापावें तसा, तिसरा– कापणी करतों तसा. हात चौथा–मळणी करतों तसा. हे उजव्या बाजूचे हात झाले. तसेच डाव्या बाजूचे. तसेंच खोंच मारण्याचे प्रकार आणखी करून दाखवूं कां पुनः ? हे ठरलेले घोडदळाचे प्रकार झाले. पायदळाचे शिपाई तलवारीचे दोन भयंकर वार तलवार वर नेऊन करतात. ते फार क्रूर असल्यानें आम्ही करीत नाहीं.

बाथशीबा शहारून उद्गारली " किती खुनशी आणि भयंकर ! "

ट्रॉय म्हणाला, " आतां थोडी तलवार छूट दाखवतों तुम्हांला. पहायला ती यापेक्षां अधिक मौजेची आहे. यांत सर्व वार, खोंच, घोडदळाचे आणि पायदळाचे तलवारीचे हात एकत्र येतील. आतां समजा तुम्ही माझ्या शत्रूच्या जागीं आहांत. तुमच्या भोंवतालीं माझे तलवारींचे हात फिरतील. अगदीं एक दोन केंसांच्या अंतरावरून माझी तलवार जाईल. भिणार, हलणार नाहीं ना तुम्ही ? "

ती निश्चयानें म्हणाली, " बिलकूल नाहीं "

बाथशीबाच्या धाडसी स्वभावाला हें एक नवीनच खाद्य मिळालें होतें. ट्रॉयसमोर, सांगितल्या जागीं ती येऊन उभी राहिली. तो म्हणाला, " मला जे हात करायचे आहेत त्यासाठीं जरूर तितका धीटपणा तुमच्या अंगीं आहे कीं नाहीं याची मी प्राथमिक चांचणी घेतों. " यानतर त्यानें कौशल्यानें तलवारीचा एक हात केला. तलवारीचें टोंक एक क्षणभर डाव्या बाजूला तिच्या कमरेच्या वर तळपलें आणि दुसऱ्या क्षणीं तिच्या उजव्या बाजूला निघालें तें जणूं काय आपल्या शरिरांतूनच आरपार निघून गेलें कीं काय असें तिला वाटूं लागलें. परंतु ती पहाते तों तलवारीवर रक्ताचा

डागहि नसून ती ट्रॉयनें हातांत सरळ उभी धरली होती. क्षणांत वीज चमकून जावी तेवढ्यांत हा तलवारीचा हात होऊन गेला. ती भिऊन ओरडली " मला वाटलं तुमची तलवार माझ्या शरिरांतच घुसली; पण तसं नाहीं. कसा केलांत हा तुम्ही हात ? "

ट्रॉय शांतपणें म्हणाला, " तुमच्या अंगाला तलवारीचा स्पर्शहि झाला नाहीं. हें नुसतें हस्तकौशल्य आहे बरं. आतां नाहीं ना भीति वाटत तुम्हाला ? कारण जर तुम्ही भ्यालांत तर मला नाहीं हात करून दाखवतां येणार. तुम्हाला इजा होणार नाहीं, एवढंच नव्हे तर तलवारीचा तुम्हांला स्पर्शहि होणार नाहीं असं वचन देतों मी. "

" खात्री आहे तुमची ? तुमच्या तलवारीला धार फार आहे कां ? " " बाथशीबानें विचारलें. " छे बिलकुल नाहीं. एकाद्या पुतळ्यासारखे स्थिर उभे रहा म्हणजे झालं. पहा आतां " ट्रॉय उत्तरला.

--आणि एका क्षणांत बाथशीबाच्या डोळ्यांपुढील सारा देखावा बदलून गेला. मावळत्या सूर्याचे किरण ट्रॉयच्या तलवारीवरून परिवर्तित होऊन तिच्या भोंवतालीं, वर, समोर, असे खेळूं लागले कीं तिला समोरची जमीन किंवा आकाश कांहींच दिसेना. या किरण-शलाका तिच्याभोंवतीं गरगर फिरत होत्या आणि त्यांच्याबरोबरच शीळ घातल्यासारखे वाऱ्याचे झोतहि सर्व बाजूंना तलवारीच्या पात्याबरोबर फिरत होते. सारें आकाश उल्कापातानें भरून जावें असा तो देखावा दिसत होता. या वेळीं सार्जंट ट्रॉयनें जितक्या कौशल्यानें तलवार फिरविली असेल तितकें कौशल्य यापूर्वी कोणी दाखविलें नसेल. या दरींत, सध्याकाळच्या सूर्यकिरणात बाथशीबासमोर आपलें तलवारबाजीचें कौशल्य दाखवितांना ट्रॉय विशेषच खुशींत होता. हळूं हळूं तिच्या भोंवतालचें किरण-जाल विरळ होऊं लागलें. तलवारीचा फिरण्याचा आवाज मंद होऊ लागला, ट्रॉयच्या हाताच्या हालचाली स्पष्टपणें दृग्गोचर होऊं लागून अखेर तो थांबला. बाथशीबा पुनः हलूं, बोलूं लागण्याआधींच तो म्हणाला, " तुमच्या केसांची एक बट बाहेर आली आहे. आतां ती नीट करतों बघा. "

तिच्या उजव्या बाजूला एक चांदीची चंद्रिका चमकून गेल्यासारखें दृश्य तिला दिसलें. ट्रॉयची तलवार खालीं आली आणि तिच्याबरोबर बाथशीबाच्या केसांची बटहि जमिनीवर पडली.

--ट्रॉय उद्गारला, " भले शाबास, एक तसूभरहि हाललां नाहीं तुम्ही. बायकांच्या जातीला ही आश्चर्याचीच गोष्ट म्हणावी लागेल. आतां आणखी एकदां. "

—बाथशीबा घाबरून ओरडली, " नको ! नको !! आतां मला भीति वाटते तुमची.

ट्रॉय म्हणाला, " तुम्हाला अगदीं स्पर्श देखील होणार नाहीं, केसालाहि नाही. तुमच्या अंगावरून ही एक अळी चालली आहे तिला कसा ठार करतो तें पहा आतां. स्तब्ध रहा आता अगदीं. "

—बाथशीबाच्या वक्षस्थलावर एक अळी स्थिरावली होती. ट्रॉयच्या तलवारीचें टोक तेथपर्यंत येऊन शिरल्यासारखें दिसू लागलें. बाथशीबाची खात्री झाली–कीं अखेर आपण ठार झालों ! तिनें डोळे मिटले पण विशेष कांहींच न वाटल्यानें तिनें डोळे उघडले.

" ही पहा ती अळी " असें म्हणून सार्जेटनें तलवार तिच्या डोळ्यापुढें धरली. तलवारीच्या टोंकावरच ती अळी रुतून बसली होती.

" अग बाई ! ही तर कांहीं तरी जादू आहे. " बाथशीबा आश्चर्यानें उद्गारली, "पण काय हो! तुम्ही तर म्हणालां कीं, तलवारीला धारच नाहीं अन् मग माझ्या केंसांची बट कशी कापतां आली तुम्हाला ? "

ट्रॉय हंसून म्हणाला, " धार नाहीं ? अहो, या तलवारीला वस्तऱ्यासारखी तीक्ष्ण धार आहे ! तळहातावर तलवारीचें पातें त्यानें टेकविलें आणि एक पातळ त्वचेचा पापुद्रा काढून दाखविला. " तुम्ही स्वस्थपणें

न हालतां उभें रहावें यासाठीं, तुमच्या सुरक्षिततेसाठीं, हें असत्य सांगावें लागलें मला."

बाथशीबाचें सारें अंग शहारलें. ती म्हणाली, "म्हणजे अगदीं मृत्यूच्या दारांत उभी होतें मी न कळतां! कसली जीवघेणी रीत ही तुमची!"

ट्रॉय म्हणाला, "कांहीं झालें तरी तुमच्या जिवाला बिलकुल धोका नव्हता. माझी तलवार कधींच चुकत नाहीं." असें म्हणून त्यानें आपली तलवार म्यान केली. "तुमची आठवण म्हणून ही वस्तू मी माझ्याजवळ ठेवतों असें म्हणून ट्रॉयनें ती केसांची बट उचलून घेतली. भावनाकुल होऊन बाथशीबा शून्यपणें गवताच्या एका गुच्छाकडे पहात उभी राहिली होती. त्याला नकार देणें किंवा प्रतिकार करणें तिला अशक्य झालें होतें.

सार्जेंट ट्रॉय तिच्या अगदीं जवळ आला आणि म्हणाला, "आतां मला जायला हवं" असें म्हणून, तलवारीचें पातें तळपून जावें तसा तो चटकन् तेथून निघून गेला. त्या क्षणात तिचा सारा चेहरा लालबुंद झाला आणि डोळ्यांत अश्रू उभे राहिले. आपण एखादें मोठें पाप केलें आहे असें तिला वाटू लागलें.

— कारण जातां जातां चटकन् वांकून ट्रॉयनें तिचें चुंबन घेतलें होतें!!

## २९ "एकैकमप्यनर्थाय। किमु यत्र चतुष्टयम्॥"



बाथशीबाच्या स्वभावांत अनेक गुणदोष मिसळून गेले होते. त्यांत आतां मूर्खपणाचा नवा विशेष दिसून येऊं लागला. तो दोष तिच्या स्वभावांत मूळचा नसून प्रणया-

मुळें तो तिच्या अंगांत भिनूं लागला होता. बाथशीबाचा स्वभाव तसा कणखर होता. परन्तु तिच्यासारख्या निश्चयी स्त्रिया जेव्हां आपला कणखरपणा टाकून देतात तेव्हां त्या कमकुवत स्त्रियांपेक्षांहि कमकुवत होतात. ट्रॉयवर प्रेम करूं लागल्यापासून बाथशीबाची स्थिति तशीच झाली. त्यांतून हा अनुभव तिला अगदींच नवा आणि अभूतपूर्व असा होता. नाविन्यामुळें असा कमकुवतपणा अधिकच कमकुवत होतो.

सार्जेंट ट्रॉयच्या अंगांतहि कांहीं दोष होते. परंतु त्याच्या स्वभावांत ते अगदीं खोल दडलेले असून स्त्रियांच्या दृष्टीला न दिसण्यासारखे होते. त्याचे गुण मात्र चटकन नजरेंत भरत. या बाबतींत साध्याभोळ्या गॅब्रिएल ओकची स्थिति उलट प्रकारची होती. त्याचे दोष एखाद्या आंधळ्यालाहि दिसतील इतके ढोबळ स्वरूपाचे होते आणि गुण मात्र खाणीमध्यें खोल दडलेल्या धातूप्रमाणें नजरे-आड रहात असत. बोल्डवुडच्या बाबतींत म्हणायचें तर बाथशीबाच्या मनांत त्याच्याविषयीं प्रेम नसून आदर मात्र होता; आणि तो तिनें लिडीला उघडपणें बोलूनहि दाखविला होता. परंतु ट्रॉयविषयींच्या आपल्या भावना तिनें हृदयांतच दडवून ठेवल्या होत्या.

बाथशीबाची ही मोहवश स्थिति गॅब्रिएलच्या नजरेस आली आणि त्यामुळें त्याला वाईट वाटूं लागलें. बाथशीबाचें आपल्यावर प्रेम नाहीं याबद्दलच त्याला पूर्वी वाईट वाटत असे; पण आतां ती ट्रॉयच्या मोहपाशांत अडकत आहे हें पाहून त्याला त्याहूनहि अधिक दुःख झालें. त्यापुढें स्वतःचें वैयक्तिक दुःख तो जवळ जवळ विसरूनच गेला. एकदां आपल्या मालकिणीशीं या बाबतींत बोलावयाचेंच असा त्यानें निश्चय केला; आणि एके दिवशीं संध्याकाळीं तशी संधिहि चालून आली.

शेतांतील गहूं आतां चांगलाच उंच वाढला होता. त्यामधील पाय-वाटेनें थोडें फिरून येण्यासाठीं बाथशीबा निघाली होती. विचारमग्न स्थितींत परत येत असतां ओकला ती वाटेंत भेटली. ती पायवाट एकच मनुष्य उभा राहूं शकेल एवढी अरुंद होती. ओकनें बाजूला वळून, बाथशीबाला वाट करून दिली.

अर्धवट अंधारांत तिनें त्याला ओळखलें. ती पुढें निघाल्यावर ओकहि तिच्यामागून जात तिला म्हणाला, " अलीकडे या बाजूला कांही मवाली हिंडूं लागले आहेत. तुम्हाला परत येण्याला उशीर झाल्यामुळें मी तुमच्या सोबतीसाठीं आलों. "

बाथशीबा शांतपणें म्हणाली, " मेहेरबानी झाली तुमची, मला नाहीं भीति वाटत त्या मवाल्यांची, आणि मला तसे लोक कधीं भेटलेहि नाहींत. "

प्रथमतः मवाल्यांबद्दल बोलणें काढून त्यांत सार्जेंट ट्रॉयच्या नांवाचा उल्लेख करावा असा ओकचा हेतु होता. पण त्याचा तो बेत फसला. कारण त्याला अशी जाणीव झाली कीं इतकें उघडपणें बोलणें अगदीं अडाणी-पणाचें होईल. मग त्यानें दुसरीकडे मोहरा फिरविला. तो म्हणाला, " खरं तर तुम्हाला असं भेटायला बोल्डवुडनेंच यायला हवं होतं. पण तो हजर नसल्यामुळें मीच आलों झालें. " बाथशीबानें जरा कडवटपणें प्रश्न केला, " तुमच्या या बोलण्याचा अर्थ नाहीं माझ्या लक्षांत आला नीटसा ! "

—" स्पष्ट बोलतों त्याची माफी असावी. माझ्या म्हणण्याचा अर्थ असा कीं तुमचं त्याच्याशीं लग्न होणार आहे या दृष्टीनं मी त्या भेटी-बद्दल बोललों. "

बाथशीबानें चटकन उत्तर दिलें, " लोक बोलतात तें खरं नाहीं. आमचं लग्न होणार नाहीं. आतां विषय निघालाच आहे—या बाबतींत बराच गैरसमज पसरलेला दिसतो तो दूर करण्याची ही संधि मिळाली हेंहि बरंच झालं बोल्डवुडला मी निश्चित वचन असं कोणचंच दिलं नाही. त्यानं मला लग्नाची गळ घातली होती.—मला त्याच्याबद्दल आदर असला तरी त्याच्याकडे माझ्या मनानें कधींच ओढ घेतली नाहीं. तो आल्याबरोबर मी त्याला स्वच्छ उत्तर देणार आहे कीं तुमच्याशीं लग्न करण्याचा विचारहि करतां येत नाहीं मला. "

ओक म्हणाला, " मागं लोक म्हणत कीं बोल्डवुडशीं तुम्ही उगीच खेळ चालविला आहे. आणि मग तुम्ही आपल्या कृतीनें जवळ जवळ दाखवून दिलंत कीं तसा काहीं प्रकार नाहीं. आतां ते म्हणायला लागलेत कीं बोल्डवुडशीं चाललेलं तुमचं वर्तन काहीं थिल्लरपणाचं नाहीं खरं. आणि त्यांची अशी समजूत झाल्याबरोबर तुम्ही अशा वागायला लागला आहांत कीं......"

" त्याच्याशीं मी थिल्लरपणानें वागतें असंच म्हणायचं आहे तुम्हाला ? मीं थिल्लरपणानें वागत नाहीं, पण मला त्याच्याशीं संबंधच ठेवायचा नाहीं. "

दुर्दैवाची गोष्ट अशी कीं बोल्डवुडचा प्रतिस्पर्धी ट्रॉय याच्याबद्दल यानंतर ओकनें बोलणें काढलें. त्याचा रोख अगदीं चुकला होता. तो उसासा टाकून म्हणाला, " या सार्जंट ट्रॉयची आणि तुमची भेटच झाली नसती तर फारच बरं झालं असतं. तो तुम्हाला बिलकुल लायक नाहीं. "

बाथशीबानें कठोर स्वरांत प्रश्न केला, " अशा रीतीनं बोलायला कोणी सांगितलं होतं कां तुम्हाला ? "

" छे ! कोणी नाहीं. "

" मग इथें सार्जंट ट्रॉयचा कांहींएक संबंध येत नाहीं. बोलायचंच असलं तर मी म्हणेन कीं सार्जंट ट्रॉय चांगल्या कुलशीलाचा, सुशिक्षित आहे अन् कोणाहि स्त्रीला शोभेल असा आहे. "

गॅब्रिएल ओक अजीजीच्या स्वरांत म्हणाला, " मला वाटतं त्या माणसाच्या अंगीं इमान बिलकुल नाहीं. त्याच्याशीं कांहीं एक संबध ठेवूं नका अशी मला तुमच्या हिताच्या दृष्टीनं तुम्हाला विनति करायची आहे ! "

बाथशीबा भावनाकुल होऊन म्हणाली, " त्याच्याबद्दल अशा रीतीनं बोलणं शोभत नाहीं तुम्हाला. तसा तो अगदीं सचोटीचा

मनुष्य आहे. जरा फटकळ असेल. पण मनांत असेल तें तोंडावर बोलून दाखविणारा मनुष्य आहे तो. ”

ट्रॉयवर बाथशीबानें इतका विश्वास टाकावा याचें ओकला वाईट वाटलें. तो शांतपणें म्हणाला, “ हें पहा, माझं तुमच्यावर प्रेम होतं हे तुम्हाला माहीत आहे. माझं प्रेम सदैव कायम राहील. हें सांगायचं कारण एवढंच कीं, तुमचं कांहींहि वाईट होऊ नये अशी माझी इच्छा आहे. बाकी त्या प्रेमाची गोष्ट मी बाजूलाच ठेविली आहे. संपत्तिवैभवाच्या शर्यतींत मी हरलों. आतां मी गरीब झालों; तुम्ही श्रीमंत झालांत. अशा स्थितींत मला तुमचा लाभ होईल अशी समजूत करून घेण्याइतका मी मूर्ख नाहीं. पण बाथशीबा ! प्रिय बाथशीबा ! एवढा विचार तुम्ही करावा अशी माझी विनाति आहे. कामगार लोकांत तुमचा मान रहावा म्हणून, आणि माझ्या-प्रमाणेंच तुमच्यावर ज्या सन्मान्य गृहस्थानं जिवाभावान प्रेम केलं त्याच्याशीं न्याय्य वागणूक असावी म्हणून तरी या शिपायाशीं वागतांना तुम्ही जास्त मर्यादा ठेवून वागत जा. ”

भरलेल्या कंठानें बाथशीबानें उद्गार काढला “ नका ! बोलूं नका पुढं. ”

गॅब्रिएल पुन्हां म्हणाला, “ माझं नीट ऐका ! तुमच्याहून मी सहा पावसाळे अधिक काढलेत. माझ्या प्राणापेक्षां तुम्ही मला प्रिय आहांत. बोल्डवुड माझ्यापेक्षांहि दहा वर्षांनीं वडील आहे. अजून वेळ गेली नाहीं तोंपर्यन्त जागे व्हा. त्याच्या छत्राखालींच तुमचं खरं रक्षण होईल ! ”

बाथशीबाचा चेहरा पांढरा फटक पडला होता. कांपऱ्या आवाजांत ती म्हणाली, “ आतां तुम्ही इथून दुसरीकडे जावं हेंच बरं. माझ्या शेतावर तुम्ही राहूं नये. मला तुमची गरज नाहीं. तुमचा उपदेश मी ऐकणार नाहीं. इथें मी माझी मालकीण आहे. ”

गॅब्रिएल शांतपणें म्हणाला, “ हें बोलणं मूर्खपणाचं आहे. मी

इथून निघून गेलों तर इथल्या साऱ्या व्यवहारांत एवढा गोंधळ माजेल की त्यांतून मार्ग काढतां येणार नाहीं तुम्हांला. एखादा समजूतदार दिवाणजी वहिवाटदार तुम्ही नेमा, मग मी ताबडतोब निघून जाईन इथून असं वचन देतो मी तुम्हाला."

तरीहि बाथशीबा हट्टीपणानें म्हणाली, "मला कोणी दिवाणजी नको, माझे व्यवहार मीच पाहीन."

गॅब्रिएलनेंहि तितक्याच निश्चयानें उत्तर दिलें, "ठीक आहे! मग मीहि येथून जात नाहीं याबद्दल आभारच मानायला पाहिजेत तुम्ही माझे. एखादे वेळीं मलाहि वाटतं इथून निघून जावं पण इथल्या साऱ्या व्यवहाराचा सत्यानाश व्हावा हें मला रुचत नसल्यानंच मी इथं राहिलों आहे."

बाथशीबाचा स्वर जरा उतरला. ती पुटपुटली, "रहायचं असेल तर रहा" आणि मग आवाज चढवून म्हणाली, "सध्यां तरी इथून जाल कां! मालकीण म्हणून हुकूम करीत नाही मीं – एक स्त्री म्हणून विचारतें तुम्हाला."

गॅब्रिएल मृदु स्वरांत म्हणाला, "अवश्य!"

तो स्वस्थ उभा राहिला—आणि बाथशीबा पुढें निघून गेली. ती बरीच पुढे गेल्यावर एक मानवी आकृति जणूं काय जमिनींतून निघून तिच्याशेजारीं उभी राहिली. तो सार्जंट ट्रॉय होता. त्याचे बोलणें ऐकण्याची ओकला बिलकुल इच्छा नव्हती. त्या प्रेमी युगुलाकडे पाठ फिरवून तो परत निघाला.



# ३०. " प्रीतिची तऱ्हाच उलटी असे "



या नंतर अर्ध्या तासानें बाथशीबा आपल्या घरीं परतली. तिच्या चेहऱ्यावर रक्तिमा पसरली होती. ट्रॉय तिला तिच्या दारापर्यन्त पोहोंचविण्यास आला होता आणि त्याचे निरोपाचे शब्द अद्याप तिच्या कानांत घुमत होते. दोन दिवस कांहीं मित्रांना भेटण्यासाठीं तो बाथ या शहरीं जाणार होता.

ट्रॉय निघून गेल्यावर अस्वस्थ आणि भावनाकुल स्थितींत बाथशीबा एका खुर्चीवर बसून राहिली. काही वेळानें निश्चयाने उठून तिनें आपली लिहिण्याची पेटी पुढें घेतली आणि तीन मिनिटांत बोल्डवुडच्या पत्यावर एक पत्र खरडलें. मृदु परंतु निश्चित शब्दांत तिनें 'तुमच्याशीं मला लग्न करतां येणार नाहीं ' हा निश्चय नमूद केला होता. स्वयंपाकघरांतील एखाद्या मोलकरणीच्या हातांत तें पत्र द्यावें या उद्देशानें ती निघाली असतां आंतील नोकरांच्या बोलण्याचे शब्द तिच्या कानीं आले. बाथशीबा आणि ट्रॉय यांच्याविषयींच हा संवाद चालला होता. "

—" त्यानं तिच्याशीं लग्न केलं तर ती शेती करणं सोडून देणार ! "

" ते रहातील मोठ्या झोकांत, पण माझं ऐकून ठेव, कांहीं तरी भानगडी खास उपस्थित होणार.

दार उघडून बाथशीबा आंत शिरत म्हणाली, " कोणाबद्दल बोलत होतां ग तुम्ही ? " साऱ्या गप्प झाल्या.

थोड्या वेळानें लिडी स्पष्टपणें म्हणाली, " आम्ही तुमच्या-बद्दलच बोलत होतों बाईसाहेब ! "

यानंतर प्रथम बाथशीबानें खूप आव आणून ट्रॉयशीं लग्न करण्याचा आपला बिलकुल विचार नाहीं असें त्यांना सांगितलें; परंतु या आधारावर त्या बायांनीं ट्रॉयच्या एकंदर वागणुकीवर टीका करण्यास सुरवात केल्यावर तिला रहावेना. तो तसा वाईट माणूस नाहीं हें ती तावातावानें सांगूं लागली. आपण लिहिलेलें पत्र त्यांच्या अंगावर टाकून, लिडीला बरोबर घेऊन ती आतील खोलींत आली. तेथें आपलें मन मोकळें करून ती म्हणाली, " लिडी ! अशी कशी ग बावळट तूं ? एवढंहि कोडं उलगडत नाहीं का तुला ? तूं स्वतः एक स्त्रीच आहेस ना ? होय ! मीं प्रेम करतें ट्रॉयवर—प्रेमानं मी अगदीं वेडी झालेय् म्हणेनास. अशी घाबरूं नकोस. जवळ ये अशी. कुणाला तरी हें मला सांगायलाच पाहिजे. " यानंतर अस्वस्थ मनःस्थितींतच तिनें लिडीला बाहेर जायला सांगितलें; पण ती जाऊं लागतांच तिला पुनः परत बोलावलें. ती म्हणाली, " इकडे ये लिडी ! शपथेवर सांग मला कीं ट्रॉय हा बेछूट माणूस नाहीं आणि लोक त्याच्याबद्दल बोलतात तें सारं खोटं आहे. "

लिडी गोंधळून म्हणाली, " पण बाईसाहेब तो तसा नाहीं हें कसं म्हणूं मी ? कारण......... "

त्यावर बाथशीबा एकदम उसळली, " लोक काय म्हणतात त्याची माझ्यासमोर उजळणी करण्याइतकी कठोर तूं कशी झालीस ? पण बघतेंच मी आतां तू अन् गावांतले इतर लोक पुनः त्याच्याबद्दल कसं बोलतात तें ! "

बिचाऱ्या लिडीची अवस्था कठीण झाली होती. ट्रॉय हा बेछूट माणूस आहे असं म्हटलं तर बाथशीबाला राग येई. बरं तो तसा नाहीं म्हटलं तर त्या बोलण्यावर तिचा विश्वास बसत नसे. मध्येंच तर बाथशीबा इतकी संतापली कीं तिनें लिडीला नोकरीवरून काढून टाकण्याची धमकी दिली; आणि या प्रकाराला कंटाळून लिडीनेंहि काम सोडून जाण्याची तयारी दर्शविली. त्यावर मात्र बाथशीबा अगदीं विरघळून अश्रू ढाळूं लागली आणि आपल्याला

सोडून न जाण्याबद्दल विनवणी करूं लागली.. कांहीं करून ट्रॉय हा वाईट माणूस नाहीं असें एकदांचें लिडीनें म्हणावें, तें आपण स्वतःहि खरें म्हणून स्वीकारावें यासाठीं तिची सारी धडपड चालली होती. जें साऱ्यांना स्पष्ट दिसत होतें तें नाहींच अशी आपल्या मनाची समजूत करून घेण्याचा तिचा हा सारा खटाटोप चालला होता.



## ३१. "स्त्रीभिः कस्य न खण्डितं भुवि मनः।"



लिडीशीं दिलजमाई झाल्यावर बाथशीबानें तिला तिच्या बहिणीच्या गांवीं जाण्यासाठीं एक आठवड्याची रजा दिली. बोल्डवुडला आपलें पत्र मिळाल्यावर न जाणो तो स्वतःच उत्तर देण्यासांठी परत येईल म्हणून ती स्वतःहि लिडीच्या मागोमाग निघाली. लिडी जवळच्याच गांवी गेली होती.

संध्याकाळ झाली होती. बाथशीबा सुमारें दोन मैल चालून गेली नसेल तोंच ज्याला ती टाळू पहात होती तेंच तिच्या समोर वाढून आलें. बोल्डवुडच तिच्या समोरून येतांना दिसला!

—तो म्हणाला, "माझं प्रेम किती प्रबळ आहे. तें तुला माहीत आहे. घाईनं एखादं पत्र खरडून टाकल्यानं त्यावर कांहीं परिणाम होणार नाहीं."

बाथशीबा हलक्या आवाजांत म्हणाली, "माझ्याबद्दल तुम्हाला इतकं वाटत नसतं तर फार बरं झालं असतं. माझी तितकी लायकी नाहीं. पण कांहीं असलं तरी आतां या गोष्टी मी ऐकूं नयेत हेंच बरं.

ब्रोल्डवुड तिच्याजवळ जाऊन म्हणाला, " बाथशीबा - लाडके ! हा नकार कायमचाच कां ? "

—" होय ! तसाच ! "

ब्रोल्डवुड भावनातिरेकानें उद्गारला, " बाथशीबा ! दया कर माझ्यावर. एखाद्या स्त्रीजवळ दयेची भीक मागण्याइतक्या खालच्या दर्जाला येऊन पोंचलों आहे मी ! आणि ती स्त्री तूंच आहेस. "

बाथशीबा म्हणाली, " मी तुमचा अव्हेर केलेला नाहीं आणि तो मी कसा करणार ? मी तुमचा कधीं स्वीकारच केला नव्हता. "

—यावर तिनें पूर्वी दाखविलेल्या आत्मीयतेची आणि दिलेल्या उत्तेजनाची आठवण ब्रोल्डवुडनें तिला करून दिल्यावर ती उत्तरली, "ज्याला तुम्ही ' उत्तेजन उत्तेजन ' म्हणतां तो केवळ रिकामपणचा पोरखेळ होता. त्याबद्दल मला मनापासून पश्चात्ताप झाला आहे, मी आसवंहि ढाळलीं आहेत. तरीहि अजून तुम्ही मला त्याच प्रकाराची आठवण करून देणार कां ? " परन्तु ब्रोल्डवुडची समजूत कांहीं केल्या पटणें शक्य नव्हतें. तो भावनेच्या भरांत बोलतच होता, " आठवण कर बाथशीबा ! मेंढ्या धुण्याच्या दिवशीं, आपण कुरणांतून फिरत पुढें गेलों. तिथं किती प्रेमानं बोललीस तूं माझ्याशीं ! तसाच तो मेजवानीचा प्रसंग ! तुझ्या घरांतली ती गोड संध्याकाळ ! तुझे सारे प्रेमळ शब्द गेले तरी कुठें ? माझ्यावर प्रेम करण्याबद्दलची तुझी ती मनापासूनची आशा ? माझ्याबद्दल हृदयापासून आस्था वाटूं लागेल अशी तुझी निश्चित समजूत ?...सारं सारं विसरलीस कां हें ? "

बाथशीबानें आपल्या भावना आवरल्या. ती बोल्डवुडकडे शांतपणें पाहून हलक्या परन्तु निश्चयी स्वरांत म्हणाली, " हें पहा ब्रोल्डवुड, मी तुम्हांला कोणतांहि वचन दिलं नव्हतं. "

तरी ब्रोल्डवुड चिकाटीनें म्हणत होताच, " मला दिलेला नकार केवळ गंमत म्हणून होता असं सांग एकदां ! "

मग बाथशीबा या प्रकरणाचा सोक्षमोक्ष करण्यासाठीं म्हणाली, " असं म्हणणं अगदीं असत्य होईल, आणि त्यामुळें आपल्या दोघांनाहि दुःख होईल. तुम्हांला वाटतो तितका माझा स्वभाव भावनाशील नाहीं. प्रेम करण्याच्या माझ्या कुवतीबद्दल देखील तुमचा अदाज फार चुकलेला आहे. लहानपणापासून या भावनाशून्य जगांत मला कुणाचा आसरा नव्हता. त्यामुळं सारी मृदुताच माझ्या अंगांतून निघून गेली आहे. "

यावर बोल्डवुड कडवटपणें म्हणाला, " तसं नाहीं. तुझ्या हृदयांत भावना नाहींत म्हणून तुला माझ्याबद्दल प्रेम वाटत नाहीं हें खरं नाहीं. तुझ्या हृदयात खूप प्रेम आहे पण त्याचा ओघ दुसरीकडे वळला आहे. तो कोठें तेंहि मला माहित आहे. ट्रॉयनें या माझ्या प्रेमनिधानाला कां बरें हात घातला ? मी त्याचें कांहींहि वाईट केलें नसतां त्यानें कां म्हणून मुद्दाम तुझ्या डोळ्यासमोर यावें? त्याच्याकडे लक्ष जाण्यापूर्वी तुझं माझ्याबद्दल अनुकूल मत होतं. तो आला नसता तर तूं मला होकार दिला असतास. खोटें आहे का हें ? सांग ! "

बाथशीबाला उत्तर द्यावें लागलेंच, " मला नाहीं म्हणतां येत नाहीं. "

बोल्डवुड अधिकच भावनाकुल होऊन म्हणाला, " बाथशीबा ! केवळ ट्रॉयच्या लाल पोषाखावर आणि पितळी बिल्ल्यांवर तूं भाळलीस. हा नुसता बायकी मूर्खपणा झाला. "

यावर बाथशीबाहि चिडून म्हणाली, " तुमची पायरी सोडून बोलतां आहांत तुम्ही. सारे सारेच माझ्यावर टीका करीत आहेत. माझी बाजू घेऊन भांडेल असं जगांत कोणी नाहीं. कोणी दया करीत नाहीं माझ्यावर. तुमच्यासारखे हजार लोक माझ्यावर टीका करूं लागले, आणि हिणवूं लागले तरी हार खाणार नाहीं मी. "

बोल्डवुड आतां भावनेच्या उद्रेकानें नुसता लाल झाला होता.

गंभीर आवाजांत त्यानें गर्जना केली, ' ट्रॉयनें तुझं चुंबन घेतलंय्! आपली म्हणून तुझ्यावर त्यानें हक्क सांगितलाय्! सांग हें खोटं आहे म्हणून ! ”

—बाथशीबाहि भावनाकुल झाली असली तरी बोल्डवुडचा हा अवतार पाहून ती भऊ आली. तिला थरकांप सुटला. ती धांपा टाकीत म्हणाली, “ आतां मी तुमची कोणी नव्हे. जाऊं द्या मला! सोडा मला ! ”

बोल्डवुड गर्जत होताच, “ सांग त्यानें चुंबन घेतलं नाहीं म्हणून ! ”

मनांत भीति वाटत असूनहि ती त्याच्या बोलण्याला तोंड देत म्हणाली, “ सांगतें घेतलंय् म्हणून ! खरं सांगायला लाज नाहीं वाटत मला ! ”

बोल्डवुडचा रागानें आणि निराशेनें नुसता तिळपापड झाला. ट्रॉयला शिव्याशाप देत तो म्हणाला, “ तुझ्या हातचा नुसता स्पर्श घडावा म्हणून मी साऱ्या जगाची किंमत दिली असती—आणि तूं! ट्रॉयसारख्या एखाद्या बदफैली मनुष्याला अगदीं सहजपणें तुझं चुंबन घेऊं दिलंस ! त्याच्या आयुष्यांत त्याला याचा एकदां तरी पश्चात्ताप होईल. आज मला ज्या यातना होताहेत, मी जसा तडफडून शिव्याशाप देतों आहे तशीच त्याची स्थिति होईल. मी त्याला शिक्षा करीन. तो शिपाई असो कीं कोणी असो. त्या पोराला चाबकानें चांगला झोडपूनच काढतों मीं. त्याच्या अंगीं शंभर माणसांचं बळ असलं तरी मी त्याला फोडून काढीन. देव करो आणि माझ्या नजरेसमोर तो न येवो. नाहींतर माझ्या हातून काय होईल त्याचा भरंवसा नाहीं. बाथशीबा ! दूर ठेव त्याला माझ्यापासून. ”

हे शब्द बोलून घोल्डवुड निघून गेला. बाथशीबाची खात्री झाली कीं या वेळीं ट्रॉय आणि बोल्डवुड यांची जर भेट झाली तर त्यांचें भयंकर भांडण जुंपणार. ट्रॉयला यामुळें अपाय होईल या नुसत्या कल्पनेनेंच तिला मोठी काळजी वाटूं लागली. या विचारामुळें लिडीच्या गांवीं जाण्या-

ऐवजीं ती तेथेंच अस्वस्थ होऊन येरझारा घालूं लागली, हातांनीं तोंड झांकून घेऊन ती हुंदके देऊं लागली. किती तरी वेळ तेथेंच एका दगडांच्या राशीवर ती बसून राहिली होती.

संध्याकाळ झाली. आकाशांत तारे चमकूं लागले. परंतु बाथशीबाचें मन कुठें तरी दूर दूर ट्रॉयच्या संगतींत गुंतलें होतें.

## ३२. " पाठलाग हा उगाच बाई ! "



त्रीं अकराचे ठोके पडले.

वेदरबरीच्या खेड्यांत निस्तब्ध शांतता पसरली होती. बाथशीबाच्या जुनाट वाड्यांत तिची मोलकरीण मेरी ॲन ही अकटीच वस्तीला होती. अकराचे ठोके पडल्यावर कांहींतरी अस्वस्थता वाटूं लागून मेरीॲन जागी झाली. कांहींतरी विशेष घडलें आहे असें तिला राहून राहून वाटूं लागलें. अंथरुणावरून उठून तिनें खिडकींतून बाहेर पाहिलें. वाड्याच्या कोंपऱ्याशीं असलेल्या तबेल्याजवळ एक अस्पष्ट आकृति फिरत होती. ती घोड्याजवळ आली. तिनें तो घोडा पलीकडे नेऊन गाडीला जुंपला आणि लगेच घोडा भरधांव गेल्याचा आणि चाकांचा आवाज मेरीॲनच्या कानांवर आला. इतक्या हलक्या चोरपावलांनीं फक्त एखादी स्त्री किंवा भटक्या टोळींतील मनुष्य या दोनच व्यक्ती येऊं शकल्या असत्या. एखादीं स्त्री हें काम करू शकेल हें शक्य नसल्यानें एखाद्या भुरट्या चोराचें हें काम असावें अशी मेरी ॲनची खात्री झाली. ती व्यक्ति समोर असेपर्यंत तिला भीतीमुळें ओरडतांहि येईना. तो निघून गेल्यावर तिची भीति गेली आणि तिनें बाहेर जाऊन आरडा-ओरड केली. कोगन आणि गॅब्रिएल हे

आल्यावर त्यांनाहि दुडक्या चालीनें धांवणाऱ्या घोड्याच्या टापांचा आवाज ऐकूं आला. डेन्टी नांवाच्या बाथशीबाच्या घोडीच्या या टापा हें त्यांनीं ओळखलें. चोरट्यांनीं पळविलेल्या गाडीचा पाठलाग करण्यासाठीं त्यांना घोडे हवे होते. शेजारींच बोल्डवुडचा तबेला होता. बोल्डवुड घरीं नसला तरी तेथील दोन घोडे या कामासाठीं त्यांनीं बाहेर काढले आणि त्यांच्यावर खोगीर न घालतांच त्यांनीं ते भरधांव सोडून पळविलेल्या गाडीचा पाठलाग करण्यास सुरवात केली.

ती रात्र अंधारी होती. तरी एकदां रस्त्याला लागल्यावर चाकांच्या आणि घोड्याच्या टापांच्या खुणांवरून त्यांना गाडीचा पाठलाग करतां आला. मधून मधून काड्या ओढून ते घोडीच्या खुरांचा माग पहात. एका जागीं अशा खुणा पहात असतां घोडीचा पुढचा पाय लंगडा झाल्यामुळें एक खूर नीट उठत नाहीं असें त्यांना दिसून आलें. त्यामुळें आतां चोरट्यांनीं पळविलेली ती गाडी लौकरच आपल्या नजरेच्या टप्प्यांत येईल असा त्यांना हुरूप वाटूं लागला. त्या रस्त्यावर एक टोल नाकें असून तेथील फाटक बंद असे. तेथें ती गाडी आपल्याला सांपडणार अशी त्यांना खात्री वाटूं लागली. कांहीं वेळानें त्या फाटकाचे पांच पांढरे गज त्यांना दिसूं लागले. फाटक बंद होतें आणि त्याजवळच एक गाडी उभी होती. गॅब्रिएल दुरूनच ओरडला, “ फाटक बंद करा ! या माणसानें घोडा चोरून आणला आहे. ”

जवळ जाऊन गॅब्रिएलनें गाडी हांकणाऱ्याकडे पाहिलें तों ती गाडी हांकणारी व्यक्ति आपली मालकीण बाथशीबा हीच ती आहे असें त्याला दिसलें! गॅब्रिएल व कोगन यांना पाहून तिलाहि आश्चर्य वाटलें; परन्तु तें झांकून वरकरणीं अगदीं सहाजिकपणा दाखवीत ती म्हणाली, “ काय गॅब्रिएल ! कुठें निघालांत तुम्ही? बाथ शहरीं एक महत्त्वाचें काम निघाल्यानें लिडीकडे जाण्याचा बेत सोडून मला बाथकडे निघावं लागलं. असा कां पाठलाग करीत होतां तुम्ही ? ”

—" आम्हांला वाटलं कीं घोडी चोरून नेली कोणी."

"मी ही घोडी आणि गाडी नेली असावी हेंहि तुमच्या लक्षांत आलं नाहीं! किती मूर्खपणा हा तुमचा? मेरी ॲनच्या खिडकीशीं मी दहा मिनिटें ठोठावलें पण ती उठेना. तबेल्याची किल्ली मला मिळाल्यानें मी तिला त्रास दिला नाहीं. मी गाडी नेली असेल असं कसं लक्षांत आलं नाहीं तुमच्या? बायका घर सोडून पाऊलभर जरी कुठें गेल्या कीं चोर म्हणून पाठलाग केलाच तुम्ही! काय प्रकार आहे हा?"

कोगन कुरकुरत म्हणाला, "पण तुम्ही कुठं जाणार याची माहिती दिली नसल्यानं आम्हाला कसं कळावं? आणि बायका अशा अपरात्रीं एकट्या नाहीं नेत गाडी पळवून!"

बाथशीबा प्रथम या प्रकारानें चिडून गेली असली तरी आपल्या नोकरांच्या कर्तव्यदक्षतेबद्दल त्यांना दोष देण्यांत कांहीं हंशील नाहीं हें कळण्याइतकी अक्कल तिला होती. शेवटीं ती म्हणाली, "तुम्ही एवढा त्रास घेतलांत त्याबद्दल मी आभारी आहे तुमची! पहांटेच्या सुमाराला मी बाथ शहरीं जाऊन पोहोंचेन. आतां मेहेरबानी करून परत जाल कां तुम्ही? आणि तिनें फाटकांतून आपली गाडी बाहेर काढली.

कोगन आणि गॅब्रिएल आल्या वाटेनें अंधारांतून परत निघाले. बाथशीबाच्या या चमत्कारीक वागण्याचें कोगनला बरेंच कुतूहल वाटत होतें. पण गॅब्रिएलनें त्याला एवढेंच बजावलें.—" आज रात्रीं झालेला प्रकार आपण गुलदस्तांतच ठेवायचा."

—त्याचें असें झालें.

बाथशीबा कितीतरी वेळ रस्त्यावरच बसून राहिली होती. तिच्यापुढें दोनच मार्ग होते. एक म्हणजे ओकच्या आणि बोल्डवुडच्या सांगण्याप्रमाणें ट्रॉयचा नाद सोडून द्यावयाचा आणि दुसरा म्हणजे बोल्डवुडचा क्रोध शांत होईपर्यन्त ट्रॉयला वेदरबरीपासून दूर ठेवावयाचें.

मध्येंच ती एकदम उठून उभी राहिली. आपण आतांच्या आतां जाऊन ट्रॉयची गांठ घ्यावी आणि या पेंचप्रसंगांत मदत करण्याची त्याला विनंति करावी असा तिनें निश्चय केला. वेदरबरींतील सारे लोक झोंपी गेल्यावर ती हळूंच आपल्या घराशीं आली. रातोरात बाथ शहर गांठून, सार्जेट ट्रॉय वेदरबरीला येण्याला निघण्याच्या आंत त्याची गांठ घ्यावी असा तिचा बेत होता. त्याला भेटून आपला नाद सोडून देण्याची विनंती करावी असाहि बाथशीबाचा मनसुबा होता. हें काम आटोपून दुसऱ्या दिवशीं लिडीच्या खेड्यांत जावें आणि त्यानंतर वेदरबरीला परत यावें; यामुळें आपण बाथला जाऊन आलों हें कोणालाही कळणार नाहीं अशी तिची कल्पना होती. अशी योजना मनाशीं आंखून बाथशीबा त्या कामाला लागली होती. या बाबतींत त्यानंतर काय घडामोडी झाल्या त्या आपण पाहिल्या आहेतच—

## ३३. " जा घेउनि संदेश !"



क आठवडा उलटून गेला तरी बाथशीबाबद्दल कोणतीहि बातमी आली नाहीं आणि तिच्या या अचानक प्रवासाचा खुलासाहि झाला नाहीं. त्यानंतर मेरीॲनकडे एक चिठ्ठी आली. त्यांत तिच्या मालकिणीनें एवढेंच लिहिलें होतें कीं, " मी बाथ येथें ज्या कामासाठीं आलें आहे, तें काम अद्याप पुरें झालें नसून आठवड्यानंतर मी परत येईन. "

अशांतच आणखी एक आवठडा उलटून गेला. ओट धान्याची कापणी सुरू झाली. ऑगस्टचा ऐन उन्हाळा होता, भर दुपारीं सारे कामकरी

शेतांत राबत होते. जिकडे तिकडे विळयाला धार लावण्याचे आणि ओटच्या लोंब्या जमिनीवर कोसळत असल्याचे आवाज घुमत होते. सगळी हवा गरम आणि कोरडी होती. एका दुपारीं शेतांतले गडी थोडा वेळ बांधावरील एका झाडाच्या सांवलींत विसावा घेण्यासाठीं निघाले असतां कोगनला एक मुलगा शतांतून धांवत त्यांच्याकडे येतांना दिसला.

गॅब्रिएल उद्गारला " अरे हा तर केन बॉल ! "

मॅथ्यू मून म्हणाला, " या पोराच्या बोटाला एक गळूं झालं होतं. त्याला काम करतां येईना तर गेला होता सुटीवर. "

केन बॉल या लोकांकडे येत असता खात खातच येत होता. तो म्हणाला—मी बाथ शहरीं गेलों होतों. तिथें मला आपल्या मालकीणबाई दिसल्या. त्या एका शिपायाबरोबर हातांत हात घालून चालत होत्या. "

येथें त्या पोराचा खोकला अनिवार होऊन त्याला पुढें बोलता येईना आणि त्याच्या श्रोत्यांची उत्सुकता तर अगदीं शिगेला जाऊन पोहोंचली होती. कोणी त्याच्या पाठीवर थापट्या मारल्या. कोणी त्याला रस पाजला आणि कसें तरी त्याला बोलायला लावलें.

गॅब्रिएलनें उतावीळपणें विचारलें, " काय दिसलं तुला ? "

केन बॉल सांगूं लागला, " मालकीणबाई त्या शिपायाबरोबर एका बागेंत गेल्या. तो शिपाई सार्जंट ट्रॉय होता असं मला वाटतं. बागेंत ते दोघे अर्धा तास बोलत होते. एकदां मालकीणबाई ओक्साबोक्सी रडूं लागल्या. त्या बाहेर आल्या तेव्हा त्यांचा चेहरा अगदीं फटफटीत पडला होता. "

गॅब्रिएलचा चेहरा ओढल्यासारखा दिसत होता. तो म्हणाला, " त्यांचा चेहरा फटफटीत दिसला तुला ! त्या बाथशीबाबाई होत्या याबद्दल खात्री आहे तुझी ? केन ! आणखी काय पाहिलंस तूं ? "

केन म्हणाला, " होय त्या मालकीणबाईच होत्या " आणि मग

ब्राथ शहरांतील दुकानें, तेथील गरम पाण्याचे झरे वगैरेचें वर्णन तो करूं लागला. परन्तु त्याबद्दल गॅब्रिएलला कांहीं उत्सुकता नव्हती. तो पुनः पुनः बाथशीबा आणि तो शिपाई यांबद्दलच खोदून खोदून प्रश्न विचारीत होता. केन बॉल तिच्याविषयीं कांहींच न बोलतां बाथमधील उपाहारगृहें, मोठमोठे वाडे, देवळें, तेथील धर्मगुरु यांबद्दलच बोलूं लागला. आणि अखेर तो म्हणाला, " यानंतर एव्हरडीनबाई मला दिसल्या नाहींत. " यामुळें ओकची निराशा झाली आणि तो म्हणाला, " मग आधींच कां सांगितलं नाहींस तसं ? "

मॅथ्यू मून म्हणाला, " या इसमाशीं तिचं फार संघट्टन वाढलं तर पस्तावा करायची वेळ येईल तिला. "

ओक रागानें म्हणाला, " वाजवीपेक्षां कांहीं जास्त संघट्टन नाहीं त्याचं " पुन्हां त्यानें केन बॉलला विचारलें, " तूं पाहिलेली बाई बाथशीबाच होती असं शपथेवर सांगू शकशील तूं ? "

केन रडवा होऊन म्हणाला, " हें खरं आहे असं सांगेन, पण अगदीं देवाशपथ कसं सांगूं मी? " आणि तो रडूं लागला.

यानंतर साऱ्यांनीं आपले विळे सरसावले आणि पुनः कापणी सुरू झाली. गॅब्रिएलची मनःस्थिति काय असावी याचा अंदाज कोगनला बरोबर आला होता. एका कोपऱ्यांत ते एकत्र आल्यावर तो म्हणाला, " गॅब्रिएल ! जाऊं दे. तिच्याबद्दल मनाला लावून घेऊं नकोस एवढं ! ती तुझी होऊं शकत नाहीं हें ठरल्यावर मग ती कोणाची कां होईना ? तुझ्या दृष्टीनं काय फरक पडायचाय त्यांत ? "

गॅब्रिएल म्हणाला, " माझ्या मनाला मी हेंच सांगत असतों. "



## ३४. " हंसत हंसत फसवुनि......."



च दिवशीं संध्याकाळीं घरीं जाण्यापूर्वी गॅब्रिएल कोगनच्या बागेच्या फाटकाशीं ओणवून उभा होता. शेजारच्या गल्लींतून एक गाडी हळूं हळूं चालली होती आणि तिच्यांतून दोन स्त्रियांच्या बोलण्याचा आवाज येत होता. बाथशीबा आणि लिडी यांचेच हे आवाज असें गॅब्रिएलनें ओळखलें. त्याच्या समोरून ती गाडी निघून गेली. बाथशीबा आणि तिची घोडी दोघेहि दमून गेल्यासारखे दिसत होते. बाथशीबा हातींपायीं सुखरूपपणें परत आली यामुळेंच गॅब्रिएलला इतकें समाधान वाटलें कीं, बाकीच्या साऱ्या विचारांचा, अफवांचा त्याला विसरच पडला. अर्ध्या तासानंतर तो घरीं निघाला असतां वाटेंत बोल्डवुडशीं त्याची गांठ पडली.

बोल्डवुडनें बाथशीबाच्या वाड्याशीं जाऊन दार ठोठावलें. मागील भेटींत आपण फार तीव्रपणें वागलों-बोललों याबद्दल बाथशीबाची माफी मागण्यासाठीं तो तिच्या घरीं आला होता. बाथशीबा लिडीच्या खेड्यावर जाऊन आली एवढेंच त्याला कळलें होतें. बाथच्या प्रवासाची त्याला गंधवार्ताहि नव्हती. लिडीची वागणूक चमत्कारिक दिसली; पण बोल्डवुडनें तिच्याकडे लक्ष दिलें नाहीं. थोड्या वेळानें बाहेर येऊन लिडीनें बोल्डवुडला निरोप सांगितला ... " बाईसाहेब तुमची भेट घेऊं शकत नाहींत " बोल्डवुड लगेच फाटकांतून परत फिरला. एकूण बाथशीबानें त्याला क्षमा केली नव्हती तर !

बोल्डवुड रेंगाळत घराकडे निघाला असतां रात्रीं दहाच्या सुमाराला माल आणणारी गाडी खेड्यांत आलेली त्याला दिसली. गाडीच्या दिव्याच्या उजेडांत एक लाल डगलेवाला मनुष्य खालीं उतरतांना बोल्डवुडला

दिसला. तो स्वतःशीं म्हणाला, "तिला पुनः भेटायला हा ट्रॉय आला वाटतं." ट्रॉय गाडीवाल्याच्या घरांत पूर्वी रहात असे तिथेंच पुनः गेला. बोल्डवुडनें, एकाएकीं मनाशीं कांहीं निश्चय केला. घाईघाईनें घरीं जाऊन तो दहा मिनिटांत परत फिरला. गाडीवाल्याच्या घरांत जाऊन ट्रॉयची भेट घेण्याचा त्याचा विचार दिसला. तो दाराशीं जातो तोंच हातांत एक वळकटी घेऊन स्वतः ट्रॉय बाहेर पडला. नुकताच आलेला हा मनुष्य पुनः याच रात्रीं कुठें तरी बाहेर जात आहे असें दिसत होतें. बोल्डवुडनें पुढें जाऊन विचारलें. "सार्जेंट ट्रॉय ना तुम्ही?"

"होय! मी सार्जेंट ट्रॉय: आतांच मी बाथहून आलों."

"मी, विल्यम बोल्डवुड. मला थोडं बोलायचंय् तुमच्याशीं."

"कशाबद्दल?"

"समोरच्या वाड्यांत रहाते ती स्त्री आणि जिच्याशीं तुम्ही वाईट रीतिनें वागलांत ती स्त्री या दोघींबद्दल!"

"भलतेच उद्धट दिसतां हो तुम्ही!" म्हणून ट्रॉय पुढें झटकला. बोल्डवुडनें पुढें होऊन त्याचा रस्ता अडवला.

"कसेंहि असो, माझ्याशीं तुम्हांला बोललंच पाहिजे."

ट्रॉयनें बोल्डवुडच्या भरभक्कम देहयष्टीकडे आणि हातातील जाड दंडुक्याकडे पाहिलें. या माणसाशीं सभ्यपणें वागलेंलेंच बरें असा विचार करून, वळकटी खालीं तो ठेवून म्हणाला, "ठीक आहे! बोला."

बोल्डवुड म्हणाला, "ठीक आहे, तुमच्याबद्दल मला बरीच माहिती आहे आणि फॅनी रॉबिनच्या आणि तुमच्याबद्दलच्या प्रेमाचीहि मला माहिती आहे. तुम्ही लग्न करायला हवं तिच्याशीं."

ट्रॉय उत्तरला, "करायला हवं असं मलाहि वाटतं; पण तसं करतां येत नाहीं."

—"कां ?"

ट्रॉय घाईनें कांहींतरी बोलणार होता एवढ्यांत सांवरून घेऊन म्हणाला, "मी फार गरीब आहे."

एका झाडाच्या खोडावर बसून बोल्डवुड म्हणाला, "हें पहा मिस् एव्हरडीनशीं माझं लग्न जवळ जवळ ठरलं होतं. तुम्ही इथं आला नसतां तर तिनं माझा स्वीकार केला असता. एव्हरडीन आणि तुम्ही यांच्या दर्जांत फार फरक आहे. तुमच्या या प्रेमप्रकरणाची परिणति लग्नांत होईल आणि त्यामुळें तुमचा फायदा होईल अशी आशा नाहीं. तेव्हां यापुढें तिला त्रास न देतां तुम्हीं फॅनीशीं लग्न करा. यापुढं तुमचं दारिद्य दूर करण्याची हमी मी घेतों आणि फॅनीलाहि एक नेमणूक तोडून देतों. लग्नाच्या दिवशीं तिला पांचशें पौंड मिळतील."

सार्जंट ट्रॉय ही व्यवस्था स्वीकारल्यासारखें दाखवून म्हणाला, "मला फॅनीच फार आवडते. मिस् एव्हरडीनचा मला मोह पडल्यानें कांहीं काळ फॅनीचा विसर पडला होता. पण आतां तें सारं संपलं."

पन्नास पौंड असलेलें एक पुडकें बोल्डवुडनें सार्जंट ट्रॉयच्या हातांत दिलें.

तेवढ्यांत पलीकडून एका स्त्रीचा पदध्वनि ऐकूं आला. त्यावर सार्जंट ट्रॉय म्हणाला, "ही बाथशीबा आली. ! मला जाऊन भेटलं पाहिजे तिला."

बोल्डवुड दचकून म्हणाला, "बाथशीबा ! अशा अपरात्रीं आणि एकटी ! तुम्हाला कशाला भेट घ्यायची आहे तिची ?"

ट्रॉय उत्तरला, "त्या आज माझी वाट पहात होत्या. तुमच्या इच्छेप्रमाणं त्यांचा निरोप घेतला पाहिजे मला. आमचं बोलणं तुम्हाला ऐकूं येईलच. मी गेल्यावर त्याचा तुम्हांला चांगला उपयोग होईल."

बोल्डवुड शांतपणें म्हणाला, "तुमचें बोलणें कुचेष्टेचें वाटतें!"

ट्रॉय उत्तरला, " छे ! तसं नाहीं ! आतां बसा इथें. माझी वळकटी सांभाळा थोडा वेळ — आणि आमचं बोलणं ऐका."

तीं पावलें मधूनच थांबत थांबत, जवळ येत चाललीं. ट्रॉयनें उत्तरादाखल हळूंच शीळ घातली आणि तो पुढें सरसावला. बाथशीबाचा आवाज आला " फ्रॅंक तूंच आहेस कां तो ? किती उशीर झाला तुला ! गाडीच्या चाकांचा आवाज येऊन कितीतरी वेळ झाला. मला वाटल तू आलाच नाहीस."

ट्रॉय म्हणाला, " मी खात्रीनें येणार होतों. तुला तें माहीतच होतं नाहीं कां ?"

बाथशीबा खेळकरपणें म्हणाली, " फ्रॅंक सुदैवानें माझ्याशिवाय आज रात्रीं घरांत कोणीहि नाहीं. साऱ्यांची मी इथून रवानगी केली आहे. तूं रात्रीं घरीं येऊन गेलास हें कोणालाहि कळणार नाहीं."

ट्रॉय म्हणाला, " छान ! पण मी जाऊन माझी सामानाची पिशवी घेऊन दहा मिनिटांत तुझ्या घरीं येतों."

" ठीक आहे " म्हणून बाथशीबा मागें वळून चटकन् टेकडीवरून निघून गेली.

हें संभाषण ऐकत असतां बोल्डवुडचा चेहरा घामानें अगदी डबडबून गेला होता. त्याच्याकडे वळून ट्रॉयनें आपली वळकटी उचलली आणि तो कुचेष्टेच्या स्वरांत म्हणाला, " आतां जाऊन सागूं का तिला कीं ' आपल्याला नाहीं बुवा लग्न करतां येत तुझ्याशीं ? ' आतां पेंचप्रसंगाची खरी कल्पना आली असेल तुम्हाला. हवं तर मला वाईट माणूस म्हणा तुम्ही. भावनेच्या भरांत करूं नये तें करून बसलों असेन मी. पण कांहीं झालं तरी मला त्या दोघींशीं लग्न करतां येणार नाहीं हें उघड आहे. तरी दोघींतुन मी फॅनीचीच निवड करीन."

त्या क्षणीं बोल्डवुडनें ट्रॉयवर एकदम झडप घालून त्याचा गळाच धरला. त्याचा पंजा हळूं हळू ट्रॉयच्या गळ्याभोवतीं आवळत चालला ट्रॉयला हा प्रकार अगदीं अनपेक्षित होता. तो धांपा टाकीत म्हणाला, “ थांबा ! थांबा ! या प्रकारानं जिच्यावर तुमचं प्रेम आहे तिचीच हानी करीत आहांत तुम्ही. ”

बोल्डवुडनें विचारलें, “ याचा काय अर्थ ? ” आणि त्यानें आपला पंजा जरा ढिला केला. तो म्हणाला, देवाशपथ ! तुला ठार मारावं असं मला वाटतं ! ”

— “ आणि तसं केल्यानं तिचाच नाश होईल ! मी तिच्याशीं लग्न केलं नाहीं तर आतां तिला दुसरा तरणोपाय नाहीं. तिचा आणि माझा संबंध काय आहे हें एकदां तुम्हाला स्पष्टपणें कळून आलं आहेच. या परिस्थितींत मला ठार करणं म्हणजे घोडचूकच होईल नव्हे कां ? ”

— बोल्डवुडची मान खालीं लवली. तो निर्जीवपणें म्हणाला, “ तुला ठार करणं चुकीचं होईल खरं, ” आणि मग तो ट्रॉयला म्हणाला, “ मघां मी सांगितलं तसं कांहीं करूं नको. बाथशीबाशींच लग्न कर तूं. मी तिचा त्याग करतों. तिचं खरंच तुझ्यावर प्रेम असलं पाहिजे; बिचारी अगदी फसली ! ”

ट्रॉय म्हणाला, “ लष्करच्या नोकरींतून मी लौकरच मोकळा होणार आहे आणि मग...... ”

बोल्डवुड उतावीळपणें म्हणाला. “ शक्य तितक्या लवकर तुम्ही दोघांनीं लग्न करणं हेंच योग्य. फॅनीऐवजीं मी बाथशीबाच्याच नांवानें पाचशें पौंड काढून ठेवतों. ती हे पैसे माझ्याकडून घेणार नाहीं. लग्नाच्या दिवशीं ते मी तुलाच देईन. ”

बोल्डवुडची मोहवशता अशा थराला गेलेली पाहून ट्रॉयलाहि आश्चर्य वाटलें. एवढ्यावरच न थांबतां बोल्डवुडनें त्याला विसारादाखल

एकवीस पौंड तेथल्या तेथें काढून दिले आणि आपल्या घरीं येऊन वरील व्यवस्था मान्य असल्याबद्दल करारावर सही करून जाण्यास सांगितलें.

बाथशीबाचा सल्ला घेण्यासाठीं म्हणून ट्रॉय तिच्या घरांत गेला आणि दाराची कडी लावून फटींतून त्यानें एक घडी केलेलें वर्तमानपत्र बोल्डवुडकडे सरकावलें.

"हें जरा वाचाल कां? मी मेणबत्ती दाखवतों," ट्रॉय म्हणाला.

खालील मजकूर बोल्डवुडच्या नजरेस आला.

## विवाहविधि

**बाथ येथें सेंट ॲम्ब्रोझ चर्चमध्यें तारीख १७ रोजीं रेव्हरंड जी मिनासिंग यांनीं पुढील लग्नाचें पौरोहित्य केलें.**

**वर—फ्रँन्सिस ट्रॉय, कै. डॉ. एडवर्ड ट्रॉय यांचे चिरंजीव, अकराव्या घोडदळांतील सार्जंट.**

**वधू—बाथशीबा, कै. जॉन एव्हरडीन—(कॅस्टरब्रिज) यांची एकुलती एक कन्या**

बोल्डवुडनें हे शब्द वाचल्यावर ट्रॉयनें एक छद्मी हास्य केलें. तो म्हणाला, "फॅनीशीं लग्न करण्यासाठीं पन्नास पौंड, छान! मग फॅनीशीं लग्न न करतां बाथशीबाशीं लग्न करण्यासाठीं एकवीस पौंड! हेंहि छान! आणि अखेरीस मी निघालों बाथशीबाचा लग्नाचा नवरा!

हें पहा बोल्डवुडसाहेब! नवराबायकोच्या दरम्यान जो लुडबुड करतो त्याची अशीच फटफजिती होत असते!

फॅनी मला केव्हांच सोडून गेली आहे. मी सगळीकडे शोध केला, पण तिचा ठावठिकाणा लागला नाहीं. मी तुम्हाला चांगला धडा शिकवला आहे. आतां हे ध्या तुमचे पैसे परत."

बोल्डवुडनें दिलेल्या नोटांत सोन्याची नाणीं गुंडाळून ट्रॉयनें ते पुडकें रस्त्यावर फेकून दिलें.

बोल्डवुड आपली मूठ उगारून ओरडला, "कुतरड्या! याद राख! चागला लंबे करीन मी तुला?"

आतून एक हास्याचा आवाज आला आणि ट्रॉयनें दार लावून आतून कुलूप घातलें.

नरकांत तळमळणाऱ्या एखाद्या दुःखी आत्म्याप्रमाणें रात्रभर बोल्डवुड वेदरबरीच्या डोंगरपठारावर फिरत होता.

---

## ३५. एखाद्याचें नशीब!



दुसऱ्या दिवशीं पहांटेचे पांच वाजण्याचा सुमार होता. नुकताच सूर्योदय होत होता. जमिनीवर सर्वत्र दंव पडलें होतें. सारें वातावरण पक्ष्यांच्या गाण्यांनीं भरून गेलें होतें. फिकट निळ्या रंगाच्या आभाळावर झिरझिरीत मेघांची जाळी पसरली असली तरी सकाळचें तेज त्यामुळें झांकत नव्हतें. गॅब्रिएल ओक आणि कोगन खेड्याचा चव्हाटा ओलांडून शेताकडे निघाले होते. ते बाथशीबाच्या वाड्याशी येतात तों वाड्याच्या वरच्या मजल्यावरील एक खिडकी कोणी तरी उघडीत आहे असें ओकला दिसलें. एक देखणा मनुष्य खिडकीच्या

जाळींतून आळसावून खालीं पहात होता. तो सार्जेट ट्रॉयच होता. त्यानें आपला तांबडा डगला बेफिकीरपणें अंगावर टाकला होता. आणि तो अगदीं आरामांत असल्यासारखा दिसत होता.

कोगनच पहिल्यानें म्हणाला, " तिनं अखेर त्याच्याशीं लग्न केलं म्हणा. तरी मला वाटलंच होतं कीं आज कांहींतरी कळणार म्हणून. काल रात्रींच माझ्या दाराशीं चाकांचा आवाज ऐकूं आला मला." गॅब्रिएल-कडे नजर जाऊन तो उद्गारला, " देवाशपथ ओक ! किती पांढरा फटफटीत पडला आहे तुझा चेहरा ! एखाद्या प्रेतासारखा दिसतोस कीं तूं ! "

तोंडावर क्षीणहास्य आणीत ओक म्हणाला, " तसा दिसतो कां मी ? "

कोगन म्हणाला, " हें पहा या फाटकावर टेंक तूं जरा, मी थांबतों थोडा वेळ."

गॅब्रिएल अस्वस्थपणे खालीं पहात उभा होता. त्याचें मन भविष्यांत भराऱ्या घेत होतें. घाईघाईनें केलेल्या या लग्नामुळें घडणारे पश्चात्तापाचे प्रसंग त्याला स्पष्टपणें दिसूं लागले होते.

थोड्या वेळानें ते दोघे वाड्याकडे निघाले. सार्जेट ट्रॉयनें वरून आनंदानें ओरडून त्यांना रामराम केला. कोगनबरोबर गॅब्रिएललाहि जुलमाचा रामराम करावा लागला. ट्रॉय हंसत हंसत म्हणाला, " छे बुवा ! हा वाडा भलताच अस्ताव्यस्त आणि अंधारलेला आहे." ट्रॉय जरा पूर्वेकडे वळला आणि त्याच्या लाल भडक डगल्यावर सूर्यकिरणांची नारिंगी छटा पसरली. गॅब्रिएलनें उत्तर दिलें, " पण जुना असला तरी छान आहे ! "

ट्रॉय मोकळेपणानें बोलत होता, " मागच्या पिढींतील घर बांधणाऱ्यांनीं जुना भाग पाडून आपल्या मनासारखे बदल करून घेतले जागोजागीं असं म्हणतात. मग आपण कां करूं नये तसं ? माझी तर अशी इच्छा आहे कीं, हा वाडा आधुनिक पद्धतीनं पुनः बांधून काढावा म्हणजे इथं राहाणाऱ्यांना जरा अधिक उत्साह वाटेल."

मध्येंच ट्रॉयला कसलीशी आठवण होऊन त्यानें कोगनला विचारलें, " काय रे, बोल्डवुडच्या घराण्यांत कधीं कोणाला वेड लागल होतं का ? "

जॉन कोगननें क्षणभर विचार केला. तो म्हणाला, " त्याचा काका जरा चक्रम् होता असं मी एकदां ऐकलं होतं खरं, पण नक्की कांहीं माहीत नाहीं. "

ट्रॉय सहजपणें म्हणाला, " त्यांत कांहीं महत्त्वाचं नाहीं. बरंय्, कधीं तरी येईन मी शेतावर आणि हें पहा आपण नेहमींप्रमाणं मित्रां-सारखं वागायचं बरं कां. "

ट्रॉयनें त्यांच्याकडे बक्षीस म्हणून अर्धा क्राऊन फेंकला. गॅब्रिएलचा चेहरा रागानें लाल झाला. त्यानें त्या नाण्याकडे ढुंकूनहि पाहिलें नाहीं.

कोगन विचार करीत म्हणाला, " हें पहा गॅब्रिएल ! या माणसाचं बाथशीबाशीं लग्न झालं असलं तर तो पैसे भरून सैन्यांतून मोकळा होईल; आणि इथें आपला मालक होऊन बसेल. मनांतल्या मनांत त्याला शिव्या दिल्या तरी वरकरणीं त्याला दादा बाबा म्हटलेलं बरं. "

गॅब्रिएल उत्तरला, " गप्प रहावं हेंच कदाचित् उत्तम ठरेल. पण त्यापुढें जाऊन या माणसाची खुशामत करणं मला शक्य होणार नाहीं. "

हे दोघे परत निघाले असतां वाटेंत त्यांना बोल्डवुड घोड्या वरून जातांना दिसला तो त्यांच्याशीं कांहींएक बोलला नाहीं. रात्रभर तो ज्या दुःखाशीं टक्कर देत होता त्याचा दृश्य परिणाम म्हणजे त्याचा रेखीव चेहरा आतां पांढरा फटफटीत पडला होता. त्याच्यांतच काय, त्याच्या घोड्याच्या चालींत देखील मूर्तीमंत निराशा भरून राहिलेली दिसत होती. बोल्डवुडचें हें दुःख पाहून क्षणभर गॅब्रिएलला स्वतःच्या दुःखाचा विसर पडला.

## ३६. " द्याहो! द्याहो! ही सुरा सुगंधा!"



गस्ट महिन्याच्या अखेरीस कडक उन्हाळा पडला होता. अजून वैवाहिक जीवनाचे बाथशीबाचे अनुभव नवथरच होते. एका रात्रीं वेदरबरीच्या शेतांत रचून ठेवलेल्या धान्याच्या उडव्यांच्या मध्यभागीं गॅब्रिएल उभा राहून आकाशाकडे पहात होता.

त्या रात्रीचा देखावा अगदीं भीषण होता. दक्षिणेकडून गरम वारे सुटले होते आणि आकाशांत ढग इतस्ततः धांवत होते. त्याआडून दिसणाऱ्या चंद्रावर एक प्रकारची भेसूर कळा आली होती. शेतावरील प्रकाश शबलित दिसत होता. रंगीत कांचेतून पाहिल्यावर पलीकडील देखावा जसा दिसतो तसें हें सारें दृश्य दिसत होतें. संध्याकाळीं मेंढ्या घरीं आल्या त्या अगदीं एकमेकांमागोमाग ओळीनें खेटून. तबेल्यांतील घोडेहि भ्यालासारखे करीत होते. एक मोठे थोरलें वादळ लवकरच होणार अशीं चिन्हें दिसत होतीं.

समोर उघड्या पडलेल्या धान्याच्या आठ उडव्यांकडे ओकनें शंकाकुल नजरेनें पाहिलें. शेतीवाडीवरील त्या वर्षाची अर्धी संपत्ति तेथें सांठविलेली होती. त्या उडव्यांवर कोणतेंहि आच्छादन नसून त्या अगदीं असुरक्षित अशा होत्या.

आणि हीच रात्र सार्जेंट ट्रॉयनें सुगीचें जेवण आणि नाच यांसाठीं निश्चित केली होती. बाथशीबाच्या जागीं आतां ट्रॉयचा अंमल सर्वत्र सुरू झाला होता. त्या जागीं ओक येतो तों आंतून वाद्यांचा आणि नाचत असलेल्या लोकांच्या पावलांचा संमिश्र आवाज ओकच्या कानावर आला.

इमारतीचा आंतील भाग हिरव्या पानांच्या माळांनीं सजविला असून ओट धान्याच्या राशी एका बाजूस रचून उरलेला दोन-तृतियांश भाग समारंभासाठीं मोकळा ठेवला होता. सार्जेंट ट्रॉय यापूर्वी एक शिपाईगडी असल्यानें त्याच्या पेशाला साजेल असें एक गाणें आंतील वाद्यवादक वाजवीत होते आणि सारे कामगार आणि स्त्रिया त्या गाण्याच्या तालावर नाचण्यांत दंग होते. हें गाणें संपल्यावर गॅब्रिएलला अधिक थांबवेना.

गॅब्रिएलनें ट्रॉयला निरोप पाठविला कीं, " मी एवढेंच सांगायला आलों आहे कीं थोड्या वेळांत मुसळधार पाऊस पडण्याचा संभव आहे. आपल्या साऱ्या उडव्या उघड्या पडल्या आहेत. त्यांच्या संरक्षणाची कांहीं तरी व्यवस्था केली पाहिजे. "

सार्जेंट ट्रॉयचा उलट निरोप आला, " पाऊस पडणार नाहीं. आणि अशा क्षुल्लक गोष्टींबद्दल सध्यां बोलण्यास मला सवड नाहीं. "

अगदीं अस्वस्थ होऊन ओक बाहेर पडला. कोठारांत चाललेल्या ख्यालीखुशालींत भाग घेण्याची त्याची मनःस्थिति नव्हती. घरीं जाण्याचा त्याचा विचार होता. तो दाराशीं आल्यावर ट्रॉयचे पुढील शब्द त्याच्या कानावर आले, " मित्रहो ! आजचा आपला समारंभ केवळ शेतांतले दाणे घरीं आणले एवढ्यासाठींच नव्हे. कांहीं काळापूर्वी तुमच्या मालकिणीशीं लग्न करण्याचें सुदैव मला लाभलें आहे. आतांपर्यन्त वेदरबरीमध्यें त्या लग्नाप्रीत्यर्थ कोणताहि जाहीर समारंभ आम्ही करूं शकलों नाहीं. आतां घरीं जाण्यापूर्वी प्रत्येकाला उंची दारूचे पेले देण्यांत येतील. "

बाथशीबानें ट्रॉयचा हात धरला आणि ती म्हणाली, " या लोकांना भरपूर प्यायला मिळालं आहे. आणखी दारू त्यांना देऊं नका. त्यांना सोसायची नाहीं ती. "

सार्जेंट ट्रॉय तिच्याकडे तिरस्काराची नजर टाकून म्हणाला, " उः ! मित्रहो ! या साऱ्या बायकांना आपण घरीं पाठवून देऊं आणि मग

आपण सारे मर्दंगडी एकटे बसून मजा करू. तुमच्यापैकीं कोणी मागं पाऊल घेतलं तर ध्यानांत ठेवा, येत्या हिंवाळ्यांत त्याला दुसरीकडेच काम बघावं लागेल. ”

बाथशीबा रागानें निघून गेली. बायका, मुलें, वाद्य-वादक सारे हळूंच निसटले. उगीच शोभा नको म्हणून ट्रॉय थोडा वेळ तेथें थांबून नंतर हळूंच बाहेर पडला.

गॅब्रिएल आपल्या घराच्या दाराशीं आला असतां एका मऊ, कातड्यासारख्या वस्तूवर त्याचा पाय अडखळला. तो एक भला मोठा बेडूक होता. निसर्गाचा हा संदेश ओकच्या लक्षांत आला. आंत जाऊन त्यानें दिवा लावला तों त्याच्या टेबलावर एक बारीक चमकणारी रेषा दिसत होती. एक मोठी पिंमट रंगाची गोगलगाय टेबलावरून सरपटत गेल्यानें ही रेषा उमटली होती. वादळी हवेचीं हीं पूर्वचिन्हें होतीं.

ओकला निश्चितपणें वाटूं लागलें कीं, ट्रॉयचा आडाखा चुकलेला असून आपला अंदाजच बरोबर आहे.

उडव्या रचून ठेवलेल्या शेतांत ओक परत गेला. तेथें सर्वत्र शांतता पसरली होती आणि उडव्यांची टोंकदार शिखरें आकाशाच्या पार्श्वभूमीवर उठून दिसत होतीं. या सर्व धान्याची किंमत साडे-सातशें पौंड झाली असती. द्रव्याचें हें खरें दैवी स्वरूप होतें. मानवाला आणि प्राण्यांना जीवनासाठीं जरूर असलेलें अन्नब्रह्म तेथें उभें होतें. या साऱ्याची केवळ एका स्त्रीच्या चंचलपणामुळें हानि होऊं द्यावयाची काय, हा ओकपुढें प्रश्न होता. तो स्वतःशींच म्हणाला, “ मला शक्य झालें तर तें मी कधींच घडूं देणार नाहीं. या स्त्रीवर मी मनापासून प्रेम केलं आहे. जिवांत जीव असेपर्यंत मी तिला मदत करीत राहीन. ”

उडव्यांवर झांकण्यासाठीं मोठाल्या ताडपत्र्या पाहिजे होत्या. त्या कोठारांतून घ्याव्या म्हणून पुनः तो त्या जागीं गेला. पिवळसर असा प्रकाश दाराच्या

एक भोंकांतून बाहेर येत असूनहि आंत सर्वत्र सामसूम होती. गॅब्रिएलनें भोंकांतून पाहिलें. सारे कामगार अस्ताव्यस्तपणें झिंगून पडले होते. गॅब्रिएलनें या समुदायाकडे निराशेनें नजर टाकली. सकाळच्या आंत धान्याच्या उडव्या वांचवायच्या असल्या तर त्या आपल्यालाच एकट्यानें प्रयत्न करून वांचविल्या पाहिजेत हें ओकला कळून चुकलें.

शाकारणीचें काम मॅथ्यू मून हा कामगार करीत असे. गॅब्रिएलनें त्याच्याजवळ जाऊन त्याला हलविलें; पण व्यर्थ! तो मूनच्या कानांत ओरडला, " शाकारणीचीं तुझीं हत्यारें कुठें आहेत ? "

मूननें यांत्रिकपणें त्या बेभान अवस्थेंतहि उत्तर दिलें, " उडव्यांच्या ओट्याखालीं "

" धान्याच्या कोठारघराची किल्ली कुठें आहे ? " या प्रश्नाला मात्र उत्तर आलें नाहीं. दुसऱ्या एका कामगाराला ओकनें विचारून पाहिलें पण त्याच्याकडूनहि उत्तर मिळालें नाहीं.

खेड्यांत जाऊन त्यानें लाबन टॉलच्या बायकोला जागें केलें. ती त्याला शिव्या देतच उठली. एकदांची कशी तरी त्यानें हवी ती किल्ली हस्तगत केली आणि धान्याच्या कोठारांतून चार मोठ्या ताडपत्र्या ओढीत ओढीत तो दहा मिनिटांनंतर शेतांतल्या उडव्यांशी येऊन पोंचला. प्रत्येक उडवीवर दोन ताडपत्र्या घालून त्यानें दोन बहुमूल्य धान्याच्या राशींचा पक्का बंदोबस्त करून टाकला. दोनशें पौंडाची मालमत्ता सुरक्षित राहिली.. पण तीन गव्हाच्या उडव्या आणखी ताडपत्र्या नसल्यानें उघड्याच राहिल्या. ओट्याखालीं ओकला एक मोठा दुफांटा ( फांदा ) सांपडला. तिसऱ्या उडवीवर जाऊन त्यानें गव्हाच्या पेंढ्या उतरल्या व छपरासारख्या शाकारून ठेवण्यास सुरुवात केली. त्यांमध्यें असलेला मोकळा भाग सुख्या पेंड्यांनीं त्यानें भरून काढला. घाईघाईनें गॅब्रिएलनें ही व्यवस्था केली तरी त्यामुळें बाथशीबाचा गहूं निदान एकदोन

आठवडे तरी सुरक्षित रहाणार होता. पण ही सारी व्यवस्था जोराचा वारा सुटला नाहीं तरच टिकणारी होती.

गव्हानंतर जवाचा प्रश्न होता. त्यांच्यावर चांगली शाकारणी केली तरच त्या उडव्या नीटपणें सुरक्षित राहिल्या असत्या. वेळ चालला होता आणि ढगांत चंद्र झांकला गेला तो गेलाच. युद्धापूर्वी राष्ट्राच्या वकिलानें देश सोडून जावें तसा तो प्रकार होता. रोग्यानें अखेरचा श्वास सोडावा अशी आकाशांतून वाऱ्याची एक मोठी झुळूक येऊन गेली आणि नंतर साऱ्या शेतावर शांतता पसरली. त्या शांततेंत गॅब्रिएल ठोकीत असलेल्या खुंट्यांचा आणि तो करीत असलेल्या शाकारणीचा एवढेच आवाज येत होते.



## ३७. "जलधर घनतर, फिरति गगनभर!"



एकाएकी साऱ्या प्रदेशावर लक्कन् वीज चमकून गेली आणि दशदिशांत मेघांचा गडगडाट भरून राहिला. वादळाचीं हीं पहिलीं पावलें होती. दुसरी मेघगर्जना झाली तेव्हां विजेची चमक कमी होती. बाथशीबाच्या झोंपण्याच्या खिडकींत एक मेणबत्ती पेटलेली आहे असे गॅब्रिएलला दिसलें. खोलींत फिरणाऱ्या आकृतीची छाया खिडकीच्या पडद्यावर दिसू लागली.

त्यानंतर तिसऱ्या वेळीं वीज चमकली. गॅब्रिएल एका उंच उडवीवर बसला असल्यानें तेथून विजेच्या प्रकाशांत त्याला शेजारच्या सहा मैलांच्या टापूंतील प्रदेश दिसत होता. विजेच्या प्रखर प्रकाशांत प्रत्येक कुंपण, झुडूप आणि झाड एखाद्या चित्रासारखें ठसठशीतपणें त्याला दिसून आलें. क्षणांत हें सारें चित्र एकदम नाहींसें झालें आणि भोंवतालीं इतका दाट

काळोख पसरला कीं गॅब्रिएलला हातानें चांचपडतच आपलें काम चालू ठेवावें लागलें.

गॅब्रिएलनें एक भाल्यासारखा टोंकदार लोखंडी दांडा आधारासाठीं उडवींत खोंचून ठेविला होता. वर वीज तळपूं लागली कीं त्या दांड्याच्या टोंकाशीं निळसर प्रकाश दिसूं लागे. एका क्षणानंतर तेथें एक जोरदार धक्का बसला. तेव्हां ती जागा धोक्याची आहे असें जाणून गॅब्रिएल खालीं उतरला. परन्तु समोर असलेल्या कामाच्या मानानें आपला जीव त्याला मोलाचा वाटत नव्हता. पुनः उडवीवर चढून शाकारणीचें काम सुरू ठेवण्याचा त्यानें निश्चय केला. त्यांत त्यानें एवढेंच केलें कीं त्याच्या हातीं आलेली एक लोखंडी सांखळी त्या दांड्याच्या टोंकाशीं बसवून ती जमिनीवर सोडून दिली. ओकनें आपलें काम सुरू केलें तेवढ्यांत पुनः एकदां वीज चमकली. त्या विजेच्या प्रकाशांत उडवीजवळ एका स्त्रीची आकृति गॅब्रिएलला दिसली. साऱ्या पंचक्रोशींत खरी धीराची स्त्री म्हणजे बाथशीबा ही एकच होती. तीच तेथें आली असेल काय, असा विचार करून त्यानें अंधारांतून प्रश्न केला, " बाईसाहेब तुम्हीच आहांत कां ?"

खालून बाथशीबाचा आवाज आला " कोण आहे तें ! "

" मी गॅब्रिएल. मी या उडवीवर शाकारीत बसलों आहे. "

" गॅब्रिएल तूं कां ? याच कामासाठीं आलें होतें मी. आपल्याला कसेंहि करून वाचवता येईल कां हें धान्य ? हे कुठें आहेत ? तुझ्याबरोबर आहेत कां ते ? "

—" इथें नाहींत ते. ते झोंपले आहेत कोठारांत. "

बाथशीबा म्हणाली, " उडव्यांची नीट काळजी घेतों म्हणून खात्री दिली होती त्यांनीं मला, आणि आतां साऱ्यांकडे दुर्लक्ष झालं आहे. कांहीं करण्यासारखं आहे कां मला ! लिडी बाहेर यायला भीत आहे. अशा

अवेळीं तूं इथें आलास हें आश्चर्यच ! खरंच , कांहींतरी करतां येईल कां रे मला ! ''

गॅब्रिएल वरून म्हणाला, " एक एक करून शाकारणीसाठीं पेंढ्या आणतां येतील तुम्हांला. अंधारांत शिडीवरून चढून येण्याची भीति वाटत नसेल तर. मात्र आतां प्रत्येक क्षण मोलाचा आहे ''

बाथशीबा निश्चयानें म्हणाली, " मी वाटेल तें करीन ! '' लगेच आपल्या खांद्यावर एक पेंढी घेऊन ती वर चढली, आणि उडवीवर लोखंडी दांड्याजवळ तिनें ती ठेवली. बाथशीबा उडवीवर आली असतां एक मोठी घनगर्जना झाली. " किती भयंकर ! '' असा उद्‌गार काढून तिनें गॅब्रिएलच्या हाताचा आधार घेतला. या उंच जागेवरून ती पडूं नये म्हणून गॅब्रिएलनेंहि तिला सांवरून धरलें. बाथशीबा खालीं उतरून पुनः कामाला लागली. ती शिडीच्या टोंकावर उभी राहून एक पेंढी गॅब्रिएलच्या हातांत देत असतांना सारें आकाश भेदून एक विजेचा लोळ खालीं उतरला. 'सांभाळा, नीट धरा!' म्हणून पेंढी उतरून घेत गॅब्रिएलनें तिचा हात धरून ठेवला. हा विजेचा लोळ चारहि बाजूनीं विजा नाचत येऊन तयार झाला होता. मृत्यूचें भयंकर तांडवच होतें तें. त्यांतील एक विजेचा भाग लोखंडी दांड्यावर कोसळला आणि सांखळीतून खालीं जमिनींत शिरला. त्या तेजानें गॅब्रिएलच्या डोळ्यापुढें अंधारीच आली. बाथशीबाचा उष्ण झालेला हात त्याच्या हातांत कंप पावूं लागला. त्याला ती भावना अगदीं नवी आणि अंगावर रोमांच उभे करणारी अशी होती. पण निसर्गाच्या या भीषण आणि रौद्र स्वरूपासमोर मानवी जीवन आणि प्रेमासारख्या भावना अगदीं क्षुद्र वाटत होत्या.

" अगदीं थोडक्यांत बचावलों आपण '' घाईघाईनें गॅब्रिएल म्हणाला. " तुम्ही आतां खालीं जावें हेंच ठीक. '' बाथशीबा खालीं उतरली आणि ओकहि खालीं गेला. दोघे शेजारीं शेजारीं उभे होते. बाथशीबाचे विचार वादळाबद्दलच होते. तर ओकच्या मनांत फक्त तिच्याविषयींचे विचार येत होते. थोड्या वेळानें गॅब्रिएल म्हणाला, " मी आतां पुनः वर जातों. ''

बाथशीबा म्हणाली, " गॅब्रिएल ! किती मायाळू आहेस तूं ! माझी लायकी नाहीं इतकी. मीहि इथें थांबतें आणि तुला मदत करतें. दुसरे कामगार कां आले नाहींत इथं ? "

ओक जरा घुटमळत म्हणाला, " त्यांना येतां आलं असतं तर ते आले असते. "

बाथशीबा हळूंच म्हणाली, " आलं, आलं सारं लक्षांत. सारे सारे दारू पिऊन कोठारांत झिंगून झोंपले आहेत, माझे पतिराजहि त्यांच्यांतच आहेत. असंच नाहीं कां ? "

ओक पुनः उडवीवर चढून शाकारण्याच्या कामाला लागला. बाथशीबा त्याच्या मागोमाग गेली. पण तिच्या हातांत पेंढी नव्हती. तिनें चमत्कारिक स्वरांत हांक मारली, " गॅब्रिएल ! "

पुनः एकदां वीज चमकली. त्या प्रकाशात त्याला दिसलें कीं, उडवीच्या एका टोंकाशीं, शिडीच्या शेवटच्या पायरीचा आधार घेऊन बाथशीबा बसली होती. " काय बाईसाहेब ! " त्यानें विचारलें.

बाथशीबा म्हणाली, " हें पहा, तुझ्या मताची मला थोडीशी किंमत आहे म्हणून मला कांहीं खुलासा करायचा आहे. बाथवरून परत आल्यापासून मला सांगायचं होतं तें. पण तूं असा गंभीर मुद्रेनं माझ्याकडे पहात होतास कीं मला बोलवलं नाहीं. आतां सांगतें ऐक...... "

यानंतर बाथला पोंचल्यापासून घडलेला सारा वृत्तांत बाथशीबानें गॅब्रिएलला सांगितला. ती बाथला गेली तेव्हां ट्रॉयशीं लग्न करण्याचा तिचा हेतु नव्हता. उलट ट्रॉयशीं संबंध तोडून टाकण्यासाठींच ती गेली होती. तिथें गेल्यावर तिच्या लक्षांत आलें कीं ट्रॉयची आपण अशी एकांतांत भेट घेतल्यानें आपला दुर्लौकिक होण्याची भीति आहे. शिवाय ट्रॉयनें तिला स्वच्छ सांगून टाकलें कीं, " तुझ्यापेक्षां एक सुंदर स्त्री माझ्या नजरेस आली आहे. तूं तावडतोब माझ्याशीं लग्न केलं नाहींस तर माझी तुझ्या-

विषयीं निष्ठा राहीलच अशी ग्वाही देणार नाहीं मी." अशा रीतीनें मोह आणि असूया यांच्या कात्रींत सांपडल्यानें बाथशीबाला लग्न करणें भाग पडलें.

गॅब्रिएलनें यावर एवढेंच म्हटलें, "तुम्ही खूप दमल्या आहांत तुम्ही घरांत जावं हें बरं. उरलेलं काम मी करूं शकेन." जातांना बाथशीबानें गॅब्रिएलचे आभार मानले. ती म्हणाली, "तुझ्या निष्ठेबद्दल मी शतशः आभारी आहे. माझ्यासाठीं तूं अगदीं शिकस्त करीत आहेस याची जाणीव आहे-मला." बाथशीबा निघून गेल्यावरहि गॅब्रिएल समाधि लागल्यासारख्या अवस्थेत आपलें काम करीतच राहिला. मधेंच एक करकरणारा आवाज त्याच्या कानावर आला. गाडीखान्याच्या छपरावरील वाऱ्याची दिशा दाखविणारी कोंबड्याची आकृति फिरूं लागली होती. वारा बदलला होता, आणि आतां मुसळधार पाऊस येऊन नुकसान होणार याचें तें चिन्ह होतें.



## ३८. "सांगू कशी रे मनाची व्यथा ही!"




तां पांच वाजले होते. उषःकाल होऊं पहात होता. वारा दिशा बदलून जोरानें वाहूं लागला. थोड्याच वेळांत सोसाट्याचे वारे वाहूं लागले. गव्हाच्या उडव्यांवर केलेल्या शाकारणीचा कांही भाग गिरक्या घेत उंच आभाळांत उडून गेला. त्याची नीट दुरुस्ती करून, त्यावर जड जड लांकडें ठेवून ओकला त्यांचा पक्का बंदोबस्त करावा लागला. हें काम आटोपून ओकनें जवाच्या उडव्यांकडे लक्ष वळविलें. जागोजाग खुंट्या मारून त्यानें शाकारलेला भाग पक्का बसविला. तेवढ्यांत जोराचा पाऊस सुरू झाला आणि ओक चिंब भिजून गेला. त्याला

एकाएकी आठवण झाली कीं आठ महिन्यांपूर्वी याच वेळीं, याच जागीं आपण आगीशीं झगडा करीत होतों तितक्याच निकरानें आज आपल्याला पावसाशीं झगडावें लागत आहे—आणि हें सारें जिच्यासाठीं करावयाचें ती......

परन्तु ओक उदार मनाचा आणि इमानी होता. त्यानें हे विचार मनांतून झटकून टाकले. तो कामांतून मोकळा झाला तेव्हां सकाळचे सात वाजले असूनहि सगळीकडे अंधारून आलें होतें. शेवटच्या उडवीवरून खालीं उतरून ओकनें उद्गार काढले, " झालं एकदांचं सारं काम. " तो चिंब भिजला होता, दमला होता, आणि उदास झाला होता, तरीहि एक चांगलें कार्य आपण यशस्वीपणें केलें हा हुरूप त्याच्या अंगीं आला होता.

कोठारांतून आतां हळूं हळूं कांहीं आवाज येऊं लागले. ओकने त्या दिशेनें पाहिलें. एकेक, दोन दोन, असे सारे कामगार शरमिंदे होऊन, अवघडून दारातून बाहेर पडत होते. त्यांच्या आघाडीला असलेला लाल डगलेवाला मनुष्य मात्र खिशांत हात घालून ऐटीनें शीळ घालीत चालला होता. या साऱ्या कामगारांपैकीं कोणीहि धान्याच्या उडव्यांकडे मान फिरवून पाहिलेंहि नाहीं किंवा त्याबद्दल कांहीं विचार केला असावा असेंहि दिसलें नाही. निराळ्या रस्त्यानें ओकहि घराकडे निघाला. रस्त्यांत बोल्डवुडची आणि त्याची गांठ पडली.

बोल्डवुडची चर्या अगदीं बदलल्यासारखी दिसत होती. बोल्डवुडच्या धान्याचा सांठा बाथशीबाच्या धान्यापेक्षां कितीतरी अधिक होता. त्या उडव्यांतलि धान्य नीट शाकारून सुरक्षित ठेवलें कीं नाहीं असा प्रश्न ओकनें केला. परन्तु या साऱ्या उडव्यांकडे या वर्षी आपण लक्षच दिलें नाहीं असें बोल्डवुडनें उत्तर दिलें. यापूर्वी बोल्डवुड असें दुर्लक्ष करील, ही कल्पनाहि कोणाला अशक्य कोटींतली वाटली असती.

बोल्डवुडला कोणाजवळ तरी मन मोकळें करायचें होतें असे दिसत होतें. तो कष्टानें म्हणाला, " ओक ! अलीकडे परिस्थिति मला

अनुकूल नाहीं. मी जरा स्थिरस्थावर होईल असें म्हणत होतों; पण माझे सारे बेत फसले."

ओक भाबडेपणानें बोलून गेला, "मला वाटलं होतं कीं, माझ्या मालकीणबाई तुमच्याशीं लग्न करतील. असो. असं होतंहि एखाद्या वेळेला! आपली अपेक्षा असते पण तसं घडून येत नाहीं."

अशा परिस्थितींतहि, बाथशीबानें आपलें वचन मोडलें नाहीं. आपणाहि या लग्नाविषयीं इतके उत्सुक नव्हतों वगैरे बोलून बोल्डवुड आपलें अंतःकरणांतील दुःख लपविण्याचा प्रयत्न करीत होता. परन्तु त्याला झालेलें तीव्र दुःख आणि त्याची निराशा हीं ओकच्या नजरेंतून सुटलीं नाहींत.

---

## ३९. "रडसि काय म्हणुनि अशी?"




स्टराब्रिज ते वेदरबरी या रस्त्यावर, वेदबरीपासून सुमारें तीन मैलांवर यालबरी हिल् नांवाची एक टेकडी आहे. तिची दीर्घ चढण चढून येताना टेकडीच्या पायथ्याशींच गाडींतून उतरून वरपर्यंत पायीं चालत येण्याचा येथील लोकांचा प्रघात असे. ऑक्टोबर महिन्यांतील एका शनिवारच्या संध्याकाळीं बाथशीबाची गाडी ही टेकडी चढून वर येत होती. बाथशीबा अस्वस्थपणें गाडींत बसली असून सार्जंट ट्रॉय ऐटदार पोषाख करून गाडीबरोबर चालत होता. बाथशीबाच्या पैशानें त्यानें लष्करांतून आपली मुक्तता करून घेतली होती आणि आतां तो हळूं हळूं मोठा ऐटबाज, जमीनदार बनूं लागला होता. तो मध्येंच बाथशीबाला म्हणाला, "हा पाऊस आयत्या वेळीं येऊन कोसळला नसता तर पहातां

पहातां दोनशें पौंड खिशांत घातले असते मी. पण— पाऊस आला आणि मग सारंच पारडं फिरलं. या मोसमांतील शर्यतीमुळं साऱ्यांचंच नुकसान झालं आहे माझ्यासारखं."

बाथशीबा उदासपणें म्हणाली, "एका महिन्यांत शर्यतीच्य या भयंकर व्यसनांत तुम्हीं शंभर पौंड घालवलेत असाच याचा अर्थ ना? माझ्या पैशांची अशी उधळपट्टी करणं अगदीं मूर्खपणाचं आहे. असाच प्रकार चालू राहिला तर आपल्याला शेतीवाडीलाहि मुकावें लागेल. हाच शेवट होणार अशा वागण्याचा."

गेल्या उन्हाळयांत बाथशीबाचा आवाज किती भरदार आणि उत्साही होता. आतां ती हे शब्द बोलत असतां तिचा स्वर अगदीं खालावला होता; आणि तिच्या आवाजांत दुःखाची झांक आली होती. ट्रॉयनें मात्र बेफिकीरीनें, म्हटलें "हं! करा सुरवात आतां पुनः रडायला! नेहमीचंच आहे हें."

बाथशीबा आजीजीनें म्हणाली, "बडमाउथच्या दुसऱ्या रेसला तरी जाणार नाहीं असें वचन द्याल ना मला?"

ट्रॉय म्हणाला, "तसं कां म्हणून देऊं मी? खरं म्हटलं तर माझा विचार होता कीं हवा चांगली असली तर तुलाच बरोबर घेऊन जावं!"

बाथशीबा उसळून म्हणाली, "तें कालत्रयीं शक्य नाहीं. शर्यत या शब्दाचीहि मला शिसारी आहे."

ट्रॉय कुरकुरूं लागला, "बाथशीबा! पूर्वीचा तुझा धीटपणा आणि चलाखी हीं सारीं लोपल्यासारखीं दिसतात. वरकरणीं धीट असून तूं खरोखर इतकी भित्री भागूबाई आहेस असं जर मला आधीं कळलं असतं तर मी कधींहि तुझ्याशीं लग्न केलं नसतं."

यानंतर कांहीं न बोलतां ते पुढें झाले. रस्त्यावर वाढलेल्या झाडांचीं कांहीं अकालीं कोळपेलेलीं पानें त्यांच्या मार्गावरून इतस्ततः उडत गेलीं.

टेकडीच्या टोंकावर, एका वळणाशीं अर्धवट अंधारांत यांना एक स्त्री भेटली. त्या अंधारांत तिचा उदास चेहरा आणि तिचा कंगाल वेष बाथशीबाला दिसूं शकला नाहीं. तिनें विचारलें, "रावसाहेब! कॅस्टरब्रिज येथील अनाथाश्रम रात्रीं किती वाजतां बंद होतो माहीत आहे का तुम्हांला?"

तिचा आवाज कानीं येतांच ट्रॉय एकदम दचकला; परन्तु तेवढ्यांत सांवरून घेऊन तो हळूच म्हणाला, "मला माहीत नाहीं." त्याचा आवाज ऐकून त्या स्त्रीनेंहि चटकन वर पाहिलें. त्याच्या चेहऱ्याची तिच्याकडे असलेली बाजू पाहून शेतकऱ्याच्या वेषांतील आपल्या शिपाई प्रियकराला तिनें ओळखलें. आनंद आणि दुःख यांच्या संमिश्र भावना एके वेळींच तिच्या चेहऱ्यावर उमटल्या आणि भावनावशपणें एक किंकाळी फोडून ती खालीं पडली.

"अरेरे बिचारी!" असा उद्‌गार काढून बाथशीबा खालीं उतरूं लागली. त्यावर घोड्याचा लगाम तिच्या अंगावर टाकून ट्रॉय तिला अडावून म्हणाला, "आहेस तिथंच थांब आणि घोड्याकडे लक्ष दे. हळूं हळूं घोडा पुढें ने. मी या बाईची व्यवस्था पहातों."

तिला अधिक बोलण्याची संधि न देतां त्यानेंच घोडा पुढें पिटाळला आणि गाडी पुढें रवाना झाली.—

ट्रॉयनें त्या स्त्रीला वर उचलून घेऊन मृदु स्वरांत विचारलें "इथं कशी आलीस तूं? माझी तर कल्पना झाली होती कीं तूं लांब कुठें तरी असशील नाहींतर मेली असशील. कां पत्र लिहिलं नाहींस मला?"

ती म्हणाली, " भीती वाटत होती मला ! "

--" तुझ्याजवळ पैसे आहेत कां ? "

--" कांहीं एक नाहीं. "

—" मग हे घे. माझ्याजवळ आणखी असते तर फार बरं झालं असतं. माझी बायको मला देईल तेवढेच पैसे असतात माझ्याजवळ अन् आतांच तिच्याजवळ मागतां येणार नाहींत मला. आणि नीट ऐक ! कुठें जाणार तूं आज रात्रीं ! कॅस्टरब्रिजच्या अनाथाश्रमांत ! "

--" होय तिथंच जायचा विचार केला होता मी ! "

" बरं मग आज रात्रीं आणि उद्यां तिथं मुक्काम कर. सोमवारीं सकाळीं दहा वाजतां गांवाबाहेरील पुलाजवळ मला न विसरतां भेट. मला मिळतील तितके पैसे मी घेऊन येईन. फॅनी ! तुझी आबाळ होऊं देणार नाहीं मी. कुठें तरी तुझी रहायची व्यवस्था करीन. मी अगदीं पशु आहे खरा ! बरं राम राम ! "

टेकडीच्या टोंकावर पोंचल्यावर बाथशीबानें मान वळवून पाहिलें. ती स्त्री उठून, ट्रॉयजवळून निघून हळू हळू कॅस्टरब्रिजच्या रोखानें चालली होती. ट्रॉयनें गाडींत पाऊल टाकून बाथशीबाच्या हातांतून लगामाच्या वाद्या घेतल्या आणि चाबूक लगावून घोडा भरधांव सोडला.

बाथशिबानें त्याच्या चेहऱ्याकडे रोखून पाहिलें आणि विचारलें, " कोण ती बाई ? माहीत आहे कां तुम्हाला ? "

—" माहीत आहे. " तोहि धीटपणें तिच्याकडे पहात उत्तरला.

ती रागानें आणि ताठरपणानें म्हणाली, " मला वाटलंच तुमची ओळख असेल म्हणून. कोण आहे ती ? "

तो म्हणाला, "आपल्या दोघांशीं तिचा कांहीएक संबंध नाहीं. तिची माझी तोंडओळख आहे एवढेंच !"

"तिचें नांव काय ?" बाथशीबानें विचारलें.

—"मला कसं कळणार तें ?"

—"मला वाटतं तुम्हाला माहीत आहे तें."

"तसं वाटत असेल तर वाटूं दे आणि जा खड्ड्यांत" असं चिडून म्हणत ट्रॉयनें एक चाबकाचा जोराचा फटका घोड्याला लगावला. त्या आवाजांत त्याचा शेवटचा शब्द विरून गेला. गाडी भरधांव निघाली आणि मग दोघांपैकीं कोणीहि कांहींच बोललें नाहीं.



## ४०. "अर्जुनि चालतोंचि वाट, मार्ग हा सरेना !"



कडे ती हतभागी स्त्री बराच वेळ कॅस्टरब्रिजच्या दिशेनें चालतच होती. हळू हळू तिचीं पावलें क्षीणपणें पडूं लागलीं. ती एका गंजीच्या आडोशाला आडवी झाली आणि झोंपी गेली.

ती जागी झाली तेव्हां भोंवतालीं सर्वत्र अंधार पसरला होता. सारं आकाश ढगांनीं झांकून टाकलें होते. दुरून कॅस्टरब्रिज शहरातील दिव्यांचा अंधुक धूसर प्रकाश दिसत होता तेवढाच. ती स्वतःशींच म्हणाली, "इतकं दूर या शहरांत मला जातां येईल तर किती बरं होईल...

परवां त्यांना भेटायचं. कोण जाणे, त्याआधींच कदाचित् माझे प्राण जातील. ''

हळू हळूं ती उभी राहिली आणि कष्टानें रस्त्याला लागली. अजून दोन मैलांची मजल उरली होती. थोड्या वेळानें तिची पावलें लटपटूं लागलीं. वाटेंत एका शेतांत लांकडाच्या चौकटी करण्यासाठीं कांहीं काठ्या कापून ठेवल्या होत्या. त्यांच्या ढिगाऱ्यांतून, कुबडीसारख्या दुबेळकें असलेल्या दोन काठ्या तिनें उचलून घेतल्या. त्यांच्या आधारानें ती हळूं हळूं पुढें सरकूं लागली. थोडें अंतर चालून जाईपर्यंत या कुबड्यांचा तिला चांगला उपयोग झाला. पण त्यांच्या मदतीलाहि कांही सीमा होती. तिचे हात आणि अंग दुखूं लागलें. हळू हळू तिची गति मंद होऊन अखेर तोल जाऊन ती रस्त्याच्या कडेला खालीं पडली.

सकाळचा वारा वाहूं लागला. कांहीं काळानें ती मोठ्या कष्टानें उठून उभी राहिली; आतां त्या कुबड्या तिनें केवळ हातांत धरावयाच्या काठीसारख्या वापरण्यास सुरुवात केली. हळू हळू सरकत सरकत ती दुसऱ्या मैलाच्या दगडाशीं येऊन पोंचली. आतां कॅस्टरब्रिज शहराचे दिवे स्पष्ट आणि सलग असे दिसूं लागले होते. ती स्वतःशीं म्हणाली, '' आतां फक्त मैलाची मजल राहिली झालं. '' रस्त्याच्या बाजूच्या लोखंडी कुंपणाचा आधार घेत ती पावलें टाकूं लागली. ' आणखीं पांचच पावलें— आणखी पांचच ' अशी मनाची समजूत करून घेत, मोठ्या कष्टानें पण यशस्वीपणें खरडत खरडत ती अर्धा मैल चालून गेली. समोर असलेला विस्तीर्ण प्रदेश आणि दूरचे दिवे पाहून एक निःश्वास टाकून ती पुनः खालीं बसली, '' नाहीं आतां चालवत पुढें '' असें पुटपुटून तिनें डोळे झांकले.

थोड्या वेळानें समोरच्या अंधारांतून एक कुत्रा येऊन तिचा हात चाटूं लागला. तो एक शांत, गरीब आणि भला मोठा उंच असा बिनवारशी कुत्रा होता. फॅनीप्रमाणें त्यालाहि घर नव्हतें. ती कष्टानें पावलें टाकूं लागल्यावर तोहि तिच्याबरोबर चालूं लागला. तिच्या मनांत एक

विचार विजेसारखा चमकून गेला. "कदाचित् या कुत्र्याच्या मदतीनं मी पोहोंचूं शकेन मुक्काम वर." तिनें कॅस्टरब्रिजकडे बोट दाखविलें. तिचा आशय त्या कुत्र्याच्या लक्षांत आला असावा. हळूं हळूं फॅनीनें आपले दोन हात त्या कुत्र्याच्या खांद्यावर ठेवले आणि आपला अर्धाअधिक भार त्याच्यावर टाकून ती वांकून हळूं हळूं चालूं लागली. तो कुत्राहि तिच्या-बरोबरच पुढें चालूं लागला.

त्यांची प्रगति अर्थातच मंदगतीनें होत होती. अखेर ते शहराशीं येऊन पोंचले. डावीकडे वळण घेऊन ते जाण्याच्या ठिकाणा-जवळ आले. ती इमारत शहराच्या बाहेर असून गर्द वेलींनीं आच्छादिलेली होती. तिच्या भिंतींत एक दार असून आंतील घंटेची दोरी बाहेर टांगलेली होती. दारापर्यंत फॅनी कष्टानें सरपटत आली आणि गुडघ्यावर उंच होऊन तिनें दोरीचा दांडा कसा तरी ओढला आणि तशीच गुडघे टेकून तोंडावर पडली.

त्या वेळीं सकाळचे सहा वाजण्याचा सुमार होता. दमलेल्या, श्रमलेल्या जिवांचे विश्रांतिस्थान असलेल्या या इमारतींतून हालचालीचे आवाज येऊं लागले. मोठ्या दाराशेजारची एक लहानशी दिंडी उघडली. त्यांतून एका माणसानें डोकावून पाहिलें. दिवा आणण्यासाठीं तो आंत गेला व दोन स्त्रियांना घेऊन परत आला. त्यांनीं मिळून त्या खालीं पडलेल्या स्त्रीला उठविलें आणि आधार देऊन दारांतून आंत नेलें. त्या मनुष्यानें पुन्हां दार लावून घेतलें.

आंतील एका स्त्रीनें विचारलें, "येथपर्यंत ही बाई आली तरी कशी ?"

दुसरी उत्तरली, "देवाला ठाऊक !"

त्या दमलेल्या प्रवासिनीनें उत्तर दिलें, "एक कुत्रा बाहेर होता. कुठें गेला तो ! त्यानेंच मला मदत केली."

तो मनुष्य म्हणाला, "मी त्याला दगड मारून हांकून दिला!"

दिवा घेऊन तो मनुष्य पुढें झाला आणि त्या दोन कृश स्त्रियांच्या आधारानें फॅनीनें त्या (अनाथाश्रमाच्या) इमारतींत प्रवेश केला.



## ४१. "हा हंत! हंत! नलिनीं गज उज्जहार!"



बाजार करून घरीं आल्यावर बाथशीबा ट्रॉयशीं फारशी बोलली नाहीं आणि तोहि तिच्याशीं फारसें बोलण्याच्या मनस्थितींत नव्हता. दुसरा दिवसहि (रविवार) अशाच रुसव्यांत गेला. तो शर्यतीच्या आधला दिवस होता. त्या संध्याकाळीं ट्रॉय एकदम म्हणाला. "बाथशीबा, मला वीस पौंड देतेस कां?"

तिचा चेहरा पडला. "वीस पौंड!" ती उद्गारली.

"होय. मला या रकमेची फारच जरूर आहे." ट्रॉयचा चेहरा फारच चिंताक्रान्त दिसत होता.

बाथशीबा म्हणाली, "उद्याच्या शर्यतीसाठीं हवे असतील हे पैसे!"

क्षणभर ट्रॉयनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. त्याला आपल्या मनांतले विचार उघड करावयाचे नव्हते. त्यामुळें बाथशीबाची चूक त्याच्या पथ्यावरच पडली. तो म्हणाला, "बरं, शर्यतीसाठीं मला पैसे हवे असले तर?"

बाथशीबा अजीजीच्या स्वरांत म्हणाली, " फ्रँक ! तुम्ही मला म्हणत होतां कीं, ' सर्व सुखांपेक्षां तूं मला अधिक प्रिय आहेस. तुझ्यासाठीं सर्व सुखांचा मी त्याग करीन. ' हें बोलणं थोड्या आठवड्यांपूर्वींचंच आहे. आणि आतां एवढी शर्यत सुद्धां तुम्हाला सोडवत नाहीं ना माझ्यासाठीं ! रहा कीं घरीं. सांगा कीं तुमच्या लाडकीला ' हो ' म्हणून ! "

तिला संदिग्ध अवस्थेंत ठेवण्यांत हंशील नाहीं असा विचार करून तो म्हणाला, " हे पैसे शर्यतीसाठीं नको आहेत मला ! "

—" मग कशाला हवेत ? "

तो सौम्यपणें तिला म्हणाला, " हें पहा ! अशा संशयी वृत्तीनं तूं माझ्यावर अन्याय करीत आहेस. लग्न होऊन चार दिवस लोटले नाहींत एवढ्यांत असा जाच करणं तुला शोभत नाहीं. "

बाथशीबा गाल फुगवून त्यांतहि जरा हंसत म्हणाली, " मीच पैसे देत असतें तुम्हाला. मग थोडी कुरकुर करायचा हक्क हवाच मला. "

ट्रॉयनें लगेच उत्तर दिलें, " अगदीं बरोबर, तुझी कुरकुर करून झाली आहेच. आतां दुसऱ्या भागाकडे वळूं या आपण. अन् हें पहा बाथशीबा, असलं बोलणं थट्टा म्हणून ठीक आहे. पण त्याचा अतिरेक होतां कामा नये. नाहींतर पश्चात्तापाची पाळी येईल तुला ! "

बाथशीबाचा चेहरा आरक्त झाला. ती चटकन् म्हणाली, " पश्चात्ताप तर करायला लागलेंच मी आत्तांपासून ! "

—" कसला पश्चात्ताप होतोय् तुला ? " ट्रॉयनें प्रश्न केला.

—" माझं प्रेमाचं सुंदर स्वप्न संपलं म्हणून ! "

—" लग्न झालं कीं, असं प्रेम संपुष्टांत येतंच " ट्रॉयनें लगेच उत्तर दिलें " जाऊं दे हें बोलणं, मला वीस पौंड दे. म्हणजे आपण पुनः गोडीनं वागूं. "

बाथशीबानें एक सुस्कारा टाकला. ती म्हणाली, " घर-खर्चासाठीं मी वीस पौंड बाजूला काढून ठेवले आहेत. तुम्हाला त्यांची गरज असली तर घ्या ते. "

--" फार उत्तम. आभारी आहे मी तुझा. उद्यां सकाळीं न्याहारीच्या आंत मी येथून बाहेर जाईन. "

बोलतां बोलतां त्यानें घड्याळ बाहेर काढून त्याच्याकडे पाहिलें. घड्याळाचें मागचें झांकण उघडलें आणि त्यांत एक केंसांची कुरळी बट बाथशीबाला दिसून आली. तिचा चेहरा एकदम लाल झाला. ती उद्गारली फ्रँक! कोणत्या बाईच्या केंसांची बट ही ? "

फ्रँकनें चटकन् घड्याळाचें झांकण मिटून उत्तर दिलें, " कोणाची म्हणजे ! तुझींच ! "

बाथबीबा म्हणाली " किती घडधडीत खोटं बोलतां हो ! ते केंस सोनेरी होते ! कोणाचे ते ? मला कळायला हवं ! "

ट्रॉय म्हणाला, " ठीक आहे. सांगतों ! तुझी ओळख होण्या-पूर्वी जिच्याशीं लग्न करण्याचा माझा विचार होता तिच्या केंसाची ही बट ! "

—" तिचं नांव सांगायला पाहिजे तुम्हीं मला ? "

—" तें सांगतां येणार नाहीं मला. "

--" तिचं लग्न झालंय कां ? "

" नाहीं. "

—" ती सुंदर आहे कां ? "

—" आहे. बाथशीबा ! हें पहा, इतकी तऱ्हेवाईक आणि मत्सरी होऊं नकोस. वैवाहिक जीवन म्हणजे काय असेल हें तुला माहीत होतं. असल्या भानगडींची तुला एवढी भीति होती तर तूं लग्नच करायला नको

होतंस." ट्रॉयच्या वागण्यानें बाथशीबाचा जीव अगदीं विटून गेला होता. तिचे डोळे भरून आले होते. अखेर ती उसळली, "मी तुमच्यावर इतकं प्रेम केलं त्याचं चांगलं प्रायश्चित्त दिलंत तुम्ही मला."

ट्रॉयनें उत्तर दिलें, "तुझ्याबद्दल मला खूप वाटत असलं तरी दुसऱ्या गोष्टींचाहि मला विचार करायला हवा. माझ्या इतर संबंधांची तुला कल्पनाहि नसेल."

बाथशीबानें प्रश्न केला, "तुम्ही इतर संबधांचा उल्लेख केलांत. परवां रस्त्यांत भेटलेली ती बाई त्यापैकींच कां? तिचीच कां ती बट?"

ट्रॉयला अखेर सांगावें लागलें, "होय! तिचीच. माझ्याकडून अखेर काढून घेतलीस ही गोष्ट! झालं एकदांचं समाधान?"

"आणि ते दुसरे संबंध कोणते आहेत?"

"हं: ! त्यांत कांहीं अर्थ नाहीं. उगीच थट्टा केली मी!"

बाथशीबा आश्चर्यानें आणि व्यथित अंतःकरणानें म्हणाली, "नुसती थट्टा? मला इतकं दुःख होत असतां थट्टा सुचतेय् कां तुम्हाला फ्रँक? मला खरं खरं तें सांगा. एक काळ असा होता कीं मी निवडलेल्या पतीनं आपलं सर्वस्व मला अर्पण केलं पाहिजे असा माझा निर्धार होता. आणि आतां......त्यानं मला क्रूरपणें वागवूं नये म्हणजेच पुष्कळ झालं असं वाटायला लागलंय मला! होय! स्वतंत्र वृत्तीची, आणि करारी बाथशीबा अखेर या स्थितीला येऊन पोंचली आहे."

ट्रॉय पटकन म्हणाला, "एवढं निर्वाणीचं बोलायला नको कांहीं तुला." असें म्हणून तो खोलींतून निघून गेला.

दुसरे दिवशीं सकाळीं आठ वाजण्याच्या आधींच ट्रॉय बाहेर निघून गेला होता. न्याहारीनंतर ती आपल्या शेतीवाडीची देखरेख करण्यास बाहेर पडली. पण ती जेथें जाई तेथें आपण सांगण्याआधींच गॅब्रिएलनें सारा बंदोबस्त केला आहे असें तिला दिसून येई.

बाथशीबा अशीच फिरत असतां समोर बोल्डवुड आणि गॅब्रिएल हे आपापसांत हे बोलत असतांना तिला दिसले. त्यांचें आणि जोसेफ पुअरग्रास या कामगाराचेंहि कांही बोलणें झालें. तो जवळ आल्यावर बाथशीबानें विचारलें, " जोसेफ ! काय निरोप होता त्यांचा ? "

जोसेफ म्हणाला, " यापुढें फॅनी रॉबिन तुम्हाला दिसायची नाहीं. अनाथाश्रमात तिला मृत्यू आला. "

" फॅनी वारली ! कशानं ? "

जोसेफनें उत्तर दिलें, " नक्की कशानं तें माहीत नाहीं मला. पण तिची प्रकृति मूळचीच नाजूक होती. हालअपेष्टा सोसवल्या नाहींत तिला. सकाळपासून तिची प्रकृति बिघडली. आधींच ती अगदीं खंगून गेली असल्यान संध्याकाळीं तिला मृत्यू आला. ती या पंचक्रोशीमधली कायदेशीर रहिवाशी असल्यानें तिला इथेंच मूठमाती द्यावी म्हणून तिचं प्रेत इथें आणायला बोल्डवुड आपली गाडी पाठवणार आहे. "

बाथशीबा लगेच म्हणाली, " मीच करीन तें काम. फॅनीची माझी ओळख थोड्या दिवसांचीच; पण ती माझ्या काकांची जुनी मोलकरीण. अर्थात् ती माझी नोकर. बोल्डवुडला निरोप पाठव आणि सांग कीं कुटुंबातली एक जुनी नोकर म्हणून फॅनीला आणण्याची व्यवस्था मिसेस ट्रॉय स्वतःच करतील. केव्हां जायचंय तिथं ? तीन वाजतां ना ? ठीक आहे. आपली निळ्या रंगाची, तांबड्या चाकांची नवी गाडी चांगली धुवून पुसून घेऊन जा. शवपेटिकेच्या भोंवतालीं पत्री आणि फुलें जितकीं मिळतील तितकीं मिळवून रचून ठेव. आपला प्लेझंट नांवाचा म्हातारा घोडा फॅनीच्या चांगला ओळखीचा होता. त्यालाच ओढूं दे तिची गाडी. किती दिवस होती फॅनी त्या अनाथाश्रमांत ? "

जोसेफ म्हणाला, " एक दोन दिवस. प्रथम ती एका लष्करी छावणीच्या शहरांत रहायला गेली. नंतर ती मेलचेस्टर शहरांत एका विधवा

स्त्रीच्या घरीं शिवणकाम करून पोट भरूं लागली. मेलचेस्टरपासून कॅस्टरब्रिज-पर्यंत पार्यांच चालत गेली ती. अशी तिची थोडक्यांत हकिकत आहे."

एकाएकी बाथशीबाच्या चेहऱ्यावरील लालसर रंग नाहींसा होऊन तो पांढरा फटफटीत पडला. तिनें उत्सुक, अस्वस्थ स्वरांत प्रश्न केला, " आपल्याच टोल नाक्याच्या रस्त्यानं गेली कां ती ? "

" होय, मला वाटतं तिथूनच गेली ती " जोसेफ म्हणाला. " बाईसाहेब, लिडीला बोलवूं कां मी ! तुमचा चेहरा अगदीं पांढरा पडला आहे. बरं वाटत नाहीं कां तुम्हाला ? "

बाथशीबानें उत्तर दिलें, " नको, तिला बोलवूं नको. "

" केव्हां गेली ती वेदरबरींवरून ? "

—" गेल्या शनिवारीं रात्रीं. "

—" ठीक आहे. जोसेफ जा तूं. "

एका तासानंतर चांगले कपडे घालून, फुलझाडांनीं—आणि फुलांनीं सजविलेली गाडी घेऊन जोसेफ कॅस्टरब्रिजकडे निघून गेला.

बाथशीबा उदास मनस्थितींतच घरांत गेली. संध्याकाळीं तिनें लिडीला विचारलें, " फॅनी रॉबिनच्या ' केसांचा रंग कोणता होता ग ? "

' मला आठवत नाहीं. मी तिला फक्त एक दोन दिवसच पाहिली होती. "

लिडी म्हणाली, " तिचे केस मोकळे असतांना मी पाहिले होते. फार सुंदर दिसत ते. ते अस्सल सोनेरी रंगाचे होते. "

" तिचा प्रियकर एक शिपाईगडी होता. नाहीं ? "

— "होय. मिस्टर ट्रॉय यांच्या फलटणींतच होता तो. आपली त्या शिपाईगड्याशीं चांगली ओळख आहे असें म्हणत होते मि. ट्रॉय

ते आणखीहि म्हणाले, ' तो मनुष्य आणि मी इतके सारखे दिसतों कीं, लोकांच्या मनांत ' हा ' कीं, ' तो ' ? असा घोंटाळा उडतो ! ' "

हे शब्द ऐकून बाथशीबा एकदम चिडली आणि उद्गारली, —" लिडी ! पुरे कर बाई तुझी बडबड ! "



## ४२. " आम्ही जातों अमच्या गांवा । अमुचा रामराम घ्यावा ॥ "



स्टरब्रिजच्या अनाथाश्रमाभोंवतीं एक भिंत बांधलेली होती. एका बाजूच्या चांदईच्या भागांत एकहि खिडकी नसून जमिनीपासून सुमारें चार फूट उंचीवर एक लहानसें दार मात्र होतें. हें दार इतक्या उंच कां असावें याबद्दल प्रथम पहाणाऱ्याला प्रश्नच पडे. पण भिंतीजवळ असलेल्या चाकांच्या खुणा पाहिल्यावर मात्र लक्षांत येई कीं, दाराबाहेर उभ्या असलेल्या गाडींतून सामानाची आणि मनुष्यांची ने-आण करण्यासाठीं या दाराचा उपयोग होत असावा. असे व्यवहार तुरळकच होत असत हें त्या दाराच्या उंबऱ्याच्या फटींतून वाढलेल्या गवतावरून दिसून येत होतें.

तीन वाजण्यास पांच मिनिटें कमी असतांनाच एक निळया रंगाची, पाना-फुलांनीं सजविलेली गाडी या दाराजवळ येऊन उभी राहिली. जोसेफनें दाराची घंटा वाजविल्यावर त्याला आपली गाडी त्या दाराशीं नेण्याची सूचना मिळाली. तें दार उघडलें आणि एक साधी लांकडी शवपेटिका त्यांतून हळू हळू बाहेर आली. दोन माणसांनीं ती गाडींत नीट ठेविली.

मग एका मनुष्यानें खिशांतून खडूचा तुकडा काढून त्या पेटीवर आंतील व्यक्तीचें नांव व इतर कांहीं शब्द मोठ्या अक्षरांत लिहिले. त्या पेटीवर एक जुनें काळें कापड घातलें. गाडीची मागची फळी लावून, त्या मनुष्यानें फॅनीविषयींचा नोंदणीपुस्तकांतील उतारा पुअरग्रासच्या हातांत दिला आणि त्यांनीं आत जाऊन दार लावून घेतलें. फॅनीचा आणि त्यांचा अल्पकालीन ऋणानुबंध कायमचा संपला होता.

जोसेफनें त्या शवपेटिकेच्या भोंवतालची पत्री, फुलें नीटपणें रचून ठेविलीं. गाडींत काय आहे हेंहि त्यामुळें नीटसें दिसत नव्हतें. त्यानें चाबूक फडकावला आणि ही प्रेतवाहक गाडी वेदरबरीच्या रस्त्यानें पुढें निघाली.

संध्याकाळ होत चालली होती. जोसेफ गाडीच्या बाजूनें जवळून पायींच चालला होता. हळू हळू धुकें पडूं लागलें. यालबरीच्या जंगलांत तो येऊन पोहोंचला तेव्हां सर्वत्र दाट धुकें पसरून समोर कांहींच दिसेनासें झालें. भोंवतालच्या झाडांवर देखील दाट धुकें पसरल्यानें पानांवरून त्याचे थेंब पाघळून खालीं पडूं लागले.

रस्त्याच्या बाजूला, जंगलाच्या तोंडाशींच 'रॉय टाउन' नांवाचें एक लहानसें खेडें असून तेथें Buck's Head—( मृगशीर्ष ) नांवाचा एक पथिकाश्रम होता. वेदरबरीपासून ही जागा दीड मैलावर होती. रस्त्याच्या समोरच्या बाजूला एक मोठें झाड असून त्याच्या फांदीवर पथिकाश्रमाची पाटी लटकावलेली होती. गॅब्रिएल ओक पहिल्यानें वेदरबरीला आला तेव्हां या झाडाजवळच उभा असलेला छकडा त्याला दिसला होता. ही ओळखीची पाटी नजरेच्या टप्प्यांत आल्यावर जोसेफला फार बरें वाटलें. त्याला अगदीं दमल्यासारखें वाटत होतें. झाडाजवळील हिरव्या गवताकडे घोड्याचे तोंड वळवून तो एक ग्लास घेण्यासाठीं पथिकाश्रमांत शिरला. तिथेंच जॉन कोगन् आणि मार्क क्लार्क हे त्याचे दोन सहकारी त्याला दिसले. त्या दोघांनीं खूप आग्रह करून जोसेफला दारू पाजली आणि अशा रीतीनें ते सारे बराच वेळ तेथेंच पेल्यामागून पेले फस्त

करीत बसले. बाहेर फॅनीचें प्रेत पेटींत पडून राहिलें होतें. पण एकदां मनुष्य मेल्यावर, त्याला पुरण्याला थोडा उशीर झाला तर काय बिघडतें ! आपल्याला थोडी सवड आहे तोंवर आपण थोडी मौज कां करून घेऊं नये असा त्यांच्या गप्पागोष्टींचा आशय होता. गप्पा आणि दारूचे पेले यांत हे लोक रंगून गेले होते आणि तासामागून तास उलटून जात होते.

फार उशीर झालेला पाहून जोसेफच्या शोधासाठीं गॅब्रिएल ओक स्वतः तेथें आला आणि बाहेर असलेली गाडी घेऊन वेदरबरीला येऊन पोंहोंचला. तोपर्यंत अंधार पडला होता.

हळूं हळूं खेड्यांत सगळीकडे बातमी पसरली कीं मूठमाती देण्यासाठीं फॅनीचा मृत देह वेदरबरीमध्यें आणण्यांत येत आहे. परन्तु बोल्डवुडचा संकोच आणि ओकची उदार वृत्ति यामुळें ट्रॉय हाच फॅनीचा प्रियकर होता ही गोष्ट निश्चितपणें कोणालाहि कळली नव्हती. फॅनीची उत्तरक्रिया आटोपून कांहीं काळ लोटेपर्यन्त ही बातमी बाथशीबाच्या कानीं जाऊं नये अशी गॅब्रिएलची इच्छा होती.

चर्चजवळ गाडी येते तों तेथील धर्मगुरु गॅब्रिएलला वाटेंतच भेटला आणि म्हणाला, " आतां फार उशीर झाला आहे. उत्तरक्रिया नीटपणें उरकणार नाहीं. सर्टिफिकिट आणलंत का तुम्ही तिचं ? "

गॅब्रिएल म्हणाला, " नाहीं. मला वाटतं तें पुअरग्रास-जवळच राहिलं "

धर्मगुरु म्हणाला, " मग ठरलंच. उद्यां सकाळपर्यंत उत्तरक्रियेचा विधि पुढें ढकलायला हवा." या बाबतींत आपल्या मालकिणीची इच्छा काय आहे हें समजून घेण्यासाठीं ओक आंत गेला. प्रेत घेऊन चर्चमध्यें जावें या गॅब्रिएलच्या सूचनेला प्रथम तिनें निष्काळजीपणानें रुकार दिला. पण गॅब्रिएलबरोबर फाटकापर्यंत आल्यावर मग मात्र फॅनीला घरांतच घेऊन येण्याची तिनें इच्छा प्रदर्शित केली. बरोबर अस-

लेला धर्मगुरु म्हणाला, " ठीक आहे. उद्यां सकाळीं लवकरच उत्तरक्रियेची व्यवस्था करतों मी. "

गॅब्रिएलच्या डोळ्यांतून एक अश्रू ओघळला. बाथशीबा मात्र शांतपणें उभी होती. गॅब्रिएलनें कंदील पेटविला आणि तीन मदतनीस बोलावून बाथशीबाच्या सूचनेप्रमाणें त्या चौघांनीं ती शवपेटिका एका लहान खोलींत, दोन बाकांवर आडवी ठेविली. ओकखेरीज सारे त्यां खोलींतून निघून गेले. या साऱ्या प्रकारांतील भयंकर सत्य उघडकीला आल्यावर बाथशीबाच्या जीवनावर दुःखाची केवढी छाया पसरेल हाच विचार ओकच्या मनांत घोळत होता.

निदान लगेच होणाऱ्या एका यातनेपासून बाथशीबाचें संरक्षण करावें म्हणून शवपेटिकेच्या झांकणावरील खडूनें लिहिलेल्या अक्षरांकडे त्यानें पुनः नजर टाकली. तेथें हीं साधीं अक्षरें लिहिलीं होतीं. '**फॅनी रॉबिन आणि तिचें मूल.**' गॅब्रिएलनें आपला रुमाल काढून शेवटचीं अक्षरें काळजीनें पुसून टाकून '**फॅनी रॉबिन**' एवढेच शब्द कायम ठेवले आणि मग पुढल्या दारानें तो मुकाट्यानें बाहेर पडला.



## ४३ " अखेर झाली बाले ! हा घे, प्रणाम जातां जातां ! "



त्या दिवशीं रात्रीं बऱ्याच उशीरानें लिडीनें बाथशीबाला प्रश्न केला, " माझं आणखी कांहीं काम आहे कां बाईसाहेब ? "

बाथशीबा म्हणाली, " आज रात्रीं कांहीं नाहीं. तूं जा झोंपायला. बारा वाजेपर्यंत मी मालकांची वाट पहातें नाहींतर मग मीहि झोंपायला जाईन. "

लिडी बाहेर निघून गेली, पण पांच दहा मिनिटांनीं दारावर टकटक असा आवाज आला आणि ती पुन्हां आंत येऊन जरा घुटमळत उभी राहिली. शेवटीं ती म्हणाली, " मेरी ॲनच्या कानावर कांहीं चमत्कारिक बातमी आलीय्. बापड्या फॅनीबद्दल आहे ती. बेदरबरींत गेल्या तासभरात बातमी पसरली आहे कीं......"

फॅनीचें शव असलेल्या खोलीकडे डोकें वाकवून त्या बातमीचा पुढील भाग लिडीनें बाथशीबाच्या कानात सांगितला.

बाथशीबा नखशिखांत थरथरली. भावनाकुल होऊन ती म्हणाली, " माझा नाहीं विश्वास बसत याच्यावर. पेटीच्या झांकणावर तर एकच नांव लिहिलेलं आहे. "

लिडी म्हणाली, " मला तसंच वाटतं. कारण तें खरं असतं तर आम्हाला कळलं असतंच त्याबद्दल."

लिडीला आपला चेहरा दिसूं नये म्हणून बाथशीबा मान वळवून शेकोटींतील विस्तवाकडे पहात होती. ती बोलत नाहीं असें पाहून लिडी हळूच खोलींतून बाहेर पडली आणि तिनें दार लावून घेतलें.

फॅनीचा मृत देह ज्या खोलींत ठेवला होता तिकडे पहात बाथशीबा भावनाकुल होऊन म्हणाली, " फॅनी! माझ्याशीं बोल ग! तुझं रहस्य सांग ना मला! या पेटींत तुम्ही दोघं आहांत ही गोष्ट खरी नाहीं अशी आशा वाटते मला एक क्षणभर तुझ्याकडे नजर टाकतां आली तर सारं कांहीं कळेल. "

—आणि कांहीं क्षण गेल्यावर ती हळूंच म्हणाली, " आणि मी तसें करीनच. "

त्या संस्मरणीय संध्याकाळीं आपण कोणत्या मनःस्थितींत यानंतरच्या साऱ्या गोष्टी केल्या हें बाथशीबाला नीटसें आठवत नसे. अडगळीच्या खोलींत जाऊन तिनें एक स्क्रू-ड्रायव्हर आणला. थोड्याच वेळानें ती फॅनीच्या उघड्या शवपेटिकेपुढें थरथरत उभी राहिली होती. तिच्या डोळ्यांपुढें अंधेरी आली होती आणि डोक्यांत कांहींतरी धाडधाड उडत आहे असें वाटत होतें. त्या पेटींत नजर टाकून ती घोगऱ्या आवाजांत म्हणाली, " वाइटांत वाईट काय आहे तें एकदां समजलं म्हणजे बरं असतं आणि तें कळून आलं आहे आतां मला." ती शवपेटिका उघडण्याची सर्व क्रिया तिनें एकाद्या स्वप्नवत् स्थितींतच केली. त्याआधीं मोलकरणी झोंपल्या आहेत कीं नाहीं, याचा कानोसा घेतला आणि मग खालीं येऊन ती पेटी लक्षपूर्वक उघडण्यास सुरवात केली. याआधीं, रात्रीच्या वेळीं, एकट्यानें आपल्याला असें काम करावयाचें आहे अशी कल्पना जरी तिला आली असती तरी त्यामुळें ती भेदरून गेली असती. पण आतां तें काम करून झाल्यावर तिला तें तितकें भयंकर वाटलें नाहीं. फॅनीच्या जीवनकथेची अखेर आणि आपल्या पतीच्या वर्तनाचा निश्चित पुरावा दृश्य स्वरूपांत तिच्यापुढें पडला होता. तो मात्र या सर्व प्रकारापेक्षांहि अधिक भयंकर होता.

शवपेटिकेंतील तें दृश्य पाहून बाथशीबाची मान अगदीं खालीं लवली. आतांपर्यंत तिनें कोंडून धरलेला श्वास एका निःश्वासाच्या रूपानें बाहेर पडला. शवपेटिकेंत निश्चेष्ट पडलेल्या त्या दोन देहांवर बाथशीबाचे अश्रू टपटप पडत होते.

फॅनीच्या चेहऱ्याभोंवतालीं तिचे सोनेरी केंस मेहरपीसारखे पसरले होते. ट्रॉयजवळ असलेली केंसांची बट कोणाची याबद्दल आतां फारशी शंका उरली नव्हती. त्या निष्पाप पांढऱ्या फटक चेहऱ्याकडे पहात असतां बाथशीबाला वाटूं लागलें कीं, ' जणूं आपण सहन केलेल्या यातनांचा वचपाच आपण काढीत आहोंत ' अशी विजयाची अंधुक छटा फॅनीच्या चेहऱ्यावर खेळत आहे.

तिनें शवपेटिकेजवळ गुडघे टेकून, आपला चेहरा हातानें झाकून घेतला आणि परमेश्वराची प्रार्थना केली. बाथशीबा उठून उभी राहिली तेव्हा तिचें मन शांत झालें होतें आणि मघाशी तिच्या मनांत ज्या शत्रुत्वाच्या भावना आल्या त्याबद्दल तिला पश्चात्ताप वाटूं लागला.

खिडकींतल्या फुलदाणींतून फुलें घेऊन तिनें तीं त्या मुलीच्या डोक्याभोंवतीं नीट रचून ठेविलीं. या कामांत किती वेळ गेला हें तिला कळलें नाहीं. अंगणांत तबेल्याचें दार लावल्याचा आवाज आला. क्षणानंतर पुढलें दार उघडलें, बंद झालें, आणि ट्रॉय खोलीचें दार उघडून तिच्याकडे पहात येऊन उभा राहिला.

एखाद्या मांत्रिकानें निर्माण केलेल्या मायावी दृश्याकडे पहावें अशा रीतीनें आश्चर्यमूढ होऊन ट्रॉय समोरच्या दृश्याकडे पहात होता. प्रेता-सारखी फटफटीत पडलेली बाथशीबा त्याच्याकडे तशाच नजरेनें पहात होती. ट्रॉय म्हणाला, " हें झालं तरी काय ? कोण मेलं आहे ? "

बाथशीबा म्हणाली, " मला नाहीं सांगतां येत—जाऊं द्या मला ! " त्याला ढकलून ती दारांतून बाहेर जाऊं पहात होती. ट्रॉयनें तिचा हात धरून तिला पुढें ओढलें. तिचा हात धरून तो म्हणाला, " तूं थांबलंच पाहिजे. " ट्रॉय आणि बाथशीबा शवपेटिकेजवळ येऊन ठेपले. जवळच्या टेबलावर एक मेणबत्ती जळत होती. तिचा उजेड पेटींतील आई आणि मुलावर तिरपा येऊन ते गार पडलेले चेहरे उजळून निघाले होते. ट्रॉयनें आंत नजर टाकली आणि आपल्या पत्नीचा हात सोडून दिला. हा सारा भयंकर प्रकार काय आहे याची पूर्ण कल्पना येऊन तो दगडासारखा उभा राहिला.

बाथशीबानें क्षीण आवाजांत प्रश्न केला, " तुमच्या ओळखीची आहे का ही ? "

ट्रॉयनें उत्तर दिलें, " होय. "

--"हीच कां ती ?"

--"हीच ती."

हळूं हळूं ट्रॉयचा चेहरा निराशापूर्ण आणि शोकाकुल झाला आणि त्यानें गुडघे टेकले. आदर आणि पश्चात्ताप ह्या भावनांनीं भारावून तो खालीं वांकला. एखादें झोंपीं गेलेलें मूल जागें होऊ नये म्हणून त्याचें हळुवारपणें चुंबन घ्यावें तसें त्यानें फॅनीचें चुंबन घेतलें.

बाथशीबाच्या सर्व भावना एकत्रित होऊन एकदम उफाळून आल्या. यापूर्वीच्या सर्व गोष्टींचा तिला विसर पडला. एका पत्नीचें पतीविषयीं प्रेम एवढीच भावना या वेळीं तिच्या हृदयात शिल्लक होती. ट्रॉयच्या गळ्याभोंवतीं आपले हात टाकून ती अगदीं मनापासून म्हणाली, "फ्रँक! नका! नका तिचे चुंबन घेऊं! मला तें सहन होत नाहीं हो! तिच्यापेक्षां माझंच तुमच्यावर अधिक प्रेम आहे. फ्रँक! माझंच चुबन घेतलं पाहिजे तुम्ही." एखाद्या लहान मुलासारखीं ती दुःखानें विव्हल झाली होती आणि अगदीं भाबडेपणानें विनवीत होती. ट्रॉयनें गळ्याभोंवताळचे तिचे गुंतलेले हात सोडवून अगदीं गोंधळून तिच्याकडे पाहिलें. साऱ्या स्त्रियांच्या हृदयांतल्या भावना एकच असतात. मग त्या वरून कितीहि निराळ्या दिसत असोत; हें सत्य ट्रॉयला इतक्या अनपेक्षितपणें कळलें कीं आपली स्वाभिमानी पत्नी बाथशीबा तीं हीच, यावर त्याचा विश्वासहि बसेना. हें क्षणिक आश्चर्य ओसरल्यावर तो तिला दरडावून म्हणाला, " मी तुझं चुंबन घेणार नाहीं " असें म्हणून त्यानें तिला दूर ढकलून दिलें.

तिनें आपल्या भावना आवरण्याचा प्रयत्न करीत त्याला प्रश्न केला, " तुमच्या आचरणाबद्दल तरी काय म्हणायचंय् तुम्हाला ?"

ट्रॉयनें उत्तर दिलें, " मला एवढंच सांगायचंय् कीं मी एक वाईट, दुष्ट हृदयाचा मनुष्य आहे. "

"आणि ही स्त्री तुम्हाला बळी पडली. माझीहि गत तिच्याहून कांहीं अधिक बरी नाहीं." बाथशीबा म्हणाली.

ट्रॉय उसळून म्हणाला, "बाईसाहेब, उगीच हिणवूं नका मला. ही स्त्री आज मरून पडली असली तरी ती मला तुझ्यापेक्षां अधिक मोलाची आहे. मागंहि कधीं मला तुझ्याबद्दल प्रेम वाटलं नाहीं, आज वाटत नाहीं आणि पुढेहि वाटणार नाहीं. तुझा सुंदर चेहरा आणि तुझे नखरे माझ्यासमोर आणून सैतानानं मला भुरळ घातली नसती तर मी तिच्याशींच लग्न केलं असतं. तूं माझ्या मार्गांआड येईपर्यंत माझ्या मनांत दुसरा विचार नव्हता. मी तिच्याशीं लग्न केलं असतं तर फार बरं झालं असतं. पण आतां फार उशीर होऊन गेला. या साऱ्या प्रकाराबद्दल होतील त्या यातना मला सोसायलाच हव्यात."

आणि मग फॅनीकडे वळून तो म्हणाला, "लाडके ! काहीं हरकत नाहीं. परमेश्वराच्या दृष्टींनं तूंच माझी खरी धर्मपत्नी आहेस."

ट्रॉयचे हे शब्द ऐकल्यावर बाथशीबाच्या तोंडून अथांग निराशेचा, रागाचा आणि दुःखाचा एक दीर्घ हुंकार बाहेर पडला. ती आणि ट्रॉय यांच्या संबंधाचीं अखेरच त्यानें सूचित होत होती. अगदीं करुणास्पद अवस्थेत हुंदके देत ती म्हणाली, "ती तुमची धर्मपत्नी असली तर मग मी कोण आहे तुमची ?"

ट्रॉय हृदयशून्यपणें म्हणाला, "तूं माझी कोणीच नव्हेस ! धर्मगुरूसमोर एखादा धार्मिक विधि केला म्हणजे कांहीं खरं लग्न होत नाहीं. नैतिक दृष्ट्या मी तुझा कोणी नाहीं. !"

ट्रॉयजवळून या जागेपासून दूर पळून जावें, लपून बसावें, अगदीं मृत्यू आला तरी बेहत्तर, पण त्याचे शब्द पुनः आपल्या कानीं येऊं नयेत अशी बाथशीबाला तीव्र इच्छा झाली. क्षणभरहि तेथें न थांबतां, ती दाराकडे वळून बाहेर धांवत गेली.

## ४४. " मी नवबाला जोगिण बनलें ! "



त्या अंधाऱ्या रस्त्यानें आपण कुठें जात आहोंत हें न कळतां बाथशीबा बेफिकीरपणें पुढें चालली होती. ओक आणि बीच झाडांच्या एका गर्द राईत ती येऊन पोंचली. वाळून चाललेल्या नेच्यांचें एक दाट बेट तेथें उगवलें होतें. तेथें एका झाडाच्या खोडाचा आडोसा करून ती आडवी झाली. त्या वाळलेल्या वनस्पती तिनें अंगावर ओढून घेतल्या आणि डोळे मिटले. त्या रात्रीं आपल्याला झोंप लागली होती कीं नाहीं, हें बाथशीबाला नीटसें कळलें नाहीं. पण बऱ्याच वेळानंतर तिचें डोकें शांत झालें आणि भोंवतालच्या परिस्थितीची तिला जाणीव झाली. झाडावरून, भोंवतालच्या प्रदेशातून नाना तऱ्हेचे आवाज तिच्या कांनीं येऊं लागले. पक्ष्यांचे, खारींचे आवाज तिच्या कानीं पडले. मधूनच शेतावरचा एक मुलगा घोड्याला पाणी दाखविण्यासाठीं तेथें येऊन गेला. तिनें भोंवतालीं पाहिलें तर नुकतेंच फटफटलें होतें. तिच्या अंगाला, डोक्याला, लाल, पिवळीं पानें चिकटलीं होतीं. तिनें कपडे झटकल्यावर तीं सारीं पानें वाऱ्यावर उधळलीं गेलीं. बाथशीबा झोंपली होती त्या जागेच्या पलीकडेच एक दलदल पसरली असून त्या चिखलांत हिरवीं, केशरी, पिवळीं छत्रकें उगवलीं होतीं. जवळच्या रस्त्यावरून एक मुलगा आपला धडा घोकीत शाळेकडे निघाला होता.

कांहीं वेळानें तिला दुरून एक स्त्रीची आकृति जवळ येतांना दिसूं लागली. ती तिची मोलकरीण लिडी होती. बाथशीबाला पाहिल्यावर ती उद्‌गारली, " फार बरं झालं तुम्ही सांपडलांत ! "

बाथशीबानें विचारलें, " ते घरीं आहेत कां ! "

" नाहीं. मी बाहेर पडायच्या आधींच ते निघून गेले. "

" फॅनीला नेऊं का ? "

" नाहीं. नऊ वाजतां नेतील तिला. "

" मग सध्या आपण घरीं न जातां या झाडींतच फिरूं."

लिडी म्हणाली, " तुम्ही घरांत चला आणि थोडा फराळ करा. अशानं सर्दी होऊन प्राण जायचा. "

बाथशीबा उत्तरली, " मी घरांत येणार नाहीं इतक्यात—कदाचित् कधींच येणार नाहीं. "

—तुम्हांला कांहीं खायला घेऊन येऊं का ? पांघरायला आणूं कां ? "

" आण हवं तर " एवढंच बाथशीबा विरक्तपणें म्हणाली.

लिडी निघून गेली आणि थोड्या वेळानें तिचे कपडे आणि न्याहारी घेऊन आली. न्याहारी आटोपल्यावर बाथशीबाच्या तोंडावर थोडी लाली आली. यापुढें काय करावें याबद्दल ती विचार करीत होती. अखेर ती लिडीला म्हणाली, " सकाळभर विचार करून माझा मार्ग मी निश्चित केला आहे. घर सोडून पळून गेलेली पत्नी साऱ्यांनाच नकोशी होते. घरीं राहून अपमान, आणि उपासमार सहन करण्यापेक्षांहि अशा स्त्रीची स्थिति अधिक वाईट. लिडी ! जर तूं लग्न केलंस तर एवढं लक्षांत ठेव. अंगाचे तुकडे तुकडे झाले तरी बेहत्तर पण आपलं घर सोडूं नकोस. "

बाथशीबाचा हात हातांत घेऊन लिडी म्हणाली, " नका हो बोलूं अशा ! मला माहितंच होतं कीं तुमच्यासारखी शहाणी बाई पळून जाणार नाहीं कुठें. "

दहा मिनिटांनंतर एका लांबच्या रस्त्यानें त्या दोघी घरीं येऊन, मागच्या जिन्यानें थेट वरच्या माळ्याकडे गेल्या. बाथशीबाचें हृदय आतां थोडें हलकें झालें होतें. कारण तारुण्य आणि आशा यांचा प्रभाव पुनः तिच्यावर पडूं लागला होता.

ती म्हणाली, " सध्यां माझ्या विश्वासांतील मैत्रीण तूंच. या माळ्यांतच सध्या मी एकटी रहाणार आहे. आतां इथली शेकोटी पेटीव. जमिनीवर कांहींतरी अंथर. टेबल, एक छोटी खाट, अंथरूण-पांघरूण घेऊन ये खालून. " वेळ जाण्यासाठीं काय करावें याबद्दल उभयतांत चर्चा होऊन अखेरीस वाचनात वेळ घालविण्याचें बाथशीबानें ठरविलें. आपल्या स्थितीला अनुरूप अशीं कोणतीं पुस्तकें तिच्या काकाच्या ग्रंथसंग्रहांतून आणावयाचीं त्याचीं नांवें बाथशीबानें लिडीला सांगितलीं.

तो सारा दिवस बाथशीबानें बंद दाराआड, वेड्याच्या स्थितींत काढला. पण इतकी खबरदारी घेण्याचें कांहीं कारणच नव्हतें. ट्रॉय जवळपास कोठेंच फिरकला नाहीं आणि त्यानें त्यांना त्रासहि दिला नाहीं. संध्याकाळपर्यंत बाथशीबा खिडकीशीं बसली होती. तेथून चर्चच्या मनोऱ्याची पश्चिम बाजू तिला दुरून दिसत असे. संध्याकाळीं सहा वाजता खेड्यांतलीं तरुण पोरें मोकळ्यावर खेळण्यासाठीं जमा झालीं होतीं. एकाएकीं सारे खेळाडू एका भिंतीवरून उड्या टाकून झाडाआड निघून गेले. त्याच वेळीं लिडी आत आली असता बाथशीबानें विचारलें, " खेळ अर्धाच टाकून हीं पोरं कां निघून गेली ! "

लिडी म्हणाली, " कॅस्टरब्रिजमधून दोन इसम आले आणि एक भव्य नक्षीदार शिलालेख स्मशानांतल्या कबरीवर बसवूं लागले. तो कोणाचा, हें पहाण्यासाठीं ते सारे गेले. "

बाथशीबानें विचारलें, " तो शिलालेख कोणाचा तें माहीत आहे तुला ? "

लिडी म्हणाली, " मला माहीत नाहीं. "



## ४५. " जिवंत असतां देतीं लत्ता । मेल्यावरतीं घेतीं माथां "



थशीबा मध्यरात्रीं घर सोडून गेल्यावर ट्रॉयनें मृत फॅनीचा देह झांकून टाकला. खालीं येऊन सकाळ होईपर्यन्त तो तसाच अंथरुणावर पडून राहिला.

गेल्या चोवीस तासांत नशिबानें त्याला क्रूरपणें छळलें होतें. बाथशीबाजवळून घेतलेल्या वीस पौंडांत त्यानें स्वतःजवळ असलेली रक्कम घातली. ही सत्तावीस पौंड दहा शिलिंग रक्कम घेऊन फॅनी रॉबिनला ठरल्याप्रमाणें भेटण्यासाठीं तो आधल्या दिवशीं सकाळीं घाईघाईनें कॅस्टर-ब्रिजच्या पुलाकडे निघाला. दहा वाजण्यास पांच मिनिटें कमी असतांना तो पुलाच्या कठड्यावर येऊन बसला. दहाचे ठोके पडले तरी फॅनी तेथें आली नाहीं. (त्याच क्षणीं अनाथाश्रमांत दोन स्त्रिया तिच्या मृतदेहावर अखेरचा पोषाख चढवीत होत्या.) इकडे पंधरा मिनिटें झालीं, अर्धा तास उलटला, ट्रॉय तसाच वाट पहात होता. फॅनी ठरल्या वेळीं भेटीस आली नाहीं असा हा दुसरा प्रसंग होता. गतस्मृतींनीं त्याच्या मनांत गर्दी केली. रागारागानें त्यानें शपथ वाहिली कीं यानंतर तिच्याशीं पुनः अशी भेट ठरवायची नाहीं. अकरा वाजेपर्यन्त पुलाच्या दगडांकडे पहात तो तसाच बसला होता. अखेर गतगोष्टींबद्दल अगदीं उदासीन होऊन आणि भावी काळाबद्दल बेपर्वा होऊन अगदीं विटलेल्या मनःस्थितींत तो बडमाऊथ येथील शर्यतीच्या मैदानाकडे गाडींत बसून निघून गेला. तेथें तो दोन वाजतां पोंचला आणि रात्रीं नऊ वाजेपर्यन्त त्या शहरांत त्यानें वेळ काढला. परन्तु त्याला दिसलेली फॅनीची मूर्ति पुनः त्याच्या डोळ्यांपुढें येई. बाथशीबाची निर्भर्त्सना त्याला आठवे त्यामुळें आपण घोड्यावर पैसे लावायचे नाहींत असा त्यानें निश्चय केला.

तो घराकडे परत निघाला असतां प्रथमच त्याच्या मनांत विचार आला कीं कदाचित् खरोखरच फार आजारी असल्यामुळें फॅनलि ठरल्याप्रमाणें भेटीच्या वेळीं येतां आलें नसेल. नाहींपेक्षां या वेळीं तिनें अशी चूक केली नसती. कॅस्टरब्रिजमध्यें थांबून आपण नीट चौकशी केली नाहीं याचें त्याला राहून राहून वाईट वाटत होतें. घरीं येऊन घोड्यावरील जीन काढून तो हळूच आत आला आणि आल्यावर त्याला तें भयंकर धक्का देणारें दृश्य दिसलें होतें.

भल्या पहांटेस ट्रॉय अंथरुणावरून उठला. बाथशीबा कुठें असेल याबद्दल आणि तिच्या अस्तित्वाबद्दलहि तो बेफिकीरच होता. अशाच स्थितींत मागील दारानें बाहेर पडून स्मशानांतील नुकतीच खणलेली खांच त्यानें पाहून घेतली. ती जागा पाहून झाल्यावर तो घाईघाईनें कॅस्टरब्रिज येथें गेला. या शहरांत एका शिल्पकाराकडे जाऊन फॅनीच्या समाधीसाठीं शिलालेखाची तो चौकशी करूं लागला. जवळ असलेल्या सत्तावीस पौंडांच्या रकमेंत शक्य तितका चांगला संगमरवरी शिलालेखाचा दगड आणि त्याबरोबरची इतर सामुग्री त्याला हवी होती. त्या रकमेंत हें सारें काम करून देण्याचें आणि वेदरबरीच्या स्मशानांत ते फॅनीच्या कबरीवर नीटपणें बसवून देण्याचें त्या शिल्पकारानें कबूल केलें. ट्रॉयनें सारी रक्कम ताबडतोब चुकती केली, शिलालेखावर कोरावयाचा मजकूर लिहून दिला आणि तो तेथून निघून गेला.

कॅस्टरब्रिजमधून एक जडशी टोपली हातांत घेऊन अंधार पडण्याचा सुमारास ट्रॉय बाहेर पडला. वेदरबरीच्या वाटेवर शिलालेख बसवून परत चाललेली गाडी त्याला भेटली. सारें काम पूर्ण झालें याची खात्री करून घेऊन तो पुढें निघाला आणि वेदरबरीच्या स्मशानांत रात्रीं दहा वाजतां येऊन पोंचला. सकाळीं पाहिलेल्या कबरीच्या जागेकडे तो लगेच गेला. ती जागा चर्चच्या मनोऱ्यापलीकडे असून रस्त्यावरून नीटशी दिसत नसे. कबरीच्या डोक्याशीं आणि पायथ्याशीं पांढरे शुभ्र संगमरवरी दगड असून चारी बाजूंना संगमरवरी किनार लावलेली होती. मध्यभागीं फुलझाडें लावण्या-

जोगा एक मातीचा उंचवटा होता. शिलालेखावरील मजकूर वाचून ट्रॉयनें आपल्या टोपलींतून अनेक प्रकारचीं फुलझाडें बाहेर काढलीं. तीं सारीं त्यानें नीट ओळीनें साऱ्या कबरीवर नीटपणें मूळ धरतील अशा रीतीनें लावलीं. यापूर्वीच्या बेफिकीरपणाची भरपाई करण्यासाठीं पश्चात्तप्त मनःस्थितींत ट्रॉय या साऱ्या व्यर्थ क्रिया करीत होता. आपलें हें वागणें खुळचटपणाचें आहे, याची त्याला जाणीवहि नव्हती.

ती रात्र अत्यंत अंधारी असून आभाळांत सर्वत्र ढग जमले होते. सारें वातावरण कुंद झालें होतें. मधेंच एक मोठा पावसाचा थेंब त्याच्या हातावर पडला आणि त्यानंतर दुसरा एक थेंब कंदिलाच्या छिद्रांतून आंत जाऊन कंदिलांतील मेणबत्ती विझून गेली. ट्रॉय अगदीं थकला होता. आतां मध्यरात्रीचा सुमार झाला होता आणि पाऊस येण्याचीं चिन्हें दिसत होतीं. यामुळें उरलेलीं कामें सकाळीं उरकून टाकूं असा विचार करून तो चांचपडत चर्चच्या प्रवेशद्वाराच्या कमानीशीं येऊन पोंचला आणि आंत जाऊन एका बाकांवर झोंपी गेला.



## ४६. "पूजा उधळली"



वेदरबरी येथील चर्चचा चौकोनी मनोरा चौदाव्या शतकांत गॉथिक पद्धतीनें बांधलेला होता. त्याच्या चार बाजूंना दोन दोन अगदीं विचित्र आणि विद्रूप अशा आकाराचीं गोमुखें बसविलीं होतीं. त्यांतून सांचलेलें पाणी खालीं पडत असे. एखाद्या अगदीं विचित्र राक्षसानें आपल्या तोंडाच्या दोनही बाजूंत

बोटें घालून जबडा उघडावा असें एका गोमुखाचें स्वरूप होतें. या उघडलेल्या जबड्यांतून पाण्याचा लोट खालीं पडत असे.

ट्रॉय निद्रावश असतां बाहेर पावसाचा जोर वाढूं लागला. त्या गोमुखांतून प्रथम पाण्याची बारीक धार येऊं लागून हळूं हळूं त्यांतून पाण्याचा एक मोठा लोंढा सत्तर फूट खालीं कोसळूं लागला. हा पाण्याचा प्रवाह थेट फॅनीच्या कबरीवर येऊन पडत होता. गोमुखांतील पाणी त्या कबरीवर खूप जोरानें कोसळत होतें. त्यायोगानें वरची माती भिजून वाहूं लागली आणि उसळ्या मारूं लागली. अशा रीतीनें तेथें एक पाण्याचें डबकेंच तयार झालें आणि त्या पाण्याच्या घुमण्याचा आवाज भोंवतालीं पसरूं लागला. फॅनीच्या पश्चात्तप्त प्रियकरानें लावलेलीं फुलें हळू हळू मुळासकट हलू लागलीं आणि अखेर उलटीं होऊन पाण्यांत तरंगूं लागलीं.

चांगलें उजाडेपर्यंत ट्रॉयला जाग आली नाहीं. तो दोन दिवस अंथरुणात झोंपला नसल्याने त्याचें सारें अंग ताठरल्यासारखें झालें होतें. डोकें जड झालें होतें. एक फावडें घेऊन तो फॅनीच्या कबरीकडे गेला. आता पाऊस थांबला होता आणि हिरव्या झाडांच्या पानांतून सूर्यप्रकाश खालीं ओसडत होता. पाऊस पडून गेल्याने सारें वातावरण अगदीं स्फटिक-सारखें स्वच्छ झाले होतें. त्यामुळें जरा दूर असलेल्या दृश्याचे रंगहि जवळ असलेल्या रंगाइतकेच उठून दिसत होते. ट्रॉयला रस्त्यावर कांहीं फुलझाडांची मुळें दिसलीं. त्यानें लावलेले फुलझाडांचे कंदहि इकडे तिकडे पडलेले त्याला दिसूं लागले. कोंपऱ्यावर वळून ट्रॉय कबरीशीं येतो तों गोमुखातील लोंढ्यानें केलेली कबरीची वाताहात त्याच्या दृष्टीस पडली. कबरीवरील माती खालीं वाहून गेल्यानें मध्यभागीं एक खड्डा पडला होता आणि संगमरवरी शिलालेखावर मातीचे डाग पडले होते. सारीं फुलझाडें मुळासकट उपटलीं जाऊन, उलटीं सुलटीं होऊन भोंवतालीं पडलीं होतीं.

ट्रॉयची मुद्रा अगदीं दुःखीकष्टी झाली. त्यानें आपले दांत घट्ट रोवून एखादी तीव्र यातना होत असल्याप्रमाणें आपलें ओठ घट्ट

मिटून घेतले. या चमत्कारिक अपवातामुळें त्याच्या हृदयांत अत्यंत तीव्र अशा यातना होऊं लागल्या.

वाताहत झालेल्या या समाधीजवळ उभा असतां ट्रॅायला जीवनांत बहुधा प्रथमच स्वतःबद्दल तिरस्कार वाटू लागला. आतांपर्यन्त आपल्या जन्माची विचित्र परिस्थिति, स्थित्यंतरें, अनिश्चितपणा यांविषयीं त्यानें फारशी फिकीर केली नव्हती भविष्य काळांत केव्हां तरी या साऱ्या गोष्टी आपोआप नीट होतील आणि त्याचा शेवट गोड होईल अशी त्याला आशा वाटत होती परंतु आज सकाळीं त्याचें हें मृगजळ पूर्णपणें नष्ट झालें होतें. ट्रॅाय अत्यंत दुःखीकष्टी होऊन आतां कोठें जावें याचा विचार करूं लागला.

कबरीवरील पडलेला खड्डा भरून काढण्याचा किंवा तेथील फुलझाडें पुनः लावण्याचा त्यानें कांहींच प्रयत्न केला नाहीं. निराशेनें सारा पट उधळून तो स्मशानांतून बाहेर पडला आणि जसा आला होता तसाच गुप्तपणें तें खेडें सोडून गेला.

मध्यंतरीच्या काळांत बाथशीबा स्वेच्छेनेंच एखाद्या कैद्या-सारखी घरांत कोंडून रहात होती. त्या रात्रीं तिला नीटशी झोंप लागली नाहीं. चर्चच्या मागील स्मशानांत अपरात्रीं इकडे तिकडे वावरणारा कंदिलाचा प्रकाश मात्र तिला दिसला होता. सकाळीं आठ वाजतां लिडीनें दरवाज्यावर थाप मारल्यावर बाथशीबानें दार उघडलें. लिडीनें विचारलें, "रात्रीं चर्चच्या आवारांत कांहीं चमत्कारिक आवाज तुम्हाला ऐकूं आला कां ?"

बाथशीबा म्हणाली, "होय ! मनोऱ्यावरून पाण्याचा झोत खालीं कोसळल्याचा तो आवाज असावा."

लिडी म्हणाली, "गॅब्रिएल देखील असंच म्हणत होता. तेंच पहायला गेला आहे तो आतां !" न्याहारीनंतर लिडी म्हणाली, "फॅनीला कुठें पुरलें आहे तें पहायला यायचय् तुम्हाला ? झाडं आड आल्यानं ती जागा तुमच्या खिडकींतून दिसत नाही."

आपल्या पतीची कोठें तरी गांठ पडेल याची बाथशीबाला भीति वाटत होती. ती म्हणाली, "ट्रॉय रात्रीं आले होते कां घरांत ?"

लिडी उत्तरली, "नाहीं बाईसाहेब, मला वाटतं ते बडमाउथ गांवीं गेले असावेत. त्या गांवच्या रस्त्यानं जातांना लाबन टॉलला ते आज सकाळीं दिसले."

आधल्या दिवसाचा उदासपणा बाथशीबाच्या अंगांतून क्षणभर निघून गेला. बाहेर जाऊन थोडें फिरून यावें असें तिनें ठरविलें. न्याहारीनंतर नऊ वाजतां ती चर्चमागील फॅनीच्या समाधीकडे गेली. तेथील शिलालेखावर चिखल उडालेला होता ... दोन तासांपूर्वी ट्रॉयला तोच देखावा दिसला होता. दुसऱ्या बाजूला गॅब्रिएल शिलालेखाकडे टक लावून पहात होता. त्या दिशेनें पहात असतां शिलालेखावरील पुढील शब्द बाथशीबाच्या दृष्टीस पडले. **फ्रॅन्सिस ट्रॉय यानें फॅनी रॉबिन हिच्या प्रिय स्मृत्यर्थ हा शिलालेख बसविला.**

हा शिलालेख पाहून ओकला बरेंच आश्चर्य वाटलें होतें. तो पाहून बाथशीबाच्या मनावर काय परिणाम होतो यासाठीं ओक तिच्याकडे प्रश्नार्थक मुद्रेनें पहात होता. परन्तु अशा दृश्यांचा तिच्यावर फारसा परिणाम आतां होत नव्हता. भावनांचे आवेग तिच्या जीवनांत आतां नेहमींचेच होऊं लागले होते. तिनें शांतपणें समाधीवरील खड्डा मातीनें भरून काढण्यास ओकला सांगितलें. तेथील फुलझाडें गोळा करून ती स्वतः कबरीवर नीट कौशल्यानें लावूं लागली. चर्चच्या कार्यकर्त्यांना सांगून गोमुखीच्या तोंडाशीं असलेला शिशाचा नळा जरा बाजूला फिरवून घेण्याची व्यवस्था करण्यासहि तिनें ओकला सांगितलें. यामुळें पाण्याचा झोत तिरपा जाऊन पुनः पूर्वीसारखा अपघात टळणार होता. शिलालेखावरील शब्दांमुळें दुःख होण्याऐवजीं जणू काय आपल्याला ते आवडले आहेत अशा आविर्भावानें तिनें त्यावरील मातीचे डाग पुसून काढले आणि ती घरीं गेली.

— ० —

## ४७. " सागरीं प्राण तळमळला ! "



ट्रॉय दक्षिणेकडे भटकत चालला होता. शेतकऱ्याच्या कंटाळवाण्या जीवनाचा त्याला वीट आला होता. स्मशानांत पुरलेल्या प्रेयसीची उदास मुद्रा त्याच्या डोळ्यापुढें उभी होती. आणि आपल्या पत्नीच्या सहवासाबद्दल त्याच्या मनांत नावड उत्पन्न झाली होती. यामुळें एक बेदरबरी सोडून जगांत दुसरीकडे कुठेंहि जाऊन रहावें असें त्याला वाटूं लागलें होतें. भटकतां भटकतां दुपारीं तीनच्या सुमारास समुद्रकिनाऱ्याशीं समांतर असलेल्या एका टेकडीच्या उतारावर तो येऊन पोंचला. किनाऱ्यावर चिटपाखरूं दिसत नव्हतें. हवा कुंद आणि गरम अशी पडली होती. टेंकडीच्या टोंकावर उभें राहून त्यानें समुद्राकडे पाहिलें. खालीं उतरून किनाऱ्यावर आल्यावर त्याला थोडें ताजेतवानें वाटूं लागलें. पुढें जाण्याआधीं थोडी विश्रांति घ्यावी आणि स्नान करावें असा त्यानें विचार केला. तीरावर कपडे काढून ठेवून त्यानें पाण्यांत उडी मारली. किनाऱ्याजवळील समुद्राचें पाणी एखाद्या डबक्यांतील पाण्याप्रमाणें संथ असल्यानें पोहणाऱ्याला तेथें मौज वाटण्यासारखी नव्हती. समुद्राच्या लाटांची मौज अनुभवण्यासाठीं तो समुद्रांतून वर आलेल्या दोन खडकांतून खुल्या दर्यावर पोहत गेला. त्याच्या दुर्दैवानें त्याला अज्ञात असलेल्या एका प्रवाहांत सांपडून तो समुद्रावर अधिकाधिक दूर वहावत गेला.

त्यानंतर आतां या धोक्याच्या जागेच्या आणि त्यांत सांपडून बुडालेल्या लोकांच्या गोष्टी ट्रॉयला आठवूं लागल्या. त्याला वाटूं लागलें, या लोकांच्या संख्येंत कदाचित् आपलीहि भर पडेल. नजरेच्या टप्प्यांत एकहि होडी दिसत नव्हती. दूरवर बडमाउथचें बंदर जणूं काय त्याच्या धडपडीकडे

पहात किनाऱ्यावर पसरलेलें होतें. ट्रॉयला परिचित असलेले पटाईत पोहण्याचे सारे प्रकार त्यानें करून पाहिले. हळूं हळूं तो उजवीकडे असलेल्या जमिनीच्या एका सुळक्याकडे पोहत जात होता. तेवढ्यांत त्याच्या डोळ्यासमोर एक हलती वस्तू दिसूं लागली. ती जहाजाकडे निघालेली एक होडी असून तींत कांहीं तरुण खलाशी बसले होते. उजव्या हातानें पोहत राहून डावा हात वर करून ट्रॉयनें त्यांना खूण केली आणि मोठमोठ्यानें ओरडून त्यांना आपल्याजवळ बोलाविलें. मावळत्या सूर्याच्या किरणांत त्याचा गौरवर्ण देह त्या खलाशांना पूर्वदिशेला स्पष्टपणें दिसला. आपली होडी परत वळवून त्यांनीं त्याला होडींत उचलून घेतलें.

रात्र पडूं लागली होती. त्यांना आपल्या जहाजाकडे जाणें जरूर असल्यानें ती होडी तशीच जहाजाकडे निघाली. थंडीपासून संरक्षण होण्यासाठीं त्यांनीं ट्रॉयला कांहीं कपडे दिले आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं किनाऱ्यावर नेऊन उतरविण्याचें कबूल केलें.

समुद्रावर हळूं हळूं अंधार पसरला आणि जवळच्या अर्ध-चंद्राकृति किनाऱ्यावर मधून मधून दिव्यांचा पिवळा प्रकाश दिसूं लागला. समुद्रावरील निस्तब्ध शांततेंत होडीच्या वल्ह्यांचा आवाज तेवढा स्पष्टपणें ऐकूं येत होता. होडी हळूं हळूं पुढें चालली होती. तेवढ्यांत दुरून दिव्यांचे प्रकाश लाटांवर पडतांना दिसूं लागले आणि अखेर अस्पष्टपणें दिसणाऱ्या इतर जहाजांच्या समुदायांतून त्यांच्या जहाजाची आकृति त्यांच्यासमोर उभी राहिली.

## ४८, “ आहेस तूं जगीं हें—खोटें खरें न ठावें ”



यच्या गैरहजेरीचे दिवस वाढत चालले. बाथशीबाला थोडें आश्चर्य वाटलें आणि थोडें हायसेंहि वाटूं लागलें. पण या दोन्ही भावना अगदीं सामान्य स्वरूपाच्याच असून त्यांत विशेष तीव्रता नव्हती. तिचा पूर्वीचा तारुण्यसुलभ अभिमान अगदीं खालावला होता आणि त्याबरोबरच भावी कालाविषयींच्या तिच्या चिंताहि खालावत गेल्या होत्या. कारण चिंता करायची म्हणजे चांगली स्थिति आणि वाईट स्थिति असे दोन पर्याय समोर असावे लागतात; पण बाथशीबाच्या मनानें निश्चितपणें घेतलें होतें कीं आपल्यापुढें असे पर्याय उरलेच नाहींत; आज ना उद्यां ट्रॉय घरीं येणार हें ठरलेलें होतेंच.

त्यांत भर म्हणजे तिच्या शेताची खंडपट्टी लवकरच संपुष्टात येणार होती.

येत्या जानेवारींत खंड भरण्याच्या दिवशीं खंडाची रक्कम भरता आली नाहीं तर तिला कोणतीही सवलत मिळणार नव्हती. एकदां शेतीवाडी हातांतून गेली तर मग गरिबी येणार हें ठरलेलेंच होतें. आपल्या हातून झालेली चूक भयंकर आहे याची जाणीव झाल्यानें आतां काय अखेर होईल ती होवो असा विचार करून ती प्राप्त परिस्थितींत स्वस्थ बसली होती.

ट्रॉय निघून गेल्यानंतर आलेल्या पहिल्या शनिवारीं ती एकटीच कॅस्टरब्रिज येथें गेली. तिचें लग्न झाल्यानंतर आज प्रथमच ती तेथें पुनः जात होती. या शनिवारीं बाथशीबा तेथील खेडवळ व्यापाऱ्यांच्या घोळक्यातून हळू हळूं चालली होती. तिच्यामागून येणाऱ्या एका मनुष्यानें तिच्या डाव्या हाताला असलेल्या इसमाला कांहींतरी सांगितलें त्या मनुष्याकडे बाथशी-

बाची पाठ वळली असली तरी तिचे कान फार तिखट होते. तिनें खालील संभाषण स्पष्टपणें ऐकलें.

"मी मिसेस् ट्रॉय यांच्या शोधांत आहे. समोर दिसते तीच कां ती ?" तो इसम म्हणाला, "होय, मला वाटतं तीच ती बाई."

पहिला मनुष्य म्हणाला, "मला तिला थोडी अवघड बातमी द्यायची आहे. तिचा नवरा बुडून मेला आहे."

जणूं काय भविष्यवादी असल्याप्रमाणें बाथशीबा उद्गारली, "नाहीं, ते खरं असणं शक्य नाहीं." त्यानंतर तिला बोलतां आलें नाहीं, ऐकता आलें नाहीं. अलीकडेच तिनें स्वतःवर जो ताबा मिळविला होता तो या बातमीनें पूर्णपणें नाहींसा होऊन, भावनांच्या प्रबल आवेगानें तिची शुद्ध हरपली. तिच्या डोळ्यापुढें अंधेरी आली आणि तिचा तोल गेला.

—पण ती खालीं मात्र पडली नाहीं. जवळच असलेल्या धान्यबाजाराच्या कमानीतून एक उदास मुद्रेचा मनुष्य तिच्याकडे पहात होता. तिच्या तोंडून दुःखाचा उद्गार निघतांच तो चटकन तिच्याजवळ आला आणि ती खालीं पडण्यापूर्वीच त्यानें तिला आपल्या बाहूंत सांवरून धरलें. तो मनुष्य बोल्डवुडच होता. बाथशीबाला सांवरून त्यानें प्रश्न केला, "झालं तरी काय ?"

ती बातमी आणणाऱ्यानें उत्तर दिलें, "ललविंड किनाऱ्यावर पोहत असतां तिचा नवरा बुडून मेला. याच आठवड्यांत एका रखवालदारानें कालच त्याचे कपडे बडमाउथ येथें आणले आहेत."

ही बातमी ऐकून बोल्डवुडच्या डोळ्यांत एक विलक्षण तेज चमकूं लागलें आणि अनिर्वचनीय अशा भावनांच्या दाबलेल्या आवेगानें त्याचा चेहरा लाल झाला. साऱ्यांची नजर त्याच्यावर आणि बेशुद्ध पडलेल्या बाथशीबाकडे लागली होती. तिला उचलून तो 'किंगस् आर्मस् इन्'

या पथिकाश्रमांत घेऊन गेला. आपल्या बाहूंतील हा अमूल्य ठेवा त्यानें थोड्या अनिच्छेनेंच एका कोंचावर ठेवला. तेवढ्यांत तिनें आपले डोळे उघडले. झालेल्या सर्व प्रकाराची आठवण होऊन ती हलक्या आवाजांत पुटपुटली, " घरीं जायचंय मला. "

बोल्डवुडनें तिच्याकडे एक मोलकरीण पाठविली आणि आलेल्या बातमीची शहानिशा करण्यासाठीं तो बाहेर गेला. मध्यंतरीच्या काळांत बाथशीबानें ती बातमी आणणाऱ्या मनुष्याजवळून सारी माहिती काढून घेतली होती. बोल्डवुडनें घरीं जाण्यासाठीं तिला आपल्या गाडींत जागा देऊ केली पण त्याला नकार देऊन संध्याकाळच्या सुमारास ती स्वतःच्या गाडींतून घरीं पोहोंचली. ती येण्यापूर्वींच अर्धा तास ट्रॉयबद्दलची बातमी खेड्यांत येऊन पोंचली होती. लिडीनें प्रश्नार्थक मुद्रेनें आपल्या मालकिणीच्या चेहऱ्याकडे पाहिलें. परन्तु बाथशीबा कांहींच बोलली नाहीं.

रात्र पडल्यावर लिडी आंत आली आणि म्हणाली, " तुमच्या-साठीं कांहीं शोकदर्शक कपड्यांची व्यवस्था करायला हवी. "

बाथशीबा घाईनें म्हणाली, " छे छे तसं कांहीं नाहीं. सध्यां-तरी तशी जरुरी नाहीं. " " कां नाहीं बाईसाहेब ? " लिडीनें गोंधळून प्रश्न केला.

बाथशीबानें उत्तर दिलें, " कारण ते अजून जिवंत आहेत. "

आश्चर्यचकित होऊन लिडी म्हणाली, " तुम्हांला कसं कळलं हें ? "

बाथशीबानें उत्तर दिलें, " तें मला माहीत नाहीं ! पण तसं नसत तर लोकांना त्यांचा मृत देह सांपडला असता. मला अधिक तपशीलवार माहिती मिळाली असती. काय असेल तें असो, पण ते मृत्यु पावले असते तर सध्यांच्या परिस्थितीपेक्षा कांहींतरी निराळंच वाटलं असतं मला. माझी पक्की खात्री आहे कीं ते अजून जिवंत आहेत. "

सोमवारपर्यंत बाथशीबाला असेंच वाटत होतें. परन्तु त्या दिवशीं तिला धक्का देण्यासारखीं दोन कारणें पुढें आलीं. पहिली गोष्ट म्हणजे स्थानिक वर्तमानपत्रांत बडमाउथ येथील एक डॉक्टर मि. बार्कर यानें संपादकाला लिहिलेल्या एका पत्रांत आपण प्रत्यक्ष पाहिलेल्या त्या समुद्रावरील अपघाताचें वर्णन केलें होतें.

दुसरी घटना म्हणजे ट्रॉयचे कपडे घरीं येणें. ते नीट तपासून, ते ट्रॉयचेच आहेत हें सांगणें तिला अवश्य होतें. तिच्या अस्वस्थ मनःस्थितींतहि तिला एवढें स्पष्ट दिसून आलें कीं ट्रॉयनें जे कपडे काढून ठेवले ते आपण लगेच ते सारे पुन्हां अंगावर घालूं अशा विचारानेंच. तिच्या मनांत विचार आला—कदाचित् ट्रॉय आत्महत्या करून फॅनीच्या मागोमाग परलोकांत गेला असावा. ही आत्महत्या करून, आपला मृत्यू अपघातानें आला अशी बतावणीहि त्यानें मुद्दाम केली असावी काय याचा तिला विचार पडला.

सध्याकाळीं बाथशीबा शेकोटीशीं एकटी बसली होती. आता ती बरीच शांतहि झाली होती. ट्रॉयच्या इतर वस्तूंबरोबर त्याचें सोन्याचे घड्याळहि बाथशीबाजवळ परत आलें होतें. ट्रॉयनें एक आठवड्यापूर्वीच या घड्याळाचें झाकण उघडलें होते. तिनेंहि आता तसें उघडलें. ती फिकटलेली केसाची बट अजून त्या झाकणाच्या आंत होती. ती म्हणाली, "तो तिचा होता, अन् ती त्याची होती. दोघांनीं बरोबरच जाणं योग्य होतं. मी त्यापैकीं कोणाचीहि कोणी नव्हे. मग कशाला मी ठेवावे हे केस?"

ती बट उचलून तिनें विस्तवावर धरली; पण आपला हात चटकन मागें घेत ती म्हणाली, "नको. जाळणार नाहीं मी ती बट. त्या गरीब बापड्या मुलीची आठवण म्हणून मीं ती जपून ठेवीन.



## ४९. "आशा नाम मनुष्याणां शृंखला काचिदद्भुता!"



हिंवाळ्याची सुरवात होऊं पहात होती. रानांतल्या हिरवळीवर, पानांचा दाट सडा पडला होता. बाथशीबाची मनःस्थिती पूर्णपणें स्वस्थ नसली तरी निदान शांत दिसत होती. तिनें शेतवाडीचें कामकाज चालू ठेविलें होतें. तिच्या एकदर उदासीनपणामुळें एक मात्र चांगला परिणाम झाला. तो म्हणजे बराच काळ लांबणीवर पडलेली, ओकची दिवाणजी म्हणून झालेली नेमणूक. यापूर्वी बराच काळपर्यंत तो दिवाणजीचें काम प्रत्यक्षांत करीत होताच. आतां जाहीरपणें दिवाणजी म्हणून नेनणूक झाल्यावर पगारांत बरीचशी वाढ होण्यापलीकडे त्याच्या कामांत बदल झाला नाहीं.

बोल्डवुड आळसावून पूर्वीसारखा एकान्तवासांत रहात होता. गागील मोसमांत त्याचा बहुतेक गहूं आणि सारा जव पावसानें कुजून खराब झाला; तो इतका कीं डुकरेंहि त्याला तोंड लावीनात. हें दृश्य पाहून बोल्डवुडनें एके दिवशीं संध्याकाळीं ओकला बोलावणें पाठविलें. गॅब्रिएलनें बाथशीबाच्या शेतवाडीची देखरेख करीत असतांनाच आपल्या शेतीचीहि व्यवस्था पहावी असें त्यानें सुचविलें. एकूण गॅब्रिएलचे पापग्रह आतां 'मावळूं लागले होते हें खास. बाथशीबाला बोल्डवुडची योजना कळल्यावर तिनें प्रथम या योजनेला आक्षेप घेतला. एका मनुष्याला दोन्हीकडील शेतीवाडीवर देखरेख करतां येणार नाहीं असें तिचें मत होतें. परन्तु बोल्डवुडचे हेतू व्यापारी नसून वैयक्तिक असावेत असें दिसत असल्यानें त्यानें असें सुचवलें कीं ओकला त्याच्या कामासाठीं स्वतंत्रपणें एक घोडा दिल्यास त्याला ही देखरेख करण्यास अडचण वाटणार नाहीं. कारण दोघांचीं शेतें एकलेकांस लागूनच होती. अखेर सारी घडी नीटपणें बसली.

ओक एका बळकट घोड्यावर बसून मोठ्या हुरुपानें सुमारें दोन हजार एकराच्या शेतीवाडीवर देखरेख करूं लागला. यामुळें ओकची चांगली चंगळ चाललेली आहे असें साऱ्या पंचक्रोशींत लोकांच्या तोंडीं झालें. शेतींत नफातोटा कितीहि होवो, बाथशीबानें गॅब्रिएलला निश्चित पगार ठरवून दिला होता. बोल्डवुडशीं करार करतांना मात्र जो नफा होईल त्यांतील ठराविक हिस्सा आपल्याला मिळावा असा गॅब्रिएल ओकनें करार केला होता. अशा रीतीनें ओकची परिस्थिति चांगली सुधारली असली तरी तो अजून त्याच झोंपडींत रहात असे, स्वतः शिजवून खात असे आणि आपलें काम आपणच करीत असे. यामुळें हा माणूस चिक्कू आहे असा लोकांत बोलावा झाला होता. परन्तु लोकमताकडे बिलकुल लक्ष न देतां, ओकनें आपल्या जुन्या संवयी आणि चालीरीतींना अनुसरून आपले सारे व्यवहार सुरूं ठेवले होते.

अलीकडे बोल्डवुडच्या मनांत मात्र एक प्रबल आशा मूळ धरूं लागली होती. शोकदर्शक कपडे घालण्यास अखेर बाथशीबा राजी झाली होती. असे कपडे घालून ती दर रविवारीं चर्चमध्यें आली म्हणजे बोल्डवुडला अधिकाधिक विश्वास वाटूं लागे कीं आज ना उद्यां आपल्या तपश्चर्येचें फळ मिळणार. त्याला आतां पक्के वाटूं लागलें कीं भावी काळांत बाथशीबानें जर कोणाशीं लग्न केलें तर तें ती आपल्याशींच करील. त्याच्यासारख्या मध्यम वयस्क मनुष्याच्या दृष्टीला बाथशीबा ही सध्यां अधिकच आकर्षक दिसूं लागली होती. तिचा पूर्वीचा उल्हासाचा अतिरेक आतां ओसरला होता. पूर्वीची एखाद्या आनंदी देवदूतासारखी तिची स्थिती जाऊन ती आतां मानवी जीवनाच्या व्यावहारिक भूमिकेवर आली होती.

मध्यंतरीं दोन महिने बाथशीबा नार्कोंब येथील आपल्या म्हाताऱ्या आत्याबाईच्या भेटीसाठीं गेली होती. ती घरीं परत आल्यावर तिची विचारपूस करण्याच्या निमित्तानें तिच्यासाठीं आसुसलेल्या बोल्डवुडनें तिची माहिती काढली. आतां ती विधवा होऊन नऊ महिने लोटल्यानंतर

तिचें आपल्याबद्दल काय मत आहे याची शहानिशा त्याला करून घ्यावयाची होती.

गवत कापणीचा तो हंगाम होता. त्या कामांत गुंतलेल्या लिडीची त्यानें शेतांत जाऊन मुद्दाम भेट घेतली. मालकिणीच्या खास मर्जीतली अशी तिची थोडी प्रशंसा करून त्यानें खडा टाकून पाहिला, " तुझी मालकीण पुनः लग्न करण्याविषयीं कधीं तरी बोलत असेल नाहीं कां ?"

त्यावर लिडीनें उत्तर दिलें, " माझी मालकीण एकदा म्हणाली होती खरी कीं मागील वर्ष जमेला धरून सात वर्षांनंतर पुनः लग्न करतां येईल. पण ट्रॉय कदाचित् परत येईल व आपल्यावर हक्क सांगेल या परिस्थितीचा धोका पत्करून हें लग्न करावयाचें असलें तरच. "

बोल्डवुडला बोलण्यांतील पाचपेंच आवगत नव्हते. ट्रॉय निघून गेल्यामुळें होणाऱ्या कायदेशीर परीस्थितीबद्दल आपण वकिलाचाहि सल्ला घेतला आहे हें त्याला सांगण्याची इच्छा नसून देखील ती गोष्ट त्याच्या तोंडून निघून गेली. एकंदरींत त्याच्या बोलण्यावरून लिडीचा असाहि ग्रह झाला कीं हा मनुष्य अगदीं मूर्खासारखा वागूं लागला आहे. परंतु कांहीं झालें तरी त्याला एक नवी गोष्ट कळली कीं आजपासून सहा वर्षांनी बाथशीबा बहुतेक आपल्याशीं लग्न करूं शकेल. हा सुखकर विचार आतां त्याच्या मनांत सारखा खेळूं लागला.

बाथशीबासारख्या स्त्रीच्या प्राप्तीसाठीं सहा वर्षांचा काळ म्हणजे फार नव्हे असें त्याला वाटत होतें.

मध्यंतरीच्या काळांत उन्हाळा येऊन गेला आणि **ग्रीन हिलची** जत्रा जवळ आली. वेदरबरींतील लोक नेहमीं या जत्रेसाठीं तेथे जात.



## ५०. “ओळखिलें काय कुणी?”



क्षिण वेसेक्स जिल्ह्यांतील सर्वांत मोठी जत्रा **ग्रीन हिल** येथें भरत असे. देवघेवीचे व्यवहार, मौज, मजा, गोंधळ या साऱ्या दृष्टीनें मेंढ्यांची जत्रा भरणारा दिवस, या जत्रेंत मुख्य गणला जाई. ही वार्षिक जत्रा एका जुनाट किल्ल्याचे अवशेष असलेल्या टेकडीच्या टोंकावर भरत असे. या टोंकावरील सुमारें दहा-पंधरा एकराच्या पठारावर येणारे बहुतेक लोक आपले तंबू ठोकून, जेवणखाण, रहाणें वगैरे सर्व व्यवहार उरकीत. दुरून येणारे धनगर आपापले कळप घेऊन एकेक आठवडा आधीं पायरस्त्यानें निघत. रोज दहाबारा मैलांची मजल करीत ते जत्रेंत येऊन पोंचत.

एके दिवशीं सकाळीं ही सारी मेंढ्यांची मिरवणूक जत्रेच्या रस्त्यावर आली. तेथें रंगीबेरंगी रंगांत रंगविलेल्या, शिंगांच्या, बिनशिंगांच्या मेंढ्यांची अफाट संख्या पसरली होती. धनगर आरोळ्या देत होते, कुत्रे भुंकत होते आणि सगळीकडे गर्दी उडून गेली होती. या साऱ्या प्रकारांत मेंढ्याहि मधून मधून ‘ बें बें ’ असे केविलवाणे आवाज काढीत पुढें चालल्या होत्या. सकाळ उलटून जाईपर्यंत या साऱ्या दमलेल्या, धापा टाकणाऱ्या हजारों मेंढ्या तेथील मेंढवाड्यात नीटपणें डांबून ठेवण्यांत आल्या. प्रत्येक कळपाचा कुत्रा त्या वाड्याच्या कोपऱ्याशीं बांधलेला असे. या मेंढवाड्यामधून जाण्यासाठीं अरुंद रस्तेहि ठेवलेले होते. थोड्याच वेळांत देवघेवीचे व्यवहार करणाऱ्या जवळच्या व दूरच्या लोकांची तेथें गर्दी उडून गेली होती.

टेकडीच्या दुसऱ्या भागावर एक निराळाच देखावा दिसत होता. तेथें कांहीं लोक एक नवा भव्य तंबू उभारीत होते. तेथील सर्कशींत डिक् टर्पिन या लुटारूच्या घोडदौडीचा खेळ दाखविण्यांत येणार होता. तंबू

तयार झाल्याबरोबर तेथें बँडचे उत्तेजक संगीत सुरू झालें आणि तंबूच्या बाहेर डिक् टर्पिनची घोडी म्हणून एक काळी घोडी येऊन उभी राहिली. बाहेर खेळाची मोठमोठ्यानें जाहिरात होऊं लागली. तुताऱ्या, नगारे वाजत होते; लोक रेटारेटी करून तंबूंत शिरत होते. जॉन कोगन, जोसेफ पुअरग्रास हे वेदरबरीचे कामगार देखील या गर्दीत मजा करण्यासाठीं प्रेक्षक म्हणून तंबूत हजर होते.

तंबूच्या मागच्या बाजूला दोन लहान राहुट्यांत नट रंगत होते. पुरुष नटांच्या राहुटींत सार्जेंट ट्रॉय घोडदौडीचे लांब बूट आपल्या पायावर चढवीत होता. ट्रॉय येथें येऊन पोंचल्याचा पूर्वीचा वृत्तांत असा.

+ + +

बडमाउथ बंदरांत ट्रॉयला ज्या गलबतावर आश्रय मिळाला त्यावर खलाशाची संख्या कमी असल्यानें ट्रॉयनें तेथेंच नोकरी पत्करली. जहाज निघण्यापूर्वी ट्रॉयचे कपडे आणण्यासाठीं किनाऱ्याकडे एक होडी गेली; परन्तु तेथील कपडे नाहींसे झालें होते. जहाजावर नोकरी करीत ट्रॉय अखेर अमेरिकेंत जाऊन पोंहोंचला. तेथें मल्लविद्या, तलवारबाजीचे खेळ करून त्यानें आपला निर्वाह केला. परंतु त्याला अशा जीवनाचा कंटाला आला. आपण परत गेलों कीं, घर आणि घरांतील आराम वेदरबरी येथें आपल्यासाठीं तयार आहे याची त्याला मधून मधून जाणीव होत असे. आपल्या संशयित मृत्यूबद्दल बाथशीबाला काय वाटत असेल याबद्दलहि त्याच्या मनांत राहून राहून विचार येत. अखेर तो इंग्लंडला परत आला. परन्तु वेदरबरीला परत येण्याचा विचार मात्र त्याला अधिकाधिक अप्रिय वाटूं लागला. लिव्हरपूल येथें उतरल्यावर त्याचें मन उदास झालें. कोणीहि यावें आणि फसवून जावें इतकी बाथशीबा साधीभोळी नव्हती. ती मूकपणें छळ सोशीत स्वस्थ बसेल असेंहि नव्हतें. शिवाय घरीं गेल्यावर अन्न-पाण्यासाठीं तिच्याच तोंडाकडे पहावें लागणार. अशा करारी बायकोचा मिंधा होऊन रहाणें आपल्याला कितपत मानवेल याबद्दलहि त्याला संशय होता. शिवाय शेती-

बाडीच्या व्यवसायांत तिला अपयश आलें तर तिच्या निर्वाहाची जबाबदारी पुनः आपल्यावरच पडणार. गरिबींत तिच्याशीं पुढें संसार करायचा आणि तोहि फॅनीच्या गतस्मृतीचीं भुतें दोघांमध्यें वावरत असतांना !

अशा रीतीनें नावड, पश्चात्ताप आणि लज्जा यांच्या संमिश्र कारणांमुळें ट्रॉयनें परत येण्याची चालढकल चालविली होती. दुसरीकडे कोठें त्याची आयती सोय झाली असती तर त्यानें पुनः परत येण्याचें नांवहि काढलें नसतें. सप्टेंबर महिन्यांत एका फिरत्या सर्कस कंपनीशीं एका उत्तरकडील शहरांत त्याची गाठ पडली. तेथील एक नाठाळ घोडा वठणीवर आणून त्यानें तेथील व्यवस्थापकाशीं ओळख करून घेतली. भरधाव दोडणाऱ्या घोड्याच्या पाठीवरून समोर टांगलेल्या सफरचंदाला त्यानें पिस्तुलाची गोळी अचूक मारली. अशींच इतर कौशल्याचीं कामें त्यानें करून दाखविलीं. त्यामुळें ट्रॉयला सर्कशींत प्रवेश मिळाला. मुख्य नट म्हणून त्याची योजना करून **डिक् टर्पिन** या खेळाची योजना करण्यांत आली होती. 'मिळालेल्या प्रशंसेमुळे ट्रॉय याला फारसा आनंद झाला होता असें नव्हे, पण विचार करण्यासाठीं आणखी कांहीं आठवडे मिळतील याच दृष्टीनें त्यानें बेफिकीरपणे ही नोकरी पत्करली होती. अशा रीतीनें या सर्कस कंपनीबरोबर ट्रॉय ग्रीनहिलच्या जत्रेंत येऊन दाखल झाला होता.

+ + +

बाथशीबादेखील या जत्रेंत येऊन पोंचली होती आणि फ्रॅन्सिस नांवाचा अश्वरोहणपटु नट डिक् टर्पिन याची भूमिका करणार आहे ही घोषणाहि तिनें ऐकली होती. हा खेळ पहाण्याची तिलाहि थोडी उत्सुकता होती. जत्रेतील सर्वांत मोठी करमणूक म्हणजे ही सर्कसच होती.

लोकांचा घोळका तंबूंत गेल्यावर बाथशीबा जरा एकीकडे उभी असलेली पाहून बोल्डवुडनें तिच्याशीं बोलण्याची संधि साधली. तो जरा अस्वस्थपणेंच म्हणाला, "तुमचा मेंढ्यांचा व्यवहार नीटपणें उरकला ना ?" बाथशीबाच्या गालावर जरा लाली चढली. ती म्हणाली, "होय,

टेंकडीवर आल्याबरोबर सुदैवानं माझ्या साऱ्या मेंढ्या ताबडतोब विकल्या गेल्या. त्यामुळे त्यांना मेंढवाड्यांत आणून ठेवण्याची जरूरच लागली नाहीं."

—"आणि आतां तुम्ही अगदीं मोकळ्या आहांत असच न ?" बोल्डवुडनें विचारलें.

"होय, दोन तासांनंतर मला एका व्यापाऱ्याची भेट घ्यावयाची आहे, नाहींतर मी घरींच निघालें असतें. या मोठ्या तंबूकडे आणि जाहिरातीकडे मी बघत होतें. **टर्पिनची यॉर्ककडे घोडदौड** हा खेळ पाहिलात कां तुम्ही ?" बाथशीबानें विचारलें.

बोल्डवुड म्हणाला, "होय, तुम्ही मात्र पाहिलेला दिसत नाहीं तो ?"

—"नाहीं, मी लहान होतें तेव्हां अशा जागीं जाण्याची मला परवानगी नसे. ऐका ! या घोड्याच्या टापा कसल्या आणि ही आरडाओरड कसली चालली आहे ?"

बाथशीबा थोडी घुटमळत असलेली पाहून बोल्डवुडनें खुलासा केला. "**ब्लॅक बेस** (टर्पिनची आवडती) घोडी निघालेली दिसते. तुम्हालाहि खेळ पहावासा वाटतोय् नाहीं कां ? तसं असलं तर तुमच्या जागेची व्यवस्था करतों मी आनंदानं."

तो खेळ पहाण्याची बाथशीबाला थोडी इच्छा होती खरी पण एकट्यानें आंत जाण्याची भीति वाटत असल्यानें ती गेली नव्हती. थोड्याच वेळांत बोल्डवुडबरोबर ती तंबूत शिरली. खास राखून ठेविलेल्या एका जागेवर तिला बसवून बोल्डवुड निघून गेला.

बाथशीबा बसली होती ती जागा लाल कापडानें आच्छादिलेली असून साऱ्यांच्या डोळ्यांत भरेल अशा उंच जागीं होती.

रंगपटाच्या पडद्याला मुद्दाम ठेवलेल्या एका फटींतून ट्रॉयनें प्रेक्षकांकडे सहज नजर टाकली असतां समोर उंच जागीं राणीसारखी रुबाबांत

बसलेली त्याची पत्नी त्याला दिसली. पूर्णपणे गोंधळून तो चटकन् मागे सरला. आपण घेतलेल्या सोंगामुळें ती आपणाला ओळखूं शकणार नाहीं हें ट्रॉयला माहीत होतें पण आपला आवाज ती लगेच ओळखणार हेंहि तो जाणून होता. ती इतकी आकर्षक आणि सुंदर दिसत होती. कीं वेदरबरींतील लोकांविषयीं वाटणारी त्याची अप्रियता मावळूं लागली. एका दृष्टिक्षेपांत ती आपल्यावर एवढा अमल चालवूं शकेल याची त्याला कल्पनाहि नव्हती. तिची पर्वा न करतां आपण आपलें काम करावें अशी त्याच्या मनाची तयारी होईना. गुप्त रहाण्याची त्याची इच्छा होतीच; त्यांत भर म्हणून आपल्या आकर्षक तरुण पत्नीनें आपल्याला अशा स्थितींत पाहून हिणवावें याबद्दल त्याला लाजहि वाटूं लागली. पण ट्रॉयची खरी हुषारी एखाद्या अवघड परिस्थितीनें त्याचा कोंडमारा झाल्यावरच दिसून येत असे. रंगपटाचा पडदा सरकावून तो व्यवस्थापकाला म्हणाला, "साराच घोंटाळा झाला. माझा एक लुच्चा सावकार प्रेक्षकांत बसला आहे. मी तोंडांतून एक शब्द काढला कीं मला ओळखून लगेच तो मला अटक करवील हें ठरलेलेंच आहे. आतां काय करावें ?"

व्यवस्थापक म्हणाला, "पण खेळ तर झालाच पाहिजे !"

ट्रॉय म्हणाला, "आतां असं करा. प्रेक्षकांना सांगा कीं, टर्पिनचं काम करणाऱ्या नटाला सर्दी झाली असल्यानं तो काम करील पण बोलूं शकणार नाहीं." सर्कसच्या मालकानें नकार दाखवीत मान हलविली.

ट्रॉय निश्चयानें म्हणाला, "मग खेळ होवो न होवो, मी तोंडांतून शब्दहि काढणार नाहीं."

ऐन वेळीं मुख्य नटाला दुखविणें शहाणपणाचें होणार नाहीं याची जाणीव असल्यानें मालक ट्रॉयला म्हणाला, "यांतून कसा मार्ग काढायचा तें मी तुम्हाला सांगतों. तुमच्या मूकपणाबद्दल मी प्रेक्षकांना कांहींच सांगणार नाहीं. तुम्ही मुद्राभिनय करून, न बोलतांच आपलं सारं काम करा. भाषणं गाळून टाकलीं आहेत हें प्रेक्षकांच्या नजरेसहि येणार नाहीं."

ही योजना सयुक्तिक होती. कारण टर्पिनचीं भाषणें थोडीं आणि तोटकीं होतीं. खेळाचें मुख्य आकर्षण त्यांतील घटनांवरच आधारलेलें होतें. अशा रीतीनें खेळाची सुरवात झाली. सर्कशीच्या हौद्यांत ब्लॅक बेस घोडीनें उड्डाण करून प्रवेश केल्याबरोबर कडकडून टाळी पडली. अखेरीस ब्लॅक बेस घोडीच्या मृत्यूनंतर प्रेक्षकांतले बारा स्वयंसेवक बोलावून तिला उचलून नेण्याचा खेळांतला भागहि यशस्वीपणें पार पडला.

त्यानंतरचा दुसरा खेळ संपण्याच्या सुमारास प्रेक्षक वर्गाच्या पहिल्या रांगेतील एक मनुष्य आपल्याकडे अगदीं रोखून पहात आहे असें ट्रॉयला दिसलें. तो मनुष्य म्हणजे त्याच्या पत्नीचा कट्टा शत्रू पेनीवेज नांवाचा लबाड दिवाणजी. या मनुष्यानें आपल्याला ओळखलें असावें असें ट्रॉयला वाटूं लागलें.

या द्विधा मनस्थितींतच बाहेर टेहळणी करण्यासाठीं ट्रॉय बाहेर पडला. पेनीवेजची भेट घ्यावी, आणि शक्य तर त्याच्याशीं मैत्री करावी हेंच शहाणपणाचें आहे असें त्याला वाटूं लागलें. रंगपटांतली दाढी त्यानें आपल्या चेहऱ्यावर चिकटवून दिली होती. अशा वेशांतच तो जत्रेंत फिरत होता. आतां अंधार पडूं लागला होता आणि बरेच लोक आपापल्या गाड्यांतून घरीं जाण्याची तयारी करीत होते.

त्या जत्रेंत शेजारच्या शहरांतील एका पथिकाश्रमाच्या मालकानें एक मोठें उपाहारगृह उघडलें होतें. पेनीवेजचा जवळपास पत्ता नव्हता, परंतु बाथशीबा मात्र तेथें ट्रॉयला दिसली. ती उभा होता तेथील कनातीच्या आडून तिचा आवाज स्पष्टपणें त्याच्या कानांवर येऊं लागला. ती एका मनुष्याशीं बोलत होती. ट्रॉयचा चेहरा लाल होऊं लागला. जत्रेसारख्या ठिकाणीं एखाद्या मनुष्याशीं रंगढंग करण्यापर्यंत एकूण तिची मजल गेली काय! आपल्या मृत्यूबद्दल तिची पक्की खात्री झाली असावी असें त्याला राहून राहून वाटूं लागलें. ट्रॉयनें खिशांतून एक चाकू काढून तंबूच्या कापडांत एक लहानसें भोंक पाडलें आणि त्यांतून तो तंबूंतील देखावा पाहूं लागला.

बाथशीबा सहजपणें मागें टेकून हातांत धरलेल्या कपांतून चहाचे घुटके घेत होती. मधां ज्या मनुष्याच्या बोलण्याचा आवाज आला तो बोल्डवुड होता. बाथशीबा तंबूच्या कनातीला इतकी मागें टेकली होती कीं कमानीआड असलेल्या ट्रॉयच्या बाहुपाशांतच ती जवळ जवळ असल्यासारखी दिसत होती. ट्रॉयच्या हृदयांत अनपेक्षितपणें पूर्वीच्या भावना पुनः उसळूं लागल्या. ताबडतोब आंत जाऊन तिच्यावर हक्क सांगावा अशी प्रबल इच्छा त्याच्या मनांत जागृत झाली. ती दडपून टाकण्यास त्याला थोडा वेळ प्रयत्न करावा लागला. नंतर त्याच्या मनांत पुनः विचार आला कीं आपल्यावर प्रेम करीत असतांहि बाथशीबा आपल्याकडे थोड्याबहुत तुच्छतेनेंच पहात असे, आणि आतां आपण एखाद्या भटक्या नटाचा व्यवसाय करीत आहोंत हें समजल्यावर तर ती आपला तिरस्कारच करूं लागेल."

आंत बोल्डवुड बाथशीबाला म्हणत होता, "निघण्याआधीं आणखी एखादा कप चहा आणूं का तुमच्यासाठीं?"

"नको, नको.--मला ताबडतोब निघालंच पाहिजे. खरं तर दोन तासांपूर्वीच निघायला हवं होतं मला."

आपल्या पिशवींतून पैसे काढून ती चहाचें बिल देत असतांच पेनीवेज हाहि त्या तंबूत आला. बाहेर ट्रॉयच्या अंगाचा थरकांप झाला. आपण लगेच पेनीवेजच्या मागोमाग आंत जावें या विचारांत असतां पेनीवेजचे शब्द ट्रॉयच्या कानावर आले.

"बाईसाहेब, माफ करा. मला कांहीं खाजगी माहिती तुमच्या एकटीच्या कानावर घालायची आहे."

बाथशीबा तुटकपणें म्हणाली, "ती ऐकायला आतां मला वेळ नाहीं."

तरी पेनीवेज धीटपणें म्हणाला, "मी चिठ्ठी लिहून ठेवतों,"

आणि एका वहीच्या पानावर त्यानें खालील शब्द लिहिले.

—'तुमचे यजमान येथें आले आहेत. मी त्यांना पाहिलें आहे. आतां मूर्ख कोण?'

त्या चिट्ठीची घडी करून त्यानें ती बाथशीबासमोर धरली. ती वाचण्यास किंवा हातांत धरण्यासहि बाथशीबानें नकार दिला. कुत्सितपणें हंसून, पेनीवेजनें ती चिठ्ठी तिच्या अंगावर फेंकून दिली आणि तो तिथून निघून गेला.

बोल्डवुडनें ती चिठ्ठी उचलून घेत विचारलें, "मिसेस् ट्रॉय, ही चिठ्ठी वाचायची इच्छा नाहीं कां तुमची? नसली तर मी फाडून टाकतों ती."

बाथशीबा निष्काळजीपणानें म्हणाली, "ती वाचणं योग्य असेलहि; पण ती कशाबद्दल असावी याचा मला अंदाज आहे. त्याला माझी शिफारस हवी असेल, नाहींतर नेहमींप्रमाणं माझ्या कामगारांबद्दल कांहींतरी चुगल्या सांगायच्या असतील त्याला."

लोणी लावलेल्या ब्रेडच्या तुकड्यांची एक थाळी बोल्डवुडनें तिच्यापुढें धरली. त्यांतून एक तुकडा उचलून घेण्यासाठीं तिनें उजव्या हातांतील ती चिठ्ठी डाव्या हातांत घेतली. त्याच हातांत तिची पैशांची पिशवी होती. तिचा डावा हात तंबूच्या कनातीजवळच होता. त्याच क्षणीं ट्रॉयच्या लक्षांत आलें कीं, आपली बाजू सांवरण्याची हीच वेळ आहे. डोळ्याचें पातें लवतें न लवतें तेवढ्यांत चटकन् एखादी गोष्ट करण्यांत तो पटाईत होता. तंबूची कनात जमिनीवर सैलपणें लोंबत होतीच. तीच जरा उचलून त्यानें बाथशीबाच्या डाव्या हातांतील ती चिठ्ठी चटकन् ओढून घेतली, कनात खालीं टाकून अंधारांत त्यानें धूम ठोकली. बाथशीबानें फोडलेली किंकाळी जातां जातां त्याच्या कानावर आली. पलीकडील तटबंदीवरून ट्रॉय खालीं उतरला आणि थोडें अंतर चालून जाऊन दुसऱ्या दिशेनें उपाहारगृहाच्या प्रवेशद्वाराशीं तो पुनः

परत आला. पेर्नीवेजला भेटून आपल्याविषयीं पुनः अवेळीं अशी माहिती बाहेर फुटूं नये याबद्दल त्याला बंदोबस्त करावयाचा होता.

तंबूच्या दाराशीं उभा असतां तेथें चाललेलें लोकांचें बोलणें ट्रॉयच्या कानावर पडलें. एका मवाल्यानें एका तरुण बाईच्या हातांतील एक कागद, ती एखादी चलनी नोट असेल या समजुतीनें कसा पळविला याबद्दल त्यांचें बोलणें चाललें होतें. तिची पिशवी न घेता त्यानें तो कागदच पळविला होता. अखेर तो कागद म्हणजे नोट नाहीं असें आढळून आल्यावर त्याची किती निराशा झाली असेल याबद्दल त्यांचें बोलणें चाललें होतें. त्याच्यामागें उभा असलेला पेनीवेज ट्रॉयला दिसताच ट्रॉयनें त्याला खूण केली आणि ते दोघे अंधारात बरोबर निघून गेले.



## ५१. "दे हाता– या शरणागता"



दरबरीला परत जातांना गॅब्रिएल ओकनें बाथशीबाबरोबर जावें असें ठरलें होतें. परन्तु बोल्डवुडच्या कांहीं मेंढ्या विकल्या न गेल्यानें त्यांची व्यवस्था ओकलाच पहावी लागली. यामुळें दुसऱ्या कोणाला गाडी हांकण्याचें काम न सांगतां बाथशीबानें स्वतः एकटीनेंच वेदरबरीला जाण्याचें ठरविलें. उपाहारगृहात बोल्डवुडची गांठ पडल्यावर, घोड्यावर बसून तिच्याबरोबर येण्याबद्दलची त्याची सूचना तिला नाकारणें शक्य नव्हतें. तोंपर्यंत संध्याकाळ झाली होती, पण बोल्डवुडनें तिला सांगितलें. " अस्वस्थ होण्याचं कांहींच कारण नाहीं; अर्ध्या तासांतच चंद्रोदय होईल. "

उपाहारगृहांत घडलेल्या त्या चोरीच्या प्रसंगानंतर बाथशीबा अगदीं घाबरली होती. आपल्या जुन्या प्रियकरानें दिलेल्या संरक्षणाबद्दल तिला खरोखर कृतज्ञताहि वाटत होती. चंद्रोदय झाल्यावर गाडी हांकीत ती निघाली आणि आपल्या घोड्यावर बसून बोल्डवुडहि तिच्या मागोमाग येऊं लागला.

बाथशीबानें आपल्या अंतःप्रवृत्तीनें ओळखलें कीं बोल्डवुडची आपल्याविषयींची दृढनिष्ठा अद्याप कमी झालेली नाहीं. त्यामुळें तिला त्याच्याबद्दल फार सहानुभूति वाटूं लागली. आपल्या मागील मूर्खपणाची तिला पुनः आठवण झाली. त्याची भरपाई करण्याचा एखाद्या मार्ग आपल्याला सांपडावा अशी तिला पूर्वीप्रमाणें इच्छा वाटूं लागली; आणि तिच्या वागणुकींत अस्थानीं मृदुताहि दिसूं लागली.

लवकरच कांहीं तरी सबब सांगून बोल्डवुड गाडीच्या मागून येण्याऐवजीं बाथशीबाच्या बाजूनें येऊं लागला. चांदण्यांत दोन-तीन मैल अशा रितीनें ते दोघे पुढें चालले होते. जत्रा आणि शेती यांत उभयतांनाहि होत असलेला ओकचा उपयोग, अशा मामुली विषयांबद्दल त्यांचें रेंगाळत बोलणें चाललें होतें. मध्येंच बोल्डवुडनें एकाएकी सरळ प्रश्न केला, “ मिसेस् ट्रॉय ! पुनर्विवाह करणार आहांत कां तुम्ही कधीं तरी ? ”

या अगदीं उघड प्रश्नानें बाथशीबा गोंधळली. थोडा वेळ गेल्यावर ती म्हणाली, “ अशा गोष्टींबद्दल मी तितकें लक्ष घालून विचारच केला नाहीं. ” बोल्डवुड म्हणाला—“ आलं माझ्या ध्यानांत. तरी पण आतां तुमच्या पतीला जाऊन वर्ष होईल आणि... ”

—“ पण तुम्ही हें विसरतां कीं त्यांच्या मृत्यूबद्दल निश्चित पुरावा मिळाला नाहीं. कदाचित् ते वारले नसतील आणि मी विधवाहि झालें नसेन. ” बाथशीबा उत्तरली.

तरी बोल्डवुड चिकाटीनें म्हणाला, “ ते मृत्यु पावले याबद्दल निश्चित पुरावा मिळाला नसला तरी अप्रत्यक्ष पुराव्यानें तें सिद्ध झालें आहे. ”

बाथशीबा हळूंच म्हणाली, “ मला शंका आहे; नाहींतर

मी यापेक्षां निराळयाच रीतीनें वागलें असतें. पहिल्यापासून, कां कोणाला ठाऊक, मला वाटत आलं आहे कीं ते मृत्यु पावले नसावेत.

थोडा वेळ गप्प राहून बोल्डवुड तिला म्हणाला, "समजा आपल्याला खरोखरच वैधव्य आलं याबद्दल तुम्हाला निश्चित पुरावा मिळाला तर मला पूर्वी केलेल्या अन्यायाची भरपाई म्हणून माझ्यांशी लग्न कराल कां तुम्ही ?"

बाथशीबा उत्तरली, "मला नाहीं सांगता येत. निदान एवढ्यांत तरी मी करणार नाहीं."

—"पण यापुढें केव्हां तरी तसं करण्याची शक्यता आहे असंच ना ?"

—"होय. केव्हां तरी घडूंहि शकेल असं." बाथशीबानें कबुली दिली.

यावर बोल्डवुड म्हणाला, "हें पहा; आहे याहून अधिक पुरावा हातीं आला नाहीं तरी आणखी सहा वर्षांनीं तुम्हाला लग्न करायला कोणाचीहि आडकाठी अथवा आक्षेप येणार नाहीं, हें माहीत आहे कां तुम्हाला ?"

बाथशीबानें चटकन् उत्तर दिलें, "होय. तें सारं माहीत आहे मला—पण त्याच्याबद्दल कशाला बोलतां आतां ? सहा सात वर्षांनंतर आपण सारे कुठं असूं कोणाला ठाऊक ?"

—"हीं वर्षे हां हां म्हणतां निघून जातील."

बोल्डवुड आजीजीच्या स्वरांत म्हणाला, "मी तितकीं वर्षे थांबलों तर कराल कां तुम्ही माझ्याशीं लग्न ? माझी कांहीं तरी भरपाई केली पाहिजे असं तुम्ही स्वतःच कबूल केलं आहे. भरपाई करण्याचा हा मार्ग असूं द्या."

बाथशीबा म्हणाली, " पण मि. बोल्डवुड सहा वर्षे...! "

—" तुम्हाला दुसऱ्या कोणाशीं लग्न करावसं वाटतं कां ? " बोल्डवुडनें प्रश्न टाकला.

त्यावर बाथशीबाला उत्तर द्यावें लागलें, " तसं बिलकुल नाहीं. माझ्या बोलण्याचा अर्थ असा—सध्यां मला या विषयावर बोलावसं वाटत नाहीं. मी म्हटलं होतं त्याप्रमाणें माझे पति अजून जिवंतहि असतील."

पण बोल्डवुड आपला मुद्दा न सोडतां म्हणाला, " निदान तुम्हाला एवढं तरी सांगतां येईल कीं परिस्थिती अनुकूल आली तर मी तुमच्याशींच लग्न करीन. " अहो, एवढं तरी वचन द्या—मला. "

बोल्डवुडचा स्वर इतका भावनाकुल झाला होता कीं त्याच्याबद्दल सहानुभूति वाटत. असून देखील तिला त्या वेळीं त्याची भीति वाटू लागली. तिला त्याच्याबद्दल कोणतीहि शिसारी किंवा अप्रियतेची भावना वाटत नव्हती एवढें मात्र खरें.

तिनें उत्तर दिलें, " जोपर्यन्त तुम्हाला माझ्याशीं लग्न करावंसं वाटतं तोपर्यन्त मी दुसऱ्या कोणाशींहि लग्न करणार नाहीं; पण तुम्ही मला हा प्रश्न अगदीं अचानक केला आहे. "

बोल्डवुड त्यावर म्हणाला, " मग साध्या सरळ शब्दांत मला असं सांगा. " सहा वर्षांनंतर मी तुमच्याशीं लग्न करीन. गतकाळाचं स्मरण करून मला निश्चित वचन द्या. "

बाथशीबा उसासा सोडून दुःखानें म्हणाली, " मी करूं तरी काय ! माझं तुमच्यावर प्रेम नाहीं. पत्नीला आपल्या पतीबद्दल जितकं प्रेम वाटायला हवं तितकं प्रेम मला तुमच्याबद्दल कधींहि वाटणार नाहीं अशी मला भीति वाटते. तरी सहा वर्षांनंतर लग्न करण्याचं वचन दिल्यानं तुम्हाला बरं वाटत असलं तर मी... "

यावर बोल्डवुडच घाईनें म्हणाला, " वचन देतें ! "

बाथशीबानें आपलें वाक्य पुरें केलें, " लवकरच वचन देण्याचा मी विचार करीन. "

" पण लवकरच म्हणजे कधींच नाहीं असें तर नव्हे ? "

बाथशीबा म्हणाली, " तसें नाहीं. लवकरच म्हणजे खरंच लवकर; येत्या नाताळांत म्हणूं या आपण. "

" नाताळांत ! " असा उद्गार काढून थोड्या वेळानें बोल्डवुडनें पुस्ती जोडली, " ठीक आहे, तोंपर्यन्त मी तुमच्याशीं या बाबतींत कांहींच बोलणार नाहीं. "

× × ×

वरील संभाषण झाल्यानंतर आठवड्यामागून आठवडे उलटले. नाताळ जवळ येऊं लागला; आणि त्याच प्रमाणांत बाथशीबाच्या मनांतली काळजी वाढली आणि तिचा गोंधळहि वाढूं लागला. एके दिवशीं बाथशीबा आणि गॅब्रिएल ओक हे दोघे शेतीवाडीच्या हिशेबांची तपासणी करीत असतां कांहीं कारणानें ओक बोल्डवुडबद्दल म्हणाला, " तो तुम्हाला कधींहि विसरणार नाहीं. "

यानंतर न कळतांच बाथशीबा पुनः आपल्या त्रासाची कहाणी त्याला सांगूं लागली. ती म्हणाली, " जर मी त्याला वचन दिलं नाहीं तर त्याला वेडच लागेल. मी त्याच्याशीं कशी वागेन यावर त्याचं भावी सुखदुःख अवलंबून आहे. केवढी ही जबाबदारी ! ही जाणीव झाली कीं, माझ्या अंगाचा नुसता थरकांप उडतो ! "

बाथशीबानें आपल्या अंतरातली गोष्ट गॅब्रिएलजवळ उघड करून सांगितली. तोहि अगदीं गंभीर होऊन म्हणाला, " जर अशी परिस्थिति असली तर तुम्ही त्याला निदान कांहीं अटींवर तरी संमति कां देत नाहीं ? "

यावर आपल्या मनांत या बाबतींत काय संदेह आहेत ते बाथशीबानें बोलून दाखविले. बोल्डवुडबद्दल आपल्याला प्रेम वाटत नाहीं हेंही सांगून ओकचा सल्ला मागितला. ती अखेरीस म्हणाली, " गॅब्रिएल ! माझ्या सदसद्विवेक बुद्धीला जी सतत टोंचणी लागली आहे ती ही कीं केवळ रिकामपणाचा खेळ म्हणून मी या मनुष्याला उगीच दुखवलं आहे; मी त्याच्याशीं हा खेळ खेळलें नसतें तर माझ्याशीं लग्न करायची त्याला कधींच इच्छा झाली नसती. हें ऋण फेडण्याचा आता एकच मार्ग उरला आहे. माझ्या स्वतःच्या भविष्याकडे लक्ष न देतां, माझ्या हातीं असेल तें करणं माझं कर्तव्य आहे असं मला वाटूं लागलं आहे. "

यावर ओक म्हणाला, " अशी परिस्थिती असली तर बोल्डवुडशीं कसं वागावं याबद्दल तुम्ही वकिलाचा सल्ला कां घेत नाहीं ? "

बाथशीबा म्हणाली, " तसं नको. खास सल्ला घेण्यासारख्या गोष्टी सोडून मला जेव्हां सामान्य स्वरूपाच्या सूचना हव्या असतात तेव्हां त्या त्या विषयांतील धंदेवाईक सल्लागारांकडे मी कधींच जात नाहीं.

बाथशीबा ओकशीं मोकळेपणानें इतकें बोलली तरी तिच्या हृदयाच्या गाभाऱ्यांत खोल, कुठें तरी, निराशेची एक अगदीं सूक्ष्म अशी कळ येऊन गेली. त्याचें खरें कारण काय हें जाणून घेण्याची तिची स्वतःची देखील तयारी नव्हती. खरी गोष्ट अशी होती कीं ओक एकदांहि असें म्हणाला नाहीं, " तुम्ही एकदां लग्न करायला मोकळ्या झालांत तर तुमच्याशीं लग्न करण्याची माझीहि इच्छा आहे. " ओकनें असे शब्द काढले नाहींत. यामुळें तिला कुठे तरी दंश झाल्यासारखें वाटत होतें. अर्थात् ओकनें तसा प्रस्ताव केला असता तर तिनें त्या बोलण्याला दाद दिली नसती हा प्रश्न अलाहिदा. कारण ती नेहमीं स्वतःशीं म्हणत असे भावी कालाविषयींचे असे विचार सध्यां करणें योग्य नाहीं. गॅब्रिएलसारख्या गरीब माणसानें अशी भावना बोलून दाखविण्यांतहि विशेष अर्थ नव्हता. तरी तिला राहून राहून वाटत होतेंच कीं त्यानें सहजगत्या, विनोदानें कां होईना, आपल्या पूर्वीच्या

प्रेमाबद्दल ओझरता तरी उल्लेख करावा. त्याला नकार देतांनाहि आपण तो अगदीं मृदु, प्रेमळ शब्दांत कसा दिला असता याबद्दलचे तिचे बेतहि इच्छेंतच विरले. आपणच मागितलेला सल्ला त्यानें इतक्या शांतपणें दिला यामुळें साऱ्या दुपारभर बाथशीबाला अस्वस्थ वाटत होतें.



## ५२. "सोनियाचा दिवस आजी—!"



खेर नाताळची संध्याकाळ येऊन ठेपली. बोल्डवुडच्या घरांतील महोत्सवाबद्दल साऱ्या गांवांत चर्चा चालली होती. ख्रिसमसचा उत्सव म्हणजे कांहीं नवीन गोष्ट होती असें नव्हे. पण बोल्डवुडनें तो समारंभ साजरा करावा यांत मात्र नाविन्य होतें खास! त्याच्यासारख्या अगदीं रुक्ष मनुष्यानें अशा आनंदोत्सवांत भाग घेणें म्हणजे एखाद्या सन्माननीय न्यायमूर्तीनें नाटकांत काम केलें अशी बातमी कानीं येण्याइतकेंच आश्चर्यकारक होतें. बोल्डवुडकडील हा समारंभ खूप थाटाचा आणि उत्साहाचा होणार याबद्दल शंकाच नव्हती. मिसलेटोची[१] एक मोठी थोरली फांदी रानांतून आणून ती मुख्य दालनाच्या छताला बांधली होती. हॉली आणि आयव्ही या वेलीझुडपांच्या पानांचे ढीगच्याढीग आणण्यांत आले होते. मुदपाकखान्यांत त्या दिवशीं सकाळचे सहा वाजल्यापासून दुपार उलटून जाईपर्यंत एक मोठी भट्टी धडधडून पेटली होती, आणि अनेक प्रकारचीं पक्वान्नें तयार होत होतीं.

---

[१] ही एक बांडगुळाच्या जातीची वनस्पति आहे. ती नाताळांत खोलींत टांगतात. तिच्याखालीं उभ्या असलेल्या स्त्रीचें चुंबन घेण्याची कोणाहि पुरुषाला परवानगी असते असा संकेत आहे.

संध्याकाळच्या सुमाराला तळ मजल्यावरील मोठ्या हालनांत एक शेकोटी पेटविण्यांत आली व नृत्य करण्यासाठीं जमिनीवरील सर्व सामान काढून सारें दालन मोकळें करण्यांत आलें; पण इतकें सारें करूनहि त्या घरांत समारंभाचें उत्साही वातावरण मात्र दिसत नव्हतें. त्या घराच्या मालकानें आतांपर्यंत असे समारंभ करण्याचा कधींच प्रयत्न केला नव्हता. आणि आतां ही सारी तयारी म्हणजे नुसता जुलमाचा राम राम असल्यासारखीच वाटत होती. सारे व्यवहार भाडोत्री नोकरांनीं चालविले होते. एखादी छाया साऱ्या खोल्यांतून सतत फिरत रहावी, आणि तिनें म्हणत रहावें, " इथें रहाणाऱ्या या एकलकोंड्या मनुष्याला हे प्रकार शोभण्यासारखे नाहींत" असाच त्या घरांत भास होत होता.

—२—

याच सुमाराला बाथशीबा आपल्या खोलींत वेषभूषा करीत होती. लिडीनें येऊन तिच्या आरशाच्या दोनही बाजूंना मेणबत्त्या लावल्या. बाथशीबा म्हणाली, " जाऊं नको लिडी. कां कोणाला ठाऊक! मला कसंसंच वाटायला लागलंय्. या नाचाला जावं लागलं नसतं तर फार बरं झालं असतं असं वाटायला लागलंय्. पण आतां सुटका नाहीं. 'नाताळांत मी तुमच्याशीं बोलेन या विषयावर' असं उन्हाळ्याच्या अखेर मी बोल्डवुडला सांगितलं. त्यानं तर त्याची माझी भाषा झाली नाहीं; पण असा थाटाचा समारंभ आज होणार असेल याची मला कल्पनाच नव्हती. "

लिडी देखील तिच्याबरोबर जाणार होती. ती म्हणाली, " पण आतां तुम्हांला गेलंच पाहिजे; कारण बोल्डवुडनं झाडून साऱ्यांना आमंत्रण दिलं आहे. "

बाथशीबानें उत्तर दिलें, " होय! मीं येईन खरी. पण हा समारंभ माझ्यासाठीं केला आहे यामुळंच मला अगदीं चमत्कारिक वाटतंय्. कुणाला सांगूं नको बरं कां लिडी! "

" मी नाहीं सांगणार बाईसाहेब. तुमच्यासाठींच आहे कां हा समारंभ ? " लिडीनें आश्चर्यानें प्रश्न केला.

बाथशीबानें उत्तर दिलें, " होय ! माझ्यासाठींच. तसं नसतं तर हा समारंभच झाला नसता. यापेक्षां अधिक स्पष्टीकरण मला करवत नाहीं आणि तसं करण्यासारखंहि कांहीं नाहीं.. या वेदरबरी गांवाचं मीं तोंडहि पाहिलं नसतं तर फार बरं झालं असतं, असं मला वाटूं लागलंय्. "

या समारंभानंतर झाणखी कांहीं तरी अनर्थ ओढवणार असं राहून राहून वाटतंय् मला. पण जाऊं दे. माझा काळा रेशमी झगा आण. तो अंगावर कसा काय बसतोय् तें बघ. "

यावर लिडीनें आक्षेप घेतला, " बाईसाहेब ! तुमचं हें असं होऊन चौदा महिने झाले कीं आतां ! आतां असले काळे कपडे वापरणं सोडून दिलं पाहिजे तुम्हाला. निदान अशा समारंभाच्या रात्रीं तरी थोडा रंगीत पोषाख केला पाहिजे तुम्हीं ! "

बाथशीबानें विचारलें, " तसं करायलाच हवं कां ? मी नेहमीच्याच पोषाखांत येईन. रंगीबेरंगी पोषाख केला तर लगेच लोक चर्चा करायलो लागतील माझ्याबद्दल !

— २ —

याच सुमाराला तिकडे बोल्डवुडहि आपले कपडे करीत होता. कॅस्टरब्रिजहून आलेला शिंपी त्यानें नवीनच आणलेला कोट बोल्डवुडच्या अंगावर चढविण्यास त्याला मदत करीत होता. यापूर्वी कधींहि आपले कपडे ठाकठीक बसतात कीं नाहीं याबद्दल बोल्डवुडनें इतकी काळजी घेतली नव्हती. अखेर आपलें बहुतेक समाधान झालें असें सांगून बोल्डवुडनें कोटाचें बिल देऊन टाकलें. तो दारांतून बाहेर जात असतां समारंभाची व्यवस्था कोठवर आली आहे हें सांगण्यासाठीं ओक आंत आला.

बोल्डवुड म्हणाला, " ओक कां ! आज रात्रीं तूं इथं राहिलं पाहिजेस. सारे मजा करा. आज त्रासाकडे किंवा खर्चाकडे बिलकुल पहायचं नाहीं असं मी ठरवलंय." गॅब्रिएल शांतपणें म्हणाला, " मला यायला थोडा उशीर होईल. पूर्वीपेक्षां तुमच्यांत इतका बदल झालेला पाहून मला खरोखर आनंद वाटतो."

बोल्डवुडहि म्हणाला, "खरं आहे. मलाहि तसंच वाटतं. आज रात्रीं खरोखर मी खुषींत आहे. एखादे वेळीं असं होतं कीं जेव्हां मला फार आशा वाटूं लागते आणि माझं मन आनंदांत असतं तेव्हां दूर कुठेंतरी संकटाची चाहूल लागते असा माझा अनुभव असल्यानें उदासीनतेकडे मी समाधानानेंच पहातों; आणि उलट मन प्रसन्न असलं म्हणजेच मला धास्ती वाटूं लागते. पण कदाचित् हें चुकीचंहि असूं शकेल. कदाचित् माझा भाग्याचा दिवस आज अखेर उगवला असं म्हणतां येईल !"

ओक म्हणाला, " असा दिवस खरोखर शुभ आणि दीर्घकाल टिकणारा असावा अशीच माझी इच्छा आहे."

त्याचे आभार मानीत बोल्डवुड म्हणाला, " तरीहि माझी प्रसन्नता एकाच आशेवर आधारलेली आहे. ओक! माझे हात जरा कापताहेत. नेकटायची गांठ जरा मला बांधतां येत नाहीं. बांधून देतोस कां ती जरा? खरं म्हणायचं तर अलिकडे मला बरं वाटत नाहीं. पण त्यांत कांहीं विशेष नाहीं."

—ओकनें नेकटाय बांधून दिल्यानंतर बोल्डवुडनें अगदीं अस्वस्थ होऊन त्याला प्रश्न केला, " स्त्रिया दिलेला शब्द पाळतात कां गॅब्रिएल ?"

—" त्यांना कांहीं अडचणीचं वाटत नसेल तर पाळतात कीं !"

—" हें वचन म्हणजे संदिग्धपणें दिलेलं वचन म्हणतों मी."

ओक किंचित् कडवटपणें म्हणाला, "संदिग्धपणा असेल तर मात्र मला कांहीं सांगतां येणार नाहीं, कारण अशा शब्दांतून वाटेल तितक्या पळवाटा काढतां येतात."

बोल्डवुड म्हणाला, "ओक! असं बोलूं नकोस. मला विचारायचंय् तें असं.........लग्नाचं वचन नव्हे, तर 'पुढेंमागें लग्न करूं' याबद्दलचा दिलेला शब्द एखादी स्त्री पाळील कां?"

ओकनें उत्तर दिलें, "मला वाटतं कीं एखाद्याला आपण दुखवलं असलं, आणि त्याची भरपाई करण्यासाठीं असं वचन दिलं असलं तर एखादी स्त्री तें पाळील!"

यावर बाथशीबाचें नांव न घेतां, तिचा पति बेपत्ता झाल्यामुळें सात वर्षेंपर्यंत लग्न न करण्याचा तिचा निश्चय आहे आणि त्यानंतर कांहीं दिवस उलटून गेल्यामुळें ती मुदत आतां पांच वर्षें नऊ महिने आणि कांहीं दिवसांवर आली आहे ही बातमी बोल्डवुडनें ओकच्या कानावर घातली. पांच वर्षें वाट पहाण्याची त्याची स्वतःची पूर्ण तयारी होती.

ओक मूज्ञपणें त्याला सावध करीत एवढेंच म्हणाला, "हा फार दूरचा विचार झाला असं मला वाटतं. अशा वचनावर फार अवलंबून राहूं नये. एकदां या बाबतींत तुमची फसगत झाली आहे हें लक्षांत ठेवा. तुमचे हेतु चांगले असतील पण--ती अजून अल्लड आहे हेंहि लक्षांत असूं द्या!"

बोल्डवुड जोरानें म्हणाला, "छे! फसगत मुळींच म्हणतां यायची नाहीं. पहिली गोष्ट म्हणजे तिनं मला कधीं वचन असं दिलं नव्हतंच. म्हणून तिनं वचन मोडलं असं म्हणतां येणार नाहीं. आतां मात्र तिनं वचन दिलं, तर ती माझ्याशीं खास लग्न करणार! बाथशीबा तशी दिलेलं वचन पाळणारी स्त्री आहे."

–४–

कॅस्टरब्रिज येथील व्हाइट हार्ट नांवाच्या उपाहारगृहांत

सार्जंट ट्रॉय धूम्रपान करीत, दारू पीत बसला होता. दारावर एक थाप पडली आणि पेनीवेज आंत आला.

त्याला ट्रॉय म्हणाला, " मला माहिती पाहिजे आहे ती एका गोष्टीबद्दल. ती अन् बोल्डवुड या दोघात कांहीं विशेष घडामोडी चालू आहेत काय ? खरं म्हणायचं तर यावर मी विश्वासच ठेवायला नको होता. तिनं बोल्डवुडला कांहीं उत्तेजन दिलं कीं काय याविषयीं कळलं कां तुला ? "

पेनीवेज उत्तरला, "मला फारशी माहिती मिळाली नाहीं. त्याला तिच्याबद्दल खूपसं वाटतंय असं दिसतं, पण तिला काय वाटतंय् तें निश्चितपणें सांगतां येत नाहीं मला. कालपर्यंत या बाबतींत अक्षरहि कळलं नव्हतं. मग मी ऐकलं तें एवढंच कीं त्याच्या घरीं असलेल्या पार्टीला ती आज जाणार आहे. त्याच्या घरीं जाण्याचा तिचा हा पाहिलाच प्रसंग आहे असं म्हणतात.

तरी ट्रॉयची खात्री पटल्यासारखी दिसली नाहीं. तो म्हणाला, " पेनीवेज ! तिच्याइतकी देखणी स्त्री तूं जन्मांत पाहिली नसशील ! सांग खरं कीं नाहीं ! त्या दिवशीं मी तिला जत्रेंत पाहिलं तेव्हांच मला वाटायला लागलं कीं इतके दिवस तिला एकटं सोडून मला रहावलं तरी कसं ! पण त्या वेळीं त्या खेळाच्या भानगडींत मी गुंतलों होतों. त्यांतून आतां मोकळा झालों हें नशीब माझं. "

—५—

आपली वेषभूषा आटोपून बाहेर पडतांना बाथशीबानें विचारलें, " लिडी ! आतां कशी दिसतें मी ? "

लिडी म्हणाली, " बाईसाहिब आजच्याइतक्या तुम्ही छान कधींच दिसत नव्हतां. पण हो ! अशाच तुम्ही केव्हां दिसत होता तें सांगतें मी......दीड वर्ष होऊन गेलं असेल त्याला. आठवतं तुम्हांला ! अगदीं खवळून तुम्ही आमच्या खोलींत आलांत, तुमच्याबद्दल आणि ट्रॉयबद्दल

चर्चा केली यासाठीं तुम्ही आम्हा साऱ्यांची खरडपट्टी काढली होती— तेव्हां मात्र तुम्ही दिसत होतां अशाच."

बाथशीबा घुटमळत म्हणाली, "साऱ्यांना असं वाटेल कीं बोल्डवुडचं मन जिंकून घेण्यासाठीं माझी सारी खटपट आहे. समारंभाला जायची भीतीच वाटते मला. पण गेलें नाहीं तर त्याचं मन दुखावेल. अशीहि भीति वाटते."

लिडीनें उत्तर दिलें, "बाईसाहेब, तुमचे कपडे तर अगदीं साधे आहेत. यापेक्षां साधा पोषाख करायचा म्हटला तर गोणपाटच नेसायला हवं. तुम्ही इतक्या अस्वस्थ दिसतां त्यामुळंच दुसऱ्यांचं लक्ष तुमच्याकडे ओढलं जातं."

बाथशीबा गोंधळून म्हणाली, "मला काय होतंय् तेंच कळत नाहीं. क्षणांत अगदीं उदास वाटतं, तर क्षणांत उल्हास वाटूं लागतो. गेल्या वर्षभर मी एकटी होतें; तसंच रहावं असं वाटायला लागलंय् मला. आशा नको, भीति नको, सुख नको अन् दुःखहि नको."

लिडी जरा चेष्टेनें म्हणाली, "नुसती कल्पना करा...समजा! बोल्डवुडनं तुम्हांला सुचविलें 'पळून जाऊं या आपण दोघं' तर तुम्ही काय कराल?"

बाथशीबा गंभीर होऊन म्हणाली, "लिडी, फाजीलपणा पुरे झाला हो! असल्या बाबतींत थट्टा चालूं देणार नाहीं मी समजलीस? आणखी कितीक वर्षे मी लग्नच करणार नाहीं आणि केलंच तर तुला नाहीतर दुसऱ्या कोणालाहि वाटेल त्यापेक्षां अगदीं निराळ्याच कारणासाठीं तसं करीन मी. चल, निघायची वेळ झाली."

— ६ —

समारंभासाठीं निघण्यापूर्वी बोल्डवुडनें गॅब्रिएल ओकजवळ शेतींतील भागीदारीविषयीं बोलणें काढलें. ओकनें घेतलेल्या मेहनतीची कदर

करण्यासाठीं त्याचा फायद्यांतील हिस्सा बराच वाढवावा, आणि हळूं हळूं साऱ्याच व्यवसायांतून आपलें लक्ष काढून घेऊन, सारे व्यवहार ओकच्या हातांत द्यावेत असा बोल्डवुडचा बेत होता; परन्तु ओकला सारखी शंका वाटत होती कीं बाथशीबाशीं आपलें लग्न होणार ही गोष्ट बोल्डवुड धरून चालला असला तरी ती सहजपणें शक्य होणारी नव्हे.

ओक निघून गेल्यावर बोल्डवुडनें एका कपाटाचें कुलूप काढून त्यांतील खणातून एक लहान डबी घेऊन उघडली. लहान लहान हिरे बसविलेली एक नवी आंगठी त्यांत होती. घरासमोरील रस्त्यावर चाकांचे आवाज येऊं लागल्यानें बोल्डवुडनें ती डबी बंद करून काळजीपूर्वक आपल्या खिशांत ठेवून दिली. त्याचा म्हातारा नोकर तेवढ्यांत जिन्याशीं येऊन त्याला म्हणाला, "पाहुणे येण्यास सुरवात झाली. पायीं आणि गाडींतून लोकांच्या झुंडीच्या झुंडी येताहेत."

बोल्डवुड म्हणाला, "आतांच खालीं यायला निघालों होतों मी. आतां चाकांचे आवाज आले — मिसेस् ट्रॉय आल्या कां?"

— "नाहीं साहेब, त्या अजून आल्या नाहींत."

बोल्डवुडच्या चेहऱ्यावर पुनः पूर्वीची उदासपणाची छटा पसरली. तो जिना उतरून खालीं जात असतां त्याचीं बोटें सारखीं त्याच्या मांडीवर नाचत होतीं आणि त्यावरून तो किती अस्वस्थ आणि चिन्ताग्रस्त होता याची कल्पना येत होती.

— ७ —

तिकडे ट्रॉय एक जुनाट पद्धतीचा जाडजूड करड्या रंगाचा ओव्हरकोट अंगांत चढवीत होता. त्याची कॉलर ताठ उभी असून डोक्यावर घातलेल्या टोपीला जवळ जवळ जाऊन भिडली होती. तो पेनीवेजला म्हणाला, "आतां माझी खात्री वाटते कीं मला कोणी ओळखणार नाहीं."

पेनीविजनें ट्रॉयकडे नीट निरखून पाहिलें. तो म्हणाला, "एकूण जायचा निश्चयच केला आहे तुम्ही तर!"

—"अर्थात्! माझा निश्चय झाला आहे."

पेनीविज त्याला म्हणाला, "जाण्याऐवजीं एखादं पत्र कां नाहीं टाकीत तुम्ही त्याला. तुम्ही अगदीं विचित्र परिस्थितींत सांपडला आहांत बरं कां! तुम्ही परत गेलांत तर साऱ्या गोष्टी जाहीर होतील आणि तें कांही ठीक होणार नाहीं मी तुमच्या जागीं असतों तर खुशाल सडा फटिंग बनून राहिलों असतों."

यावर ट्रॉय रागानें म्हणाला, "हा सारा मूर्खपणा आहे. तिकडे माझं घर आहे, शेती आहे, तिच्याजवळ भरपूर पैसा आहे. सारं आबादीआबाद आहे, अन् मी इथं एखाद्या भटक्या मनुष्यासारखा राहिलों आहे. दुपारची भ्रांत पडली आहे मला. अन् दुसरं म्हणजे आतां नुसती चर्चा करण्याची वेळ टळून गेली आहे. आज संध्याकाळींच लोकांनीं मला ओळखलं आहे इथं."

पेनीविज म्हणाला, "तुम्ही बोल्डवुडच्या या नाताळच्या समारंभांत गेलांत तर कांहीं तरी भयंकर घोंटाळा होईल याची याद राखून ठेवा."

ट्रॉय देखील जरा विचारांत पडला. तो म्हणाला, "हं! हें मात्र खरं आहे. त्याच्या घरांत ती आली असली तर माझं कांहीं नीटसं स्वागत होणार नाहीं तिकडे. एखाद्याचं भूत समोर येऊन उभं रहावं त्याप्रमाणें सारे भयभीत होतील. साऱ्यांचं हसणं-खिदळणं बंद होईल आणि सर्वत्र स्मशानशांतता पसरेल. माझंहि अंग शहारलं या कल्पनेनं, पण जाऊं दे. दुसरं काय हवं आणखी...? काठी...! एक हातांत धरायची काठी हवीच मला."

उभ्याउभ्याच एका दमांत एक पेला रिकामा करून ट्रॉय म्हणाला, " आतां साडेसहा झाले आहेत. हळूं हळूं गेलों तरी मी तिथें नऊ वाजायच्या आधींच पोंचेन. "



## ५३. " पेला लागे ओंठा-अन् दैव मारी सोटा "



बोल्डवुडच्या घरासमोर त्याचे कांहीं नोकर अंधारांत उभे राहून कुजबुजत होते. त्यांतला एक म्हणाला, " आज संध्याकाळींच कॅस्टरब्रिजमध्यें तो दिसला होता म्हणे. मलाहि शक्य वाटतं हें. त्याचं प्रेत कोणाच्याच हातीं लागलं नव्हतं. "

दुसरा म्हणाला, " हा सारा प्रकार अगदीं चमत्कारिक आहे. तिच्या कानावर यांतलं कांहीं गेलं नसेल अजून. "

" एक शब्दहि नाहीं. पण तो जिवंत असून, आसपास फिरत असला तर नक्की कांहीं तरी घोंटाळा करणार ! लोक म्हणतात तें खरं असलं तर या बाईची दया येते मला. तो अखेर वाटोळं करणार तिचं. "

दुसरा एक मनुष्य थोड्या आशेनें म्हणाला, " तसं नव्हे. कदाचित् तो पुनः येऊन सारे व्यवहार पाहूं लागेल.

" या मनुष्याशीं संबंध ठेवण्याची अवदसा कोठून आठवली तिला कोण जाणे ! "

या नोकरांचें असें बोलणें चालू असतां स्वतः बोल्डवुड अस्वस्थपणें बाहेर येऊन फाटकाशीं टेंकला. त्यानें अगदीं हळू आवाजात काढलेले शब्द अंधारांत उभ्या असलेल्या सर्व लोकांच्या कानीं स्पष्टपणें ऐकूं आले. "परमेश्वर करो, अन् ती येवो. नाहीं तर या रात्रीं दुःखच माझ्या पदरीं येणार आहे. 'लाडके! का बरं अत पहातेस माझा असा!"

यानंतर थोड्याच मिनिटांत उतरणीवरून एका छोट्या गाडीच्या चाकाचा आवाज आला आणि ती गाडी दाराशीं थांबली. बोल्डवुडनें घाईघाईनें जाऊन दार उघडलें. त्यानें आपल्या भावना आवरून साध्या शब्दांत बाथशीबाचें स्वागत केलें. तिला तो आंत घेऊन जात असता तिचें सहज हास्य आणि उशीर झाल्याबद्दल माफी मागणारे शब्द त्यांच्या कानीं आले आणि दार बंद झालें.

इकडे बोल्डवुडच्या आणि बाथशीबाच्या नोकरांनीं मिळून वॉरन्च्या दुकानाकडे आपला मोर्चा वळविला. बोल्डवुडच्या निष्ठेबद्दल त्याना सहानुभूती वाटत असून ट्रॉयला ते शिव्याशाप देत होते.

ते वॉरनच्या दुकानाशीं येतात तों दाराशीं उभा राहून दुकानांत चाललेलें संभाषण ऐकत असलेला ट्रॉय त्यांना दिसला. त्याला पाहून ते सारे आले तसेच गुपचुप परत निघाले. आता आपण काय करावें याचा त्यांच्यामध्यें खल सुरू झाला. अखेर लाबन टॉल यानें आंत जाऊन बाथशीबाला सूचना द्यावी असें सर्वानुमतें ठरलें; पण अशी बातमी सांगून तेथील समारंभातील वातावरण बिघडवून टाकण्याचा धीर न झाल्यानें तो कांहीं न बोलतां गेला तसाच मुकाट्यानें परत आला.

इकडे बाथशीबालाहि त्या समारंभांत स्वस्थता वाटत नव्हती. कसें तरी करून थोडा वेळ तेथें बसून, हळूंच काढता पाय घ्यावा असा तिचा विचार होता. तासभर गप्पागोष्टी करून, उत्सव पाहून झाल्यावर बाथशीबा तेथून जाण्याची तयारी करण्यासाठीं शेजारच्या लहान खोलींत गेली. ती तेथें जाऊन क्षणहि झाला नसेल तोंच स्वतः बोल्ड-

वुडच तेथें येऊन उभा राहिला आणि म्हणाला, " मिसेस् ट्रॉय ! आतांशी सुरवात होतेय् समारंभाला......एवढ्यांत निघालांत कीं काय तुम्ही ! "

" तुमच्याशीं बोलण्याची मी संधीच पहात होतों. मला काय बोलायचं आहे तें तुमच्या ध्यानांत बहुधा आलं असेलच ! "

बाथशीबा अस्वस्थ होऊन खालीं पहात उभी होती बोल्डवुडनें उत्सुकतेनें विचारलें, " मग देतां ना तुम्ही तें वचन ? मी तें कुठेंहि जाहीर करणार नाहीं; पण मला तुमचं वचन पाहिजे. पांच वर्षे, नऊ महिन्यांनीं माझ्याशीं लग्न करण्याचं वचन ! तें देणं तुमचं कर्तव्य आहे आतां. "

बाथशीबा उत्तरली, " मलाहि तसं वाटतं. तुमची आग्रहाची मागणी असेल तर देतें मी तें. पण माझ्यांत आतां फार बदल झाला आहे. मी एक दुःखी स्त्री आहे आणि......"

" एक सुंदर स्त्री आहे " बोल्डवुडनें तिचें वाक्य पुरें केलें. परंतु या शब्दांचा तिच्यावर फारसा परिणाम झाला नाहीं. अगदीं निर्विकार-पणें ती म्हणाली, " या बाबतींत कोणतीहि भावना शिल्लक राहिली नाहीं. जर मला वचन देणं जरूरच असलं तर एखादी कर्जफेड करावी तशा रीतीनं मी तें वचन देईन. पण तें अर्थात् सशर्त.........मी खरोखरच विधवा झालें असेन तर. "

" मग तरी पांचसहा वर्षांनीं तुम्ही लग्न कराल ना माझ्याशीं ? " बोल्डवुडनें उत्सुकतेनें विचारलें.

त्यावर टाळाटाळ करीत ती म्हणाली, " मला इतकं बांधून घेऊं नका. मी दुसऱ्या कोणाशींहि लग्न करणार नाहीं. "

" पण तुम्ही वेळ दिली नाहींत तर त्या वचनांत कांहींच अर्थ उरणार नाहीं. "

तरी बाथशीबाची खात्री पटेना. ती अगदीं अस्वस्थ झाली आणि म्हणाली, " त्यांच्या मृत्यूबद्दल अजून बराच संदेह आहे. असं वचन द्यावं कीं नाहीं याबद्दल मला एखाद्या वकिलाचा सल्ला घेऊं द्या. "

बोल्डवुड उत्तरला, " एकदांचे ते शब्द तुम्ही बोलून टाका, म्हणजे तो विषयच संपला. कोणीहि केलं नसेल इतकं प्रेम मी तुमच्यावर केलं आहे. मी इतक्या यातना सोसल्या आहेत कीं त्या तुम्हाला कळल्या असत्या तर एखाद्या कुत्र्यालाहि इतक्या यातना तुम्ही होऊं दिल्या नसत्या. आतां तरी कृपा करा. माझं सारं जीवन मी तुम्हाला अर्पण करायला तयार आहे; एवढा थोडा तरी त्याग तुम्ही माझ्यासाठी करा. "

बाथशीबा इतकी अस्वस्थ झाली होती कीं तिच्या झग्याला लावलेले नक्षीचे कांठ देखीस कंप पावूं लागले होते ती म्हणाली, "ठीक आहे. ते परत आले नाहींत, आणि आपण दोघें जगलों-वाचलों तर आजपासून सहा वर्षांनीं मी तुमच्याशीं लग्न करीन. "

" आणि त्या वचनाचें प्रतीक म्हणून तुम्ही या वस्तूचा स्वीकार करावा. " बोल्डवुडनें तिच्याजवळ येऊन, आपल्या दोन्ही हातांत तिचा एक हात धरून आपल्या हृदयाशीं नेला. त्याच्या हातांतली वस्तू पाहून बाथशीबा उद्गारली, " हें काय ! ही अंगठी नाहीं घालतां येणार मला. आपण वचनबद्ध झालों आहोंत तें कोणालाहि कळवायची इच्छा नाहीं माझी. " त्याच्या हातांतून आपला हात सोडवून घेतां न आल्यानें अगदीं त्रस्त होऊन तिनें जमिनीलाच एक लाथ मारली आणि पुनः तिचे डोळे पाण्यानें भरले.

बोल्डवुडचा आग्रह चालू होताच. तो म्हणाला, " नुसत्या वचनाची ही खूण आहे. आपण केलेल्या करारावरचं शिक्कामोर्तबच आहे हें " असें म्हणून त्यानें तिच्या बोटांत ती अंगठी सरकावून दिली.

बाथशीबानें एका खुर्चीवर अंग टाकून रुमालानें आपलें तोंड झांकून घेतलें.

बोल्डवुडनें विचारलें, "आणि सहा वर्षांच्या गुप्त वचनबद्धतेच्या काळानंतर आपलं लग्न होणार ना?"

यावर बाथशीबाला कोणताहि प्रतिकार करण्याची शक्ति न राहिल्यानें ती म्हणाली, "तुमची तशीच इच्छा आहे तर मला वाटतं तेंहि झालं पाहिजे."

बोल्डवुडनें आनंदानें तिचा हात दाबून तो सोडून दिला आणि तो म्हणाला, "आतां मी खरोखर सुखी झालों. देव तुझं भल करो." असें म्हणून तो खोलींतून निघून गेला. थोड्याच वेळानें बाथशीबा खालीं आली. बाहेर जाण्याआधीं समारंभाला जमलेल्या लोकांकडे अखेरची नजर टाकण्यासाठीं ती जिन्याच्या तळाशीं जरा थांबली. तेथें कांहीं लोक गोळा होऊन, आपापसात कुजबुजत होते. त्यांच्या चमत्कारिक वागण्याकडे लक्ष जाऊन बोल्डवुडनें त्यांना विचारलें, "कसली चर्चा चाललीय् एवढी तुमची?"

त्याच्याकडे वळून एक मनुष्य अस्वस्थ होऊन म्हणाला "लाबन टॉलच्या कानांवर कांही तरी बातमी आली आहे!"

बोल्डवुड आतां फार खुषींत होता. त्यानें पुनः विचारलें, "कसली बातमी? कोणाचं लग्न झालंय्? ठरलंय्? कोणी जन्मलय् का मेलय? तुम्हांला कांहीं सांगायचं असल तर स्पष्ट सांगून टाका, नाहीं तर दुसऱ्या नाचाला सुरुवात करा पाहूं!"

—एवढ्यांत दारावर एक जोराची थाप पडली. एक मनुष्य लगेच दार उघडून बाहेर गेला आणि आंत येऊन म्हणाला, "मिसेस् ट्रॉय याना बोलावणं आलं आहे!"

बाथशीबा म्हणाली, "मी अगदीं तयार आहे. पण बोलावणं पाठवायला मी नव्हतं सांगितलं."

दाराशीं असलेला मनुष्य म्हणाला, "बाईसाहेब, बाहेर एक नवखा मनुष्य आला आहे."

बोल्डवुड म्हणाला, " त्याला आंत यायला सांगा. "

हा निरोप गेला आणि नखशिखांत कपड्यांनीं आच्छादलेल्या अवस्थेंत ट्रॉय दारांत येऊन उभा राहिला. सगळीकडे स्मशानशांतता पसरली आणि साऱ्यांचे डोळे त्या आंत आलेल्या मनुष्याकडे लागले.

ट्रॉय दालनाच्या मध्यभागीं आला. त्यानें आपली टोपी काढून घेतली. कोटाची कॉलर खालीं वळविली आणि सरळ बोल्डवुडच्या चेहऱ्याकडे नजर लावली. तरी देखील बोल्डवुडला प्रथम त्याची ओळख पटली नाहीं. नशिबानें त्याची जी क्रूर थट्टा चालविली होती तिचें मूर्तिमंत प्रतीक म्हणजे हा मनुष्य ! यापूर्वी त्याच्या सुखांत ट्रॉयनेंच माती कालविली होती. त्याला तडफडत ठेवून सारा आनंद हिरावून नेला होता आणि याच गोष्टी करण्यासाठीं तो पुनः दुसऱ्यांदा तेथें आला होता. ट्रॉयचें विचित्र हृदयशून्य हास्य ऐकल्यावर मात्र बोल्डवुडला त्याची ओळख पटली.

मग ट्रॉय बाथशीबाकडे वळला. तिची अगदीं केविलवाणी अवस्था झाली होती. जिन्याच्या शेवटच्या पायरीवर ती अगदीं सुन्न होऊन बसली होती. तिच्या तोंडाला कोरड पडली होती; चेहऱ्यावर प्रेतकळा आली होती. तिचे काळेभोर डोळे शून्यपणें त्याच्याकडे लागले होते. जणूं काय हें सारें एखादें भयंकर स्वप्नच आहे कीं काय, असा तिला भास होत असावा.

मग ट्रॉय म्हणाला, " बाथशीबा ! मी तुला बोलवायला आलों आहे. "

तिनें कांहींच उत्तर दिलें नाहीं.

ट्रॉय अधिकारवाणीनें म्हणाला, " चल ! माझ्याबरोबर घरीं चल ! " तिच्याकडे जाऊन, दरडावून ट्रॉय तिला म्हणाला, "चला बाईसाहेब ! मी काय म्हणतों तें ऐकूं येतंय् कीं नाहीं ? "

शेकोटीजवळून कुठून तरी खोल, खोल अगदीं दुरून एखादा आवाज यावा तशा स्वरांत शब्द आले, " बाथशीबा ! जा तुझ्या

नवऱ्याबरोबर." हा आवाज बोल्डवडचा आहे असें कोणालाहि ओळखूं आलें नाहीं. अचानक आलेल्या निराशेमुळें तो अगदीं बदलून गेला होता. तरी बाथशीबानें कांहींच हालचाल केली नाहीं. सत्यस्थिति अशी होती कीं, बाथशीबा जरी बेशुद्ध नव्हती तरी तिचे हातपाय अगदीं गळाले होते. डोळ्यांपुढे अंधेरी आली होती आणि तिचा मेंदूहि बधिर झाला होता.

ट्रॉयनें तिला आपल्याकडे ओढून घेण्यासाठीं हात पुढें केला तेव्हां मात्र ती लगेच मागें सरली. आपल्याबद्दल तिला स्पष्टपणें वाटणारी ही धास्ती पाहून ट्रॉयला राग आलेला दिसला आणि त्यानें तिचा हात धरून जोरानें ओढला. त्याच्या या पकडीनें तिला चिमटा बसला म्हणून असो कीं केवळ त्याच्या स्पर्शामुळें असो, त्यानें हात धरल्याबरोबर तिनें सारें अंग पिळवटून एक आर्त किंकाळी फोडली.

ही किंकाळी कांहीं क्षणच घुमत राहिली असेल तों तिच्या मागोमाग एकाएकी एक कानठळ्या बसविणारा प्रचंड आवाज खोलींत घुमला. त्यामुळें सारे स्तिमित होऊन गेले. त्या धक्कयानें तेथील लांकडी पडदी देखील हादरली आणि सारी जागा करड्या रंगाच्या धुक्यानें भरून गेली.

सारे गोंधळून बोल्डवुडकडे पाहूं लागले. तो उभा होता त्याच्यामागें दोन बंदुका ठेवण्याची एक मांडणी होती. ट्रॉयनें हात धरल्यावर बाथशीबानें किंकाळी फोडली होती ती ऐकल्यावर बोल्डवुडच्या निराश चेहऱ्यांत एकदम बदल झाला. त्याच्या कपाळावरील शिरा तट्ट फुगल्या आणि डोळ्यांत वेडाची भयंकर चमक दिसूं लागली. चटकन् वळून त्यानें एक बंदूक उचलली; तिचा घोडा चढवून नेम धरून ती ट्रॉयवर झाडली.

क्षणांत ट्रॉय खालीं कोसळला. या दोन मनुष्यांमधील अंतर इतकें कमी होतें कीं त्या बंदुकींतील लहान लहान छर्रे न पसरतां एखाद्या गोळीप्रमाणें त्याच्या शरीरांत घुसले. तो घसा खरडून मोठ्यानें ओरडला.

त्याला एक झटका आला, मग सर्व गात्रें शिथिल होऊन तो निश्चेष्ट होऊन पडला.

बोल्डवुडची बंदूक डबल नळीची होती. बंदुकीच्या घोड्याला आपला गळपट्टा बांधून, दुसऱ्या बाजूवर पाय ठेवून बोल्डवुडनें ती नळी आपल्याकडे वळविली आणि दुसऱ्या नळींतील बार तो आपल्यावर उडविणार इतक्यांत त्याच्या नोकरानें त्या बंदुकीवर एक प्रहार केला. त्यामुळें बंदुकींतील छर्रे वरच्या तुळईत जाऊन शिरले. बोल्डवुड धांपा टाकीत म्हणाला, "कांहीं हरकत नाहीं. मला मरायला दुसरा मार्ग मोकळा आहे." आपल्या नोकरापासून सुटका करून घेऊन बाथशीबाकडे तो गेला. तिच्या हाताचें चुंबन घेऊन, दार उघडून, तो तडक बाहेरच्या अंधारांत नाहींसा झाला. त्याला प्रतिबंध करावा हें कोणालाहि सुचलें नाहीं.



## ५४. "मरणांतानि वैराणि !"



हरस्त्यानें पुढें जाऊन बोल्डवुड कॅस्टरब्रिजच्या दिशेला वळला. रात्रीं अकरा ते बाराच्या दरम्यान तो कॅस्टरब्रिज शहरांत शिरला. तो एका चिरेबंदी कमानीसमोर उभा राहिला. या कमानींत एक लोखंडी खिळे बसविलेलें मोठें दार होतें. तेथील तुरुंगाचें तें प्रवेशद्वार होतें.

त्यानें घंटा वाजविल्यावर बऱ्याच वेळानें एक लहान दिंडी उघडली आणि तेथील द्वारपाल बाहेर आला. पुढें होऊन बोल्डवुडनें हलक्या आवाजांत त्याच्या कानांत कांहींतरी सांगितलें. बोल्डवुड आंत शिरल्यावर

त्याच्यामागें तुरुंगाचें दार बंद झालें. त्यानंतर बोल्डवुड तेथून कधींच बाहेर पडला नाहीं.

यापूर्वीच सारें वेदरबरी गांव खडबडून जागें झालें होतें. बोल्डवुडच्या नाताळच्या समारंभाच्या भयंकर कृत्यानें कसा शेवट झाला हें सार्‍यांना कळून चुकलें होतें. बोल्डवुड निघून गेल्यावर पांच मिनिटांनीं ओक घरांत गेला तेव्हां तेथील देखावा भयंकर दिसत होता. सार्‍या स्त्रिया भेदरून भिंतीशीं घोळका करून उभ्या होत्या. पुढें काय करावें या विचारानें तेथील लोकहि गोंधळून गेले होते. परंतु बाथशीबा मात्र अगदीं बदलली होती. ट्रॉयचें डोकें मांडीवर घेऊन ती जमिनीवर बसली होती. त्याचा एक हात आपल्या हातांत घेऊन दुसर्‍या हातानें त्याच्या छातींतील जखमेवर तिनें आपला हातरुमाल दाबून धरला होता. त्याच्या जखमेंतून अगदीं थोडा रक्तस्राव झालेला दिसत होता. या कौटुंबिक स्फोटाच्या हादर्‍यानें बाथशीबा पुनः पूर्वीप्रमाणें सांवरली होती. मधूनच तिला आलेली बधिरता नष्ट होऊन या प्रसंगाला तोंड देण्यासाठीं ती तयार झाली.

गॅब्रिएल आंत आल्यावर बाथशीबा निर्जीवपणें त्याला म्हणाली, " तातडतोब घोड्यावरून कॅस्टरब्रिजला जा आणि डॉक्टरला घेऊन ये. बोल्डवुडनें माझ्या पतीला गोळी घातली आहे. " या साध्या आणि शांत शब्दांत एखाद्या दुःखांत नाटकांतील आवेशपूर्ण भाषणापेक्षां अधिक सामर्थ्य होतें. काय झालें आहे याची नीटशी कल्पना येण्याआधींच ओक घाईनें बाहेर गेला आणि घोड्यावर खोगीर टाकून कॅस्टरब्रिजकडे निघाला.

रात्र अंधारी होती, फार उशीर झाला होता आणि प्रवास बराच दूरचा होता. अशा अडचणीमुळें डॉक्टरला येण्यास बराच विलंब लागला. यामुळें बोल्डवुडनें बंदूक झाडल्यापासून डॉक्टर त्या घरीं येईपर्यंत तीन तास उलटून गेले. झालेलें सर्व वर्तमान सरकारी अधिकार्‍यांना कळविण्यासाठीं ओकला कॅस्टरब्रिजमध्यें आणखी थोडा वेळ थांबावें लागलें. तेव्हां त्याला कळून आलें कीं बोल्डवुडदेखील कॅस्टरब्रिज शहरांत आला असून तो स्वतः पोलिसच्या स्वाधीन झाला आहे.

मध्यंतरीच्या काळांत वेदरबरी येथें आलेला डॉक्टर बोल्ड-वुडच्या घरांत शिरला तर तेथें अंधार आणि सारी सामसूम आहे असें त्याला आढळून आलें. घराच्या मागील बाजूच्या स्वयंपाकघरांत गेल्यावर त्याला एक म्हातारा गडी भेटला. त्याच्याजवळ त्यानें विचारपूस केली. तो म्हणाला, "मिसेस् ट्रॉय, ट्रॉयला आपल्या घरीं घेऊन गेली आहे. ती घेऊन गेली तेव्हां तो मेलेलाच होता.

डॉक्टर उसळला, "तिला असें करण्याचा बिलकुल अधिकार नव्हता. आतां प्रेताची चौकशी होणें जरूर आहे. त्यानंतर काय करायचं तें समजून घेण्यासाठीं तिला वाट पहाणं जरूर होतं."

नोकर म्हणाला, "होय रावसाहेब, तिला अशी सूचनाहि मिळाली होती कीं कायदेशीर परिस्थिती काय आहे तें कळेपर्यन्त थांबणं बरं. पण ती म्हणाली, 'मला कायद्याची पर्वा नाहीं.'

लगेच डॉक्टर आपल्या गाडींतून टेकडीवर, बाथशीबाच्या घराकडे गेला. बाथशीबाची मोलकरीण लिडी ही त्याला प्रथम भेटली. त्यानें तिला विचारलें, "काय काय व्यवस्था झाली आहे!"

लिडीचा श्वास कोंडल्यासारखा दिसत होता. ती म्हणाली, "मला कांहीं एक माहिती नाहीं. माझ्या मालकिणीनंच सारी व्यवस्था केली आहे!"

—"कुठें आहे ती?" डॉक्टरनें विचारलें.

"वरच्या मजल्यावर, त्यांच्याजवळ. त्यांना घरीं आणून वर नेलं तेव्हां त्या म्हणाल्या, 'मला दुसऱ्या लोकांची आणखी मदत नको आहे.' मग त्यांनीं मला बोलावून आंघोळीचा हौद भरून घेतला. त्या मला म्हणाल्या, 'तुला बरं वाटत नाहीं असं दिसतंय्. खालीं जाऊन पडून रहा' आणि मग त्यांनीं दाराला कुलूप घातलं. नर्स काय, कोणालाहि त्या आंत येऊं देईनात. त्यांना माझी जरूर लागली तर जवळ असावं

म्हणून शेजारच्या खोलींत बसून रहाण्याचा मी विचार केला. एक तासाहून अधिक वेळ त्या खोलींत फिरत असल्याचा आवाज येत होता. पण त्या खोलींतून फक्त एकदां बाहेर आल्या होत्या आणि तें देखील खोलींतल्या मेणबत्त्या जळून गेल्या म्हणून नव्या मागण्यासाठीं. डॉक्टर किंवा वकील आले म्हणजे मला कळवा असं त्या म्हणाल्या. "

याच वेळीं धर्मगुरूला बरोबर घेऊन ओकहि तेथें आला. लिडीच्या मागून ते सारे वरच्या मजल्यावर गेले. जिना चढून ते वर गेले तेव्हां सर्वत्र स्मशानशांतता पसरली होती. लिडीनें दारावर थाप मारल्यावर कुलूप काढून बाथशीबानें दार उघडलें. तिचा चेहरा अगदीं शांत आणि गंभीर होता. ती हलक्या आवाजांत पुटपुटली, " डॉक्टरसाहेब, तुम्ही अखेर आलांत म्हणायचें. वकिलसाहेबहि आहेत बरोबर वाटतं. ठीक आहे. सारी व्यवस्था झाली आहे, आतां कोणीहि येऊन त्यांच्याकडे पहायला हरकत नाहीं."

यानंतर ती तडक दुसऱ्या खोलींत निघून गेली.

बाथशीबा निघून गेल्यावर सर्वांनीं आंतल्या खोलींत नजर टाकली. कपाटावर ठेवलेल्या मेणबत्त्याच्या प्रकाशांत खोलीच्या पलीकडील भागांत शुभ्र कपड्यांत गुंढाळलेलें एक उंच बांध्याचें ताठरलेलें मृत शरीर त्यांना दिसलें. डॉक्टर आंत जाऊन थोड्या वेळानें जिन्याजवळ असलेल्या ओक आणि धर्मगुरु याच्याकडे परत आला. तो हलक्या आवाजांत म्हणाला, " तिनें म्हटल्याप्रमाणें सारी व्यवस्था खरोखरच केली आहे. कपडे काढून मृत शरीर उत्तरक्रियेच्या कपड्यांत व्यवस्थितपणें गुंढाळून ठेवलें आहे. हें सारं एवढ्याशा पोरीनं केलं ! छेः, कल्पनाच करवत नाहीं. एखाद्या समदर्शी योग्याप्रमाणं तिचा आपल्या मनावर ताबा असला पाहिजे. "

तेवढ्यांत हलक्या आवाजांत उच्चारलेले पुढील वाक्य त्यांच्या कानावर आले, " एका पत्नीचें तें हृदय आहे एवढेंच. "

त्यांनीं वळून पाहिलें तों बाथशीबाच तेथें येऊन उभी होती. वरील शब्द तिनें उच्चारले मात्र तोंच ती मूकपणें जमिनीवर कोलमडली.

आतांपर्यंत तिनें दाखविलेलें धैर्य हें नैसर्गिक नसून तिनें आपल्या इच्छाशक्तीच्या बळावर सारें काम धीरानें तडीस नेलें असावें हें त्यावरून सिद्ध होत होतें. आतां इतका प्रचंड ताण सहन करण्याची जरुरी उरली नाहीं याची तिला जाणीव झाल्यानें तिची कार्यशक्ति संपुष्टांत येऊन ती बेशुद्ध पडली.

सारी रात्र बाथशीबा कण्हत होती आणि पुटपुटत होती, " सारा माझाच दोष आहे; मग मी कशाला जगावं ! देवा रे-- कशाला जगूं मी ! "



## ५५. " वाढुं दे कारागृहाच्या भिंतींची उंची किती ! "



कॅस्टरब्रिजच्या मध्यावरील यालबरी टेकडीवर मार्चमधील एका दिवशीं बरेच लोक जमले असून त्यांपैकीं बहुतेकांचे डोळे उत्तर दिशेकडे लागले होते. अर्ध्या तासानंतर त्या बाजूला थोडी धूळ उडत असलेली दिसूं लागली आणि थोड्याच वेळांत पश्चिम विभागांतील फिरतीवर असलेले दोन न्यायाधीश एका गाडींतून तेथें येऊन पोहोंचले. तेथें असलेल्या तुतारीवाल्यांनीं एकच गजर केला आणि न्यायाधीश दुसऱ्या गाडींत जाऊन बसले. तुतारीवाले, भाले घेतलेले शिपाई यांसह त्या न्यायाधीशांची मिरवणूक कॅस्टरब्रिज शहराकडे निघाली. वेदरबरीचे लोक मात्र या न्यायाधीशांचें दर्शन घेऊन लगेच आपल्या घराकडे परतले. जोसेफ पुअरग्रास, कोगन वगैरे वेदरबरीचे कामगार त्या घोळक्यांत होते

आणि न्यायाधीशांच्या चर्येवरून ते बोल्डवुडच्या खटल्यांत दया दाखवतील कीं कठोरपणें न्याय करतील याबद्दल ते आपसांत चर्चा करीत होते.

त्या दिवशीं दुपारीं एका नवीनच गोष्टीचा शोध लागला; आणि त्यामुळें बोल्डवुडची स्थिती आणि त्याचीं कृत्यें यांचें अगदीं नव्यानें स्पष्टीकरण होऊं लागलें.

ग्रीन हिलच्या जत्रेपासून ख्रिसमसच्या उत्सवापर्यंत बोल्डवुडची मनस्थिति अत्यंत अस्वस्थ झाली होती हें त्याच्या परिचयाच्या व्यक्तींना माहीत होतें. परन्तु त्याच्या वागणुकींत मानसिक विकाराचीं स्पष्ट चिन्हें दिसत आहेत याची कल्पना फक्त बाथशीबा आणि ओक यांनाच होती आणि त्यांनाहि ती अगदीं ओझरती अशी आली होती. एके दिवशीं दुपारीं कुलूप लावलेल्या एका कपाटांत कांहीं अगदीं चमत्कारिक वस्तूंचा संग्रह आढळला. बाथशीबाच्या आवडत्या पद्धतीचे साटीन, मखमल वगैरे भारी कापडाचे अनेक झगे तेथें रचून ठेवले होते. सर्वांत विशेष म्हणजे एका दागिन्याच्या डब्यांत उंची कारागिरीचीं चार भारी सुवर्णकंकणें, लॉकेट आणि अंगठ्या या वस्तू आणून ठेविल्या होत्या. त्या अत्यंत काळजीनें कागदांत गुंडाळून ठेवल्या असून प्रत्येक पुडक्यावर **बाथशीबा बोल्डवुड** अशी चिठ्ठी लावून ठेविली होती आणि त्यांवर त्यानंतर सहा वर्षांनीं येणारी तारीखहि घातलेली होती. चिन्ता आणि प्रेम यांमुळें वेडावलेल्या मनस्थितीचा हा शोचनीय पुरावाच होता. ओक कॅस्टरब्रिजहून खटल्याचा निकाल ऐकून वॉरनच्या दुकानांत शिरला तेव्हां तेथें या गोष्टीचीच चर्चा चालली होती. सर्वांची अपेक्षा होती त्याप्रमाणें बोल्डवुडनें आपला अपराध कबूल केला होता आणि त्याला मृत्यूची शिक्षा फर्मावण्यांत आली होती.

बोल्डवुडला दिलेल्या शिक्षेचा फेरविचार करावा असा अर्ज तेथील लोकांनीं केला आणि त्यासाठीं योग्य अशीं कारणेंहि त्यांत नमूद केलीं होतीं. या अर्जाचा निकाल काय होतो इकडे वेदरबरींतील लोकांचे डोळे उत्सुकतेनें लागून राहिले होते.

बोल्डवुडला मृत्यूची शिक्षा फर्मावण्यांत आल्यापासून पंधरा दिवसांनीं एका शनिवारीं आठ वाजतां त्याला फांशी देण्यांचें ठरलें होतें. शुक्रवार संध्याकाळपर्यंत लोकांच्या अर्जाचें उत्तर आलें नव्हतें. गॅब्रिएल कॅस्टर-ब्रिजच्या तुरुंगांत बोल्डवुडचा निरोप घेण्यासाठीं त्यावेळीं जाऊन आला. तो घरीं पोंचला तेव्हां अंधार पडला होता आणि खेड्यांतील अर्धे लोक त्याला भेटण्यासाटीं सामोरे आले होते.

गॅब्रिएल शांत मुद्रेनें म्हणाला, " कांहीं बातमी नाहीं आणि मला वाटतं आतां आशेलाहि जागा उरली नाहीं. दोन तासांहून अधिक काळ मी त्याच्या सहवासांत काढला. "

स्मॉलबरीनें विचारलें, " बोल्डवुडनं हें कृत्य केलं तेव्हां खरोखर तो वेडाच्या भरांत होता असं तुम्हाला वाटतं काय ! "

ओकनें उत्तर दिलें, " सत्याला स्मरून म्हणायचं तर मला तसं वाटत नाहीं; पण आपण त्याबद्दल पुनः केव्हां तरी बोलूं. मालकिणीच्या स्थितींत कांहीं बदल झाला आहे कां ? "

— ' कांहीं नाहीं ! "

' ओक आला कां ? आणि कांहीं बातमी आली कां ? ' असं त्या सारखं विचारीत असतात. आणि ' नाहीं, नाहीं ' असं उत्तर देतां देतां आम्हांला कंटाळा येतो. आतां तूं आला आहेस हें जाऊन सांगूं का त्यांना ? "

ओकनें उत्तर दिलें, " नको, अजून थोडी आशेला जागा आहे. लाबन टॉल ! आज रात्रीं तूं कॅस्टरब्रिजमध्यें थोडा वेळ तेथें राहून, बारा वाजतां परत ये. रात्रीं अकरापर्यन्त कांही उत्तर आलं नाहीं तर मग कांहीं आशा नाहीं असं सारे म्हणतात. "

लिडी म्हणाली, " देव करो आणि त्याचं मरण टळो. जर तसं झालं नाहीं तर बाथशीबालाहि खचित वेड लागेल. गरीब

बापडी ! तिला भयंकर यातना सोसाव्या लागल्या आहेत. कोणालाहि दया येईल तिची ! ”

कोगननें विचारलें, “ त्यांच्यांत फार बदल झाला आहे कां ग ? ”

लिडी उत्तरली, “ नाताळनंतर तूं त्यांना पाहिलं नसलंस तर तुला ओळखाहि पटणार नाहीं त्यांची ! त्यांचे डोळे इतके केविलवाणे दिसताहेत कीं त्यांना ओळखतांहि येत नाहीं. दोन वर्षांपूर्वी एखाद्या खेळकर मुलीसारख्या दिसत होत्या त्या ! आणि आज त्यांची ही दशा झाली आहे. ”

ओकनें सांगितल्याप्रमाणें लाबन टॉल निघून गेला आणि रात्रीं अकराचे सुमारास खेड्यांतील अनेक लोक त्याची वाट पहाण्यासाठीं कॅस्टरब्रिजच्या वाटेवर फिरत फिरत आले. शेवटीं सारे कंटाळले तेवढ्यांत दुरून घोड्याच्या टापा ऐकू येऊं लागल्या.

गॅब्रिएलनें विचारलें, “ लाबन टॉल ना ? ”

“ होय ! सरकारी हुकूम हातीं आला आहे. बोल्डवुडला मृत्यूची शिक्षा देण्यांत येणार नाहीं. राणीसाहेबांची मर्जी असेल तोंपर्यंत त्याला कैदेंत ठेवण्याचा हुकूम झाला आहे. ”

कोगन भरलेल्या हृदयानें ओरडला, “ शाबास ! भले शाबास !! अजून परमेश्वराची सैतानावर सरशी आहे म्हणावयाची ! ”



## ५६. " श्रिया दुरापः कथमीप्सितो भवेत् ?"



वसंत ऋतूच्या आगमनाबरोबर बाथशीबालाहि नवा हुरूप आला. यापूर्वी तिला येत असलेल्या बारिक तापामुळें ती अगदीं गळून गेली होती. आतां कोणत्याच गोष्टीबद्दल अनिश्चितपणा न उरल्यानें तिचा अशक्तपणाहि बराच कमी झाला. पण आतां ती आपला बराच काळ एकांतवासांत कंठूं लागली होती. ती घरांत तरी कोंडून बसे, नाहींतर फार झालें तर बागेंत जाई. ती साऱ्यांनाच टाळूं लागली— अगदीं लिडीलाहि. आपल्या मनांतल्या गोष्टी ती कोणालाहि सांगेना, आणि कोणाच्या सहानुभूतीची देखिल तिला अपेक्षा नव्हती. जसजसा उन्हाळा वाढूं लागला तसतशी ती अधिकाधिक वेळ मोकळ्या हवेंत काढूं लागली आणि अगदीं जरूर पडल्यानें शेतीवाडीच्या कामांत देखील थोडें लक्ष घालूं लागली.

ऑगस्टमधील एका शुक्रवारीं संध्याकाळीं तिनें नाताळांतील त्या दुःखद प्रसंगानंतर प्रथमच खेड्यांत प्रवेश केला. अद्याप तिच्या गालावर पूर्वीची लाली परत आली नव्हती. तिच्या चेहऱ्याचा फटफटीतपणा काळ्याभोर झग्यामुळे विलक्षणपणें उठून दिसत होता. स्मशानभूमीच्या जवळच्या एका लहान दुकानाजवळ ती जाऊन पोंचली तेव्हां तिला देवळांतून येणारे संगीताचे स्वर ऐकूं येऊं लागले. रस्ता ओलांडून फाटकांतून ती स्मशानभूमींत शिरली व फॅनी रॉबिनची समाधी असलेल्या कोपऱ्याकडे ती वळली. त्या समाधीवरील संपूर्ण शिलालेख वाचीत असतां तिच्या चेहऱ्यावर समाधानाची छटा पसरली. शिलालेखावर प्रथम ट्रॉयनें कोरून घेतलेले खालील शब्द होते.

**ही स्मृतिशिला फॅन्सिस ट्रॉय यानें**
**फॅनी रॉबिन हिच्या प्रिय स्मृत्यर्थ**

**उभारली. ९ ऑक्टोबर, १८–रोजीं तिला मृत्यु आला. तिचें वय वीस वर्षांचें होतें.**

या लेखाखालींच नवीन अक्षरांत पुढील मजकूर कोरलेला होता :—

**याच गर्तेत फ्रॅन्सिस ट्रॉय याचा देहहि पुरलेला आहे. २४ डिसेंबर १८–रोजीं त्याला मृत्यू आला. त्याचें वय सव्वीस वर्षांचें होतें.**

या शिलालेखावरील मजकूर वाचून त्याचें चिंतन करीत असतां बाथशीबाच्या कानावर देवळांतील ऑर्गनचे सूर येऊं लागले. हलक्या पावलांनीं ती देवळाच्या प्रवेशद्वाराशीं जाऊन आंतील संगीत ऐकूं लागली. देवळाचें दार लागलेलें होतें आणि तेथील गायक नवीन स्तोत्र गाण्याचा सराव करीत होते. ते स्वर ऐकून बाथशीबाच्या भावना पुनः स्फुरण पावूं लागल्या. तोंपर्यंत या साऱ्या भावना अलीकडे आपल्या हृदयांतून अगदीं नष्ट झाल्या आहेत असेंच तिला वाटत होतें. देवळांतील गीताचे शब्द स्पष्टपणें तिच्या कानावर आले :—–

**दयामय तेजा ! — ने मज तिमिरांतून ॥**
**दावी पथ पुढतीं नेऊन ॥**

बाथशीबाचा कंठ भरून आला आणि तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या.

बाथशीबानें आपला चेहरा हातांनीं झांकून घेतला होता. त्यामुळें प्रवेशद्वाराशीं आलेली एक व्यक्ति तिला दिसली नाहीं. तिनें भोंवतालीं नजर टाकली तेव्हां तिचा चेहरा आसवांनीं भिजला होता; आणि डोळे अजून अश्रूंनीं भरले होते. तिनें जरा वरमून उद्गार काढला, “ कोण ओक ! तुम्ही किती वेळ उभे आहांत इथें ? ”

तो आदरानें म्हणाला, "बाईसाहेब, अगदीं थोडा वेळ झाला."

"तुम्ही देवळांत जाणार आहांत कां !" बाथशीबानें प्रश्न केला आणि जणूं काय सूचना म्हणून आंतील गीताचे शब्द बाहेर घुमूं लागले.

**भडक दिनाची ओढ मनाला ।**
**भययुत तरिहि गर्व जिवाला ।**
**विसरुनि साऱ्या गतकालाला ।**
**—दावी पथ नेउन ॥**

गॅब्रिएलनें उत्तर दिलें, "स्तोत्रगायकांपैकीं मीहि एक आहे."

बाथशीबा म्हणाली, "खरं कीं काय ! मला माहीत नव्हतं तें. तुमचा निरोप घेतें मी आतां"—

**पूर्वीं ज्यावर प्रीती केली ।**
**विस्मृति ज्याची मध्येंच घडली ॥**

असे आंतून मुलांच्या स्तोत्राचे शब्द आले.

ओक म्हणाला, "मी आल्यानं तुम्ही असं निघून जायला नको. मी आज देवळांत जाणार नाहीं."

कांहीं वेळ ते दोघे जरा अस्वस्थ मनस्थितींतच तेथें उभे होते.

शेवटीं ओक म्हणाला, "किती तरी दिवस झाले, तुम्ही दिसला नाहीं. तुमच्याशीं बोलणंहि झालं नाहीं. तुम्ही निघालां होतांत का देवळांत ?"

बाथशीबा म्हणाली, "माझ्या इच्छेप्रमाणं शिलालेखावर शब्द योग्य रीतीनें कोरले गेले आहेत कीं नाहीं तें पहाण्यासाठीं मी आलें होतें."

ओक तिच्यामागून जात जरा घुटमळत म्हणाला, " शक्य तितक्या लवकर मला एका किरकोळ बाबतीबद्दल तुमच्याशीं बोलायचंय्. नुसती धंद्याची बाबत आहे ती. तुमची परवानगी असेल तर आतांच तिच्याबद्दल बोलेन म्हणतों. "

" होय, अवश्य ! "

" ती बाबत अशी कीं मी कदाचित् लवकरच तुमच्या शेतीवाडीची देखरेख करणं सोडून देण्याचा विचार केला आहे. खरं म्हणायचं म्हणजे मी पुढल्या वसंत ऋतूंत इंग्लंड सोडून जाण्याचा विचार करीत आहे. "

बाथशीबा उद्गारली, " इंग्लंड सोडून जाणार ? तें कां ? "

ओक अडखळत म्हणाला, " मला वाटलं कीं तसं करणंच उत्तम. कॅलिफोर्निया येथें जाऊन नशिबाची परीक्षा पहावी असा माझ्या मनांत विचार आला आहे. "

बाथशीबा म्हणाली, " पण इथें तर सारे म्हणतात कीं तुम्ही बोल्डवुडची सारी शेतवाडी स्वतंत्रपणें पाहणार म्हणून ! "

ओक म्हणाला, " त्याबद्दल प्रथम माझ्याकडे मागणी आली हें खरं; पण अजून निश्चित कांहीं ठरलं नाहीं. हें सारं सोडून जाण्याचीं माझीं कांहीं कारणें आहेत. त्या शेतीवाडीचा दिवाणजी म्हणून एक वर्षाची मुदत मी पुरी करीन. त्यानंतर मात्र मी थांबणार नाहीं. "

बाथशीबा उद्गारली, " गॅब्रिएल ! आणि मी तुझ्याशिवाय काय करूं रे ! तू इथून जाऊं नयेस असं मला वाटतं. तूं माझ्याबरोबर आनंदाचे दिवस पाहिलेस, दुःखाचे दिवस पाहिलेस, इतके दिवस माझी साथ करून आतां तूं मला सोडून जाणं हें अगदीं निष्ठुरपणाचं आहे. माझी तर अशी कल्पना होती कीं, मालक म्हणून दुसरं शेत तूं मक्त्यानं घेतलंस तरी माझ्या शेतीवाडीकडे देखील मधून मधून नजर टाकशील. अन् आतां तर तूं निघून चाललास आणि तेंहि मी अगदीं असहाय स्थितींत असतांना ! "

गॅब्रिएल अगदीं कष्टी होऊन म्हणाला, " होय ! दुर्दैवाची गोष्ट अशी आहे खरी ! "

बाथशीबा घरीं गेली ती या नव्या चिंतेनें त्रस्त होऊन. तिला अखेर एक दुःखद जाणीव झाली कीं आपला अखेरचा अनुयायीहि आपल्याला सोडून निघून जात आहे. बाकीचें सारें जग आपल्याविरुद्ध असतांना या एका मनुष्याची आपल्यावर निष्ठा होती आणि आपली बाजू घेऊन तो नेहमीं भांडत असे. पण आतां अखेर इतर साऱ्या लोकांसारखा तो देखील आपल्याला कंटाळला, आणि पूर्वीची निष्ठा विसरून, जीवनाची लढाई लढण्यास आपल्याला एकटीच टाकून निघून चालला. ............ असेच तीन आठवडे गेले.

आपल्याकडे ओकचें दुर्लक्ष होत आहे याचा अधिक पुरावा तिला दिसून आला. तिच्या लक्षांत आलें कीं आपण यापूर्वी एकांतवासांत रहात असतां शेतीच्या हिशेबाच्या कचेरींत ओक नेहमी येऊन आपली वाट पहात असे. नाहीतर निदान एखादी चिठ्ठी तरी ठेवून जात असे. पण आतां आपण तेथें असूं अशी शक्यता दिसत असली कीं, ओक तेथें बिलकुल येतच नाहीं. आपण तेथें येणार नाहीं असा अंदाज असेल तेव्हांच अगदीं अवेळीं केव्हां तरी तो येऊन जातो.

अशाच उदास मनस्थितींत उन्हाळा उलटून गेला. त्यानंतरचा पानखर ( हेमंत ) ऋतुहि संपून नाताळ येऊन पोंचला. तिच्या कायदेशीर वैधव्याचेंहि एक वर्ष संपलें. ती एकटी राहूं लागली होती, तेव्हांपासून तर सव्वादोन वर्षे पुरीं झालीं होतीं.

नाताळचे दिवशीं ती देवळांत गेली असतां तेथील स्तोत्र-गायकांच्या समूहांत अगदीं बेफिकीरीनें गात असलेल्या ओकचा आवाज बाथशीबाच्या कानावर आला. देवळांतून बाहेर येत असतां पूर्वीप्रमाणें तो रस्त्यांत आपली वाट पहात रेंगाळत असेल अशा आशेनें तिनें भोंवतालीं

पाहिलें. तिच्यामागून तो नेहमींप्रमाणें येत होता; पण बाथशीबाला वळतांना पाहून त्यानें आपली नजर वळविली. फाटकांतून बाहेर गेल्यावर दुसऱ्या वाटेनें जाण्याची जरा संधी मिळाल्याबरोबर तो बाजूला वळला आणि अदृश्य झाला.

या साऱ्या प्रकाराचा दुसऱ्या दिवशीं सकाळीं तर कळस झाला. जिला ती इतके दिवस भीत होती ती कायदेशीर नोटीस तिच्या हातीं पडली. पुढील वर्षी आपण आपल्या नोकरीची मुदत वाढविणार नाहीं असें त्यानें पत्रानें कळविलें होतें. हें पत्र पुढें घेऊन बाथशीबा अक्षरशः रडूं लागली. गॅब्रिएलचें नितांत प्रेम म्हणजे जणूं काय आपला आजीव हक्काचा ठेवा आहे असा तिचा दृढ विश्वास होऊन बसला होता. आतां स्वेच्छेनें त्यानें तो अशा रीतीनें काढून घेतला यामुळें तिला दुःख झालें आणि अपमान झाल्यासारखें वाटलें. आपल्याला पुनः एकट्यानेंच सारे व्यवहार आटोपावे लागणार या कल्पनेनेंच ती भांबावली. पुनः बाजारांत जायचें, मालाची विक्री करायची या कामासाठीं आपल्याजवळ पुरेशी शक्ति पुनः कधींहि रहाणार नाहीं असें तिला वाटूं लागलें. आतां आपण काय करायचें हा तिला प्रश्न पडला. तिला तिचें सारें जीवन वैराण वाळवंटासारखें वाटूं लागलें

सूर्य मावळला. चंद्राची कोर आकाशांत दिसूं लागली. मंद चांदणें सर्वत्र पसरलें होतें. अशा वेळीं बाथशीबा स्वतः उठून ओकच्या घरीं गेली.

ओकच्या खोलींत कुणी दिसत नव्हतें; पण खिडकींतून शेकोटींतल्या ज्वाला मात्र दिसत होत्या. तिनें अस्वस्थ मनस्थितींतच दारावर टकटक केलें. गॅब्रिएलनें दार उघडलें. त्याच्या कपाळावर चांदण्याचा प्रकाश पडला.

बाथशीबानें हलक्या आवाजांत हांक मारली, " मि. ओक, " प्रथम ओकनें तिला ओळखलें नाहीं; पण लगेच तो म्हणाला, " मालकीणबाई! मी तुम्हाला ओळखलं नाहीं—केवढा मूर्खपण हा माझा ! "

बाथशीबा करुणस्वरांत म्हणाली, " गॅब्रिएल आतां फार दिवस मी तुमची मालकीण रहाणार नाहीं हें खरं ना ? "

ओक थोडा अस्वस्थ होऊन म्हणाला, " आहे खरं असं. पण बाईसाहेब, आंत या ना ! थांबा, मी दिवा आणतों. इथं ह्या खुर्च्या आहेत. बसा कीं. " ओकनें दोनतीन खुर्च्या मांडल्या. बाथशीबा खालीं बसली. ओकच्या खोलींतील जुनें लांकडी सामान अनेक वर्षें वापरांत असल्यानें घासलें जाऊन तुळतुळीत झालें होतें. शेकोटींतील ज्वालांचा प्रकाश त्यावर आणि या दोघांच्या चेहऱ्यांवर पडत होता आणि तुळतुळीत लांकडी सामानावरून परिवार्तित होत होता. तसें म्हटलें तर या दोन व्यक्ती एकमेकांच्या पूर्ण परिचयाच्या होत्या पण या नवख्या जागीं नव्या पद्धतीनें त्यांची भेट झाल्यामुळें दोघांनाहि अस्वस्थ आणि अवघडल्यासारखें वाटत होतें ही नवलाची गोष्ट होती. शेतांत किंवा बाथशीबाच्या घरीं उभयतांची भेट होई तेव्हां त्यांना असा अस्वस्थपणा मुळींच वाटत नसे.

बाथशीबा म्हणाली, " मी ही अशी आलें हें तुम्हाला चमत्कारिक वाटलं असेल नाहीं. पण ...... "

ओक म्हणाला, " छे बिलकुल नाहीं. "

—" गॅब्रिएल ! मला वाटूं लागतं कीं मी तुम्हाला दुखवलं आहे. आणि त्यामुळं तुम्ही निघून चाललां आहांत. या विचारानं मला फार वाईट वाटलं आणि आल्यावांचून रहावेना. "

ओक उद्गारला, "मला दुखावलं ! बाथशीबा ! असं कधीं होईल तुमच्या हातून ? "

ती आनंदून म्हणाली, " तसं नाहीं ना ? मग तुम्ही कां निघून चाललांत ? "

ओकनें उत्तर दिलें, " मी आतां परदेशीं जात नाहीं. मी जाऊं नये अशी तुमची इच्छा आहे असं जर मला पूर्वीच कळलं असतं तर

तसा विचारहि मी मनांत आणला नसता. आतां बोल्डवुडच्या शेतीवाडी-बद्दलची सारी व्यवस्था करून झाली आहे आणि ती पंचवीस मार्च रोजीं माझ्या ताब्यांत येणार आहे. त्या व्यवहारांत माझा मार्गे हिस्सा होता हें तुम्हाला माहीत असेलच. तसं असलं तरी पूर्वीप्रमाणं तुमच्या कामाकडेंहि लक्ष देण्याला मला कांहीं आडकाठी नव्हती. फक्त आपल्या दोघांबद्दल लोकांत जी चर्चा चालली आहे त्यामुळें मी तें टाळलं."

बाथशीबा आश्चर्यानें उद्‍गारली, "आपल्या दोघांबद्दलची चर्चा! आणि ही कसली?"

ओक म्हणाला, "तें मला सांगतां येणार नाहीं."

बाथशीबा तरीहि चिकाटीनें म्हणाली, "तें तुम्ही सांगितलं तर फार बरं होईल. यापूर्वी कितीतरी वेळां तुम्ही मला माहिती दिली आहे, उपदेश केला आहे, आणि आतांच सांगायला कां तुम्हाला भीति वाटावी हें मला कळत नाहीं."

यावर ओकला नाखुषीनें सांगावें लागलें, "या चर्चेचा मथितार्थ असा कीं, लोक म्हणतात बोल्डवुडच्या शेतासाठीं हा मनुष्य टपून बसला आहेच आणि पुढेंमागें बाथशीबालाहि हस्तगत करण्याचा त्याचा विचार आहे."

बाथशीबा गोंधळून म्हणाली, "मला हस्तगत करायचं याचा अर्थ काय?"

—"स्पष्ट म्हणायचं म्हणजे, तुमच्याशीं लग्न करायचं. तुम्हीच मला हें सारं सांगायला सांगितलंत, तर आतां मला दोष देऊं नका म्हणजे झालं!"

ओकची अशी कल्पना होती कीं ही बातमी ऐकून आपल्या कानाजवळ एखादी तोफ उडावी तशी बाथशीबा एकदम दचकेल; पण

तशी भीति वाटल्याचें चिन्ह तिच्या चेहऱ्यावर दिसलें नाहीं. उलट ती शांतपणें म्हणाली, " माझ्याशीं लग्न करायचं हा या शब्दांचा अर्थ होता हें माझ्या ध्यानांत आलं नाहीं. ही भाषा अगदींच हास्यास्पद आहे. निदान तसा विचार करण्याची वेळ अजून आली नाहीं हें खरं. "

ओकहि उदासपणें म्हणाला, " खरं आहे. तें अगदींच हास्यास्पद आहे खरं ! "

बाथशीबा चांचरत म्हणाली, " मी एवढंच म्हणालें, अशी वेळ अजून आली नाहीं. "

तरी तिचा रोख लक्षांत न घेऊन, ओक पूर्ववत् गंभीरपणें म्हणाला, " अगदींच हास्यास्पद, आणि मलाहि तसंच वाटतं. "

आतां बाथशीबाचे डोळे आंसवांनीं भरून आले. ती आर्जवानें म्हणाली, " मी म्हणालें, ' अजून वेळ आली नाहीं, अन् माझ्या मनांतला अर्थहि होता—' अजून वेळ आली नाहीं ' एवढाच. माझ्या शब्दांवर विश्वास ठेवायला हवा तुम्ही."

गॅब्रिएलनें तिच्या चेहऱ्याकडे टक लावून पाहिलें; पण ज्वालांच्या मंद प्रकाशांत तिचा चेहरा स्पष्टपणें दिसत नव्हता. त्याला आश्चर्य वाटलें. प्रेमानें तिच्या अधिक जवळ येत तो म्हणाला, " तुमच्यावर प्रेम करण्याची, तुमचं मन जिंकण्याची, आणि अखेर तुमच्याशीं लग्न करण्याची संधी तुम्ही मला द्याल असं जर मला कळलं तर किती बरं होईल ! "

बाथशीबा अगदीं हळूंच म्हणाली, " पण तुम्हांला तें कधींच कळणार नाहीं ! "

—" कां ! "

—" कारण तुम्ही तसं कधीं विचारीतच नाहीं. "

आनंदाचा आणि हास्याचा एक उद्‌गार ओकच्या मुखांतून बाहेर पडला. तो म्हणाला, " माझी प्रिय......"

त्याला मधेंच थांबवून बाथशीबा म्हणाली, " आज सकाळचं तें कठोर पत्र तुम्ही मला पाठवायला नको होतं. त्यावरून असं दिसलं कीं तुम्हाला माझ्याबद्दल कांहीं कांहीं म्हणून वाटत नव्हतं आणि इतर साऱ्या लोकांसारखे तुम्ही देखील मला सोडून जायला निघाला होतांत. खरं तर मी तुमची अगदीं पहिली प्रेयसी होतें आणि तुम्ही माझे प्रियकर होतां हें मी कधीं विसरणार नाहीं. "

ओक हसत म्हणाला, " हें पहा ! बाथशीबा ! तुझ्यासारखी त्रास देणारी तूंच. मी पडलों असा ब्रह्मचारी, अन् तुझ्यासारख्या सुंदर स्त्रीच्या शेतीवाडीचा व्यवहार पहायचा म्हणजे महाकठीण कर्म. त्यांत अधिक म्हणजे मला तुझ्याबद्दल विशेष कांहीं वाटतं हें लोकांना माहीत होतं. आपल्या दोघांचीं नांवं एकत्र जोडून लोक जें कांहीं बोलत त्यामुळं तुझ्या नांवलौकिकाला कमीपणा येईल असं मला वाटूं लागलं.

—" म्हणजे तुमच्या जाण्याचं कारण एवढंच ना ?

—" एवढंच. "

खुर्चीवरून उठून उभी रहात ती उद्‌गारली, " माझी भेटहि घ्यायची तुमची इच्छा दिसली नाहीं तेव्हांपासून तुमच्याबद्दल माझ्या मनांत किती तरी अधिक विचार येऊं लागले. पण आतां जातें मी बाई ! नाहीं तर ' ही कुठें गेली ' म्हणून सगळीकडे शोधाशोध सुरू व्हायची ! "

ते दोघे दाराशीं जात असतां किंचित् हसून ती म्हणाली, " गॅब्रिएल आतां मात्र असं दिसूं लागलंय् कीं, तुम्ही मला मागणी घालण्याऐवजीं मीच तुम्हाला मागणी घालायला आलें !—

ओक म्हणाला, " झालं हें अगदीं बरोबर झालं. किती तरी काळपर्यंत मी तुझ्या तालावर, तुझ्या मागोमाग नाचत आलों आहे आणि आतां तूं एकदांची मला भेटायला आलीस. तेवढंहि सौख्य मला मिळूं देणार नाहींस तूं ? "

ओक तिच्याबरोबर बोलत बोलत टेकडीवरून पुढें गेला. परस्परांच्या हृदयांत असलेल्या भावनांविषयीं त्यांचें फारच थोडें बोलणें झालें. त्यांच्यासारख्या तावून सुलाखून निघालेल्या स्नेहीजीवांना कृत्रिम, गोड गोड आणि प्रेमळ शब्दांची कांहीं जरूर नव्हती.



## ५७. " याचसाठीं केला होता अट्टाहास । शेवटचा दीस गोड व्हावा ॥ "



"अगदीं खासगी, गुप्त, आणि जितका साधा लग्नसमारंभ करतां येईल तेवढा करा ! "

मागें उल्लेखिलेल्या प्रसंगानंतर एका संध्याकाळीं ब्राथशीबानें वरील उद्‌गार ओकच्या जवळ काढले होते. तिच्या इच्छेप्रमाणें अगदीं तंतोतंत व्यवस्था कशी करावी याचा ओकनें तब्बल तासभर विचार केला आणि अखेर तो स्वतःशींच म्हणाला ", ठीक आहे. मग पहिली गोष्ट म्हणजे लग्नाचा परवाना काढणं. "

त्यानंतर कांहीं दिवसानीं एका अंधाऱ्या रात्रीं कॅस्टरब्रिजमध्यें ओक लपून छपून एका धार्मिक अधिकाऱ्याच्या दारांतून बाहेर पडत होता.

घराकडे निघाला असतां त्याच्यापुढें चालणाऱ्या मनुष्याचीं दाणदाण वाजणारीं पावलें त्याला ऐकूं येऊं लागलीं. ओक त्या मनुष्यापुढून निघाला असतां त्याला आढळलें कीं हा तर जॉन कोगन ! त्यानंतर ते दोघेहि बरोबरच खेड्यांत शिरले आणि देवळाच्या मागील लहान गल्लींत येईपर्यन्त ते बरोबरच चालत होते. तेथून लाबन टॉल याच्या झोंपडीकडे जाणारी वाट फुटली होती. अलीकडे या लाबन टॉलची देवळांतला एक दुय्यम अधिकारी म्हणून नेमणूक झाली होती. कोगनला रामराम करून ओक म्हणाला, " आतां मला कांहीं कामासाठीं या वाटेनं जायचं आहे. "

कोगन आश्चर्यानें म्हणाला, " अरे वा ! आज काय काम काढलंय इकडे ओक ? विचारूं कां ? विचारायला हरकत नाहीं ना ? "

या परिस्थितींत कोगनला खरा प्रकार न सांगणं अगदीं वाईट दिसलं असतं; कारण बाथशीबामुळें गॅब्रिएल जेव्हां दुःखीकष्टी असे तेव्हां तेव्हां कोगन हाच त्याचा सच्चा मित्र आणि मदतनीस ठरला होता. गॅब्रिएल त्याला म्हणाला, " कोगन ! एक गुप्त गोष्ट मनांत ठेवतां येईल कां तुला ? "

कोगन उत्तरला, " तुम्ही माझी परीक्षा पाहिली आहे आणि तुम्हाला त्यावरून माहीत झाला आहे माझा स्वभाव. "

ओक म्हणाला, " तें मला ठाऊक आहेच. ठीक. मग सांगतोंच. मालकीणबाई आणि मी उद्यां सकाळीं लग्न करणार आहोंत. "

" खरं कीं काय ? " कोगनच्या तोंडून आश्चर्यानें उद्‌गार निघाला. तो म्हणाला, " कितीकदां या गोष्टीचा मला विचार आला होता. पण इतकं गुप्त कसं राहिलं हें ? असो ! आनंदांत नांदा म्हणजे झालं. "

कोगनचे आभार मानून ओक म्हणाला, " तुला खरं सांगायचं म्हणजे इतक्या गुप्तपणें लग्न उरकायची माझी इच्छा नव्हती आणि तिचीहि इच्छा नव्हती; पण अलीकडेच घडलेल्या कांहीं गोष्टींनंतर हें लग्न

थाटामाटानं होणं अगदींच अयोग्य दिसलं असतं. ती लाजरी आहे, आणि अशा प्रसंगाची तिला धास्ती वाटते. ही सारी व्यवस्था तिला बरं वाटावं म्हणून मी करीत आहे. ”

कोगन म्हणाला, “ आलं ध्यानांत ! मला वाटतं असं करणं; बरोबरहि आहे. यासाठींच तुम्ही टॉलकडे निघालां होतांत तर ! ”

“ होय ! तूंहि माझ्याबरोबर आलास तरी चालेल. ”

ते दोघे पुढें निघाले असतां कोगन म्हणाला, “ मला धास्ती वाटते ती म्हणजे हा सारा प्रकार गुप्त ठेवण्याचे तुमचे सारे श्रम वांया जाणार. कारण अर्ध्या तासांत लाबनची बायको साऱ्या गांवांत या प्रकरणाचा गाजावाजा करणारच ! ”

ओक थांबून म्हणाला, “ खरंच कीं ! असं ती करणारच ! मला हा विचार सुचलाच नव्हता. तरी मला त्याला आज रात्रीं सांगायलाच हवं; कारण भल्या पहाटेंच उठून तो दूर कामावर निघून जात असतो. ”

कोगन ओकला म्हणाला, “ तिचा बंदोबस्त कसा करायचा तें सांगतों मी. तुम्ही जरा आडोशाला उभे रहा. मी दार ठोठावतों आणि लाबनला बाहेर बोलावतों. तो बाहेर आल्यावर तुम्हाला जें सांगायचं तें सांगा. लाबनचं माझ्याशीं काय काम आहे याची त्याच्या बायकोला कल्पनाहि येणार नाहीं. कांहीं तरी शेतीवाडीचं काम आहे असं मी तिला निमित्त सांगतों. ”

कोगन धीटपणें पुढें झाला त्याणि त्यानें दारावर थाप मारली. लाबन टॉलच्या बायकोनेंच पुढें येऊन दार उघडलें.

कोगन म्हणाला, “ लाबनशीं मला थोडं बोलायचं होतं ”

ती म्हणाली, “ ते घरीं नाहींत आणि अकरा वाजेपर्यंत येणारहि नाहींत. त्यांच्याऐवजीं मी आहे कीं इथें. ”

ओक कोगनजवळ कुजबुजला' "तिला निरोप सांगा कीं, उद्यां सकाळीं दहा वाजतां देवळाजवळ मालकिणीनं लाबनला अगदीं न चुकतां बोलावलंय्. न चुकतां यायचं आणि तेंहि उत्तम पोशाख करून यायचं."

कोगननें शंका काढली, "या कपड्याच्या बाबतीमुळं आपला सारा बेत नक्की बिनसणार."

ओक म्हणाला, "त्याला इलाज नाहीं. सांग तिला.

ओकचा निरोप सांगून कोगननें त्याला स्वतःची पुस्ती जोडली, "लाबनला सांगा कीं नक्की आलं पाहिजे-मग वारा, पाऊस, वादळ कांहींहि असो. खरं सांगायचं म्हणजे मालकीणबाई दुसऱ्या शेतकऱ्यांशीं कांहीं भाडेपट्ट्याचे कायदेशीर व्यवहार करणार आहेत त्याच्यावर त्याची सही पाहिजे आहे."

तिच्या प्रश्नांची सरबत्ती सुरू होण्यापूर्वीच कोगननें काढता पाय घेतला. यानंतर त्यांनीं जाऊन धर्मगुरूची भेट घेतली, तीं इतक्या सहजपणें कीं यापुढें कोणाचेंहि कुतूहल जागृत झालें नाहीं. यानंतर गॅब्रिएलनें घरीं जाऊन दुसऱ्या दिवसाच्या समारंभाची तयारी केली.

त्या रात्रीं झोंपीं जाण्यापूर्वीं बाथशीबा लिडीला म्हणाली, "हें बघ, मला जाग आली नाहीं तर उद्यां सात वाजतां नक्की उठव बरं कां!"

—"पण बाईसाहेब! त्याआधींच तुम्ही नेहमीं उठतां कीं!"

—होय, पण उद्यां मला कांहीं महत्त्वाचं काम आहे म्हणून खात्री करून घेणं चांगलं. काम काय आहे तें ती वेळ आली म्हणजे तुला."

परन्तु बाथशीबा आपोआपच पहाटे चार वाजतां जागी

झाली आणि त्यानंतर कांहीं केल्या तिला पुनः झोंप येईना. सहा वाजण्याच्या सुमारास तिची खात्री झाली कीं आपलें घड्याळ बंद पडलें असावें. तिनें जाऊन लिडीचें दार ठोठावलें.

लिडी गोंधळून म्हणाली, "माझी कल्पना होती कीं मीच तुम्हांला हांक मारायचं ठरलं होतं. अजून तर सहा देखील वाजले नाहींत."

बाथशीबा तिला म्हणाली, "नक्की वाजले आहेत. अशी कशी ग थाप देतेस मला लिडी! सात वाजून किती तरी वेळ झाला असावा असं मला वाटतं. होईल तितक्या लौकर माझ्या खोलींत ये. आज तुझ्याकडून मला छानशी वेणी घालून घ्यायची आहे."

लिडी खोलींत आली तेव्हां बाथशीबा तिची वाट पहात होती. तिनें विचारलें, "आज घडणार आहे तरी काय बाईसाहेब?"

बाथशीबाच्या डोळ्यांत एका खोडकर स्मिताची छटा चमकली. ती म्हणाली, "थांब सांगतेंच तुला, आज किनई गॅब्रिएल ओक जेवायला येणार आहेत माझ्याकडे."

"अगबाई, तो ओकच कां! अन् दुसरं कोणी नाहीं? तुम्ही दोघंच कां एकत्र जेवणार आज?"

—"होय."

लिडी जरा शकेखोरपणें म्हणाली, "बाईसाहेब! लोकांत चर्चा सुरू असतां असं करणं इष्ट आहे कां? म्हणतात ना, बायकांची अब्रू असते कांचेसारखी."

बाथशीबाचे गाल आरक्त झाले. जवळपास कोणी नव्हतें तरी तिनें हळूंच लिडीच्या कानांत कांहीं तरी सांगितलें. यावर लिडीचे डोळे विस्फारले आणि ती आश्चर्यानें उद्गारली, "कसली विलक्षण बातमी ही! माझी तर बाई छाती धडधड करायला लागली आहे हें ऐकून!"

बाथशीबा म्हणाली, " माझीहि तशीच स्थिति झालीय् पण आतां यांतून सुटका नाहीं हें खरं. "

—त्या दिवशीं दहा वाजून वीस मिनिटांनीं ओक आपल्या घरांतून बाहेर पडला आणि टेंकडीच्या रस्त्यानें मोठ्या आनंदानें आणि उत्साहानें पुढें निघाला. त्यानें पुढें होऊन बाथशीबाच्या दारावर थाप मारली. दहा मिनिटांनंतर एक मोठी आणि एक छोटी अशा दोन छत्र्या त्या दारापासून देवळाकडे जाणाऱ्या रस्त्यानें धक्यांतून चाललेल्या दिसत होत्या. हें अंतर पाव मैलांपेक्षां जास्ती नसल्यानें या दोन्ही व्यवहारी व्यक्तींनीं ठरविलें होतें कीं तेथवर गाडींतून जाण्याची जरूर नाहीं.

ओकनें गुडघ्यापर्यन्त येणारा लांब कोट घातला होता आणि बाथशीबाच्या अंगावरील झगा तर तिच्या अगदीं जोड्यावर टेंकला होता. यामुळें अगदीं पहिल्यानेंच हातांत हात घालून चाललेल्या छत्रीखालच्या या दोन व्यक्ती म्हणजे ओक आणि बाथशीबा याच होत असें ओळखून काढण्यास एखाद्याला फार बारकाईनेंच पहावें लागलें असतें. बाथशीबाचा पेहराव इतका साधा असूनहि ती अगदीं कायाकल्प झाल्यासारखी दिसूं लागली होती. एखादा फुललेला गुलाब पुनः मिटून त्याची कळी व्हावी असें तिचें मुग्ध सौंदर्य दिसत होतें. तिला मिळालेल्या स्वास्थ्यामुळें तिच्या गालावर पुनः लाली चढली होती.

अनेक वर्षांपूर्वी नार्कोंब हिलवर तिची केशरचना जशी असे तशीच केशभूषा तिनें गॅब्रिएलच्या विनंतीवरून आज केली होती. ओकच्या डोळ्यांना तर ती त्या वेळीं पाहिलेल्या त्या आकर्षक स्वप्नासारखीच दिसत होती. तसें पाहिलें तर ती आतां फक्त तेवीस चोवीस वर्षांची असल्यानें त्यांत फारसें नवल नव्हतें. देवळांत टॉल, लिडी आणि धर्मगुरु हे वाट पहात होतेच; अगदीं थोड्या वेळांत सारा लग्नविधि पार पडला.

—त्या दिवशीं संध्याकाळीं बाथशीबाच्या घरांत ती आणि ओक शांतपणें चहा घेत बसले होते. ओक आतां भरभराटीच्या मार्गावर असला तरी एवढ्यांत रोख पैसा, घर आणि घरांतलं सामान यांचा म्हणण्यासारखा सांठा त्याच्याजवळ नव्हता. उलटपक्षीं बाथशीबाजवळ या साऱ्यांची समृद्धि असल्यानें ओकनेंच सध्यां तिच्या घरीं जाऊन रहावें असें त्यांनीं ठरविलें होतें.

बाथशीबा कपांत चहा ओतीत असतां एक तोफ उडाल्याचा आवाज तिच्या कानावर आला आणि त्यामागोमाग दारापुढें तुताऱ्यांच्या जोरदार ललकाऱ्या ऐकूं येऊं लागल्या.

ओक हंसत हंसत म्हणाला, " तरीच या लोकांच्या चेहऱ्यावरून मला वाटलच होतं कीं, कसल्या तरी तयारींत आहेत ते सारे." दिवा हातांत घेऊन तो घराच्या दाराशीं आला. शालीचा पदर डोक्यावरून घेऊन बाथशीबाहि त्याच्यामागोमाग आली. त्या दिव्याचा प्रकाश दारासमोर उभ्या असलेल्या लोकांवर पडला. दारांत उभें असलेलें नवविवाहित जोडपें या लोकांच्या नजरेस पडतांच त्यांनीं एकदम " भले ! भले ! म्हणून आरोळी दिली. आणि त्याच क्षणीं तोफेचा एक बार झाला. त्यामागोमाग ढोल, टिमकी क्लॅरिओनेट, तुतारी, सनई, व्हायोलीन वगैरे खेड्यांत असलेल्या जुन्यापुराण्या वाद्यांचा एकदम गजर सुरूं झाला.

ओक म्हणाला, " या साऱ्या प्रकाराच्या बुडाशीं मार्क क्लार्क आणि जॉन हींच उत्साही पोरं आहेत." लोकांना उद्देशून तो म्हणाला, " मित्रहो ! आंत या सारे ! थोडा फराळ करा माझ्या अन् माझ्या पत्नीबरोबर."

मार्क क्लार्क म्हणाला, " आज रात्रीं नको. पुढेंमागें योग्य वेळीं येऊं आम्हीं. तरी आमंत्रणाबद्दल तुमचे आभार मानतों आम्ही. आजचा दिवस थोड्या आनंदोत्सवाशिवाय जाऊं देणं आम्हांला योग्य वाटलं

नाहीं म्हणून हा प्रसंग घडवून आणला आम्ही. तुमचा फराळाचा आग्रहच असेल तर वॉरनच्या दुकानांत खाण्यापिण्याचे कांहीं पदार्थ पाठवून द्या हवं तर. ओक आणि त्याची सुंदर वधू यांना दीर्घायुष्य आणि सौख्य मिळो अशी आमची शुभेच्छा आहे."

मार्क क्लार्कच्या या भाषणाबद्दल ओक साऱ्यांचे आभार मानून म्हणाला, "वॉरनकडे आतांच सारे पदार्थ रवाना होतील. मला वाटलंच होत माझ्या जुन्या दोस्तांकडून एखादी सलामी मला मिळणारच. माझ्या पत्नीला एवढ्यांतच मी सांगत होतों तसं."

कोगन आपल्या मित्राकडे वळून म्हणाला, "काय मंडळी ! लग्न झाल्यानंतर इतक्या लवकर हा माणूस 'माझी पत्नी' हे शब्द अगदीं सहजपणें म्हणायला शिकला आहे कीं नाहीं ?"

जेकब स्मॉलबरीनें उत्तर दिलें, "अहो वीस वीस वर्षे लग्न होऊन मुरलेल्या लोकांच्या तोंडून देखील हे शब्द इतक्या सहजपणें निघालेले मी ऐकले नाहींत. आतां हें खरं कीं हे शब्द आणखी भावनाशून्यपणें उच्चारायला हवे होते, पण एवढ्यांत तशी अपेक्षा करतां येणार नाहीं."

जॉन डोळा फिरवून म्हणाला, "होईल ! तीहि सुधारणा होईल कालांतरानं" यानंतर ते सारे परत फिरले.

ओक हंसला त्याणि बाथशीबानें जरा स्मित केलें—कारण आता पूर्वीप्रमाणें तिला चटकन् हंसू कधींच येत नसे.



# प्रा. भा. म. गोरे, एम्. ए. यांचीं पुस्तकें



(१) विश्रांति–( स्कूल व कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर ).
(२) नवी वसाहत–( ,, ,, ).
(३) लिली व मोगरा–( शिरीष माला, चित्रशाळा प्रेस, पुणें २ ).
(४) स्मितप्रभा–(प्रातिनिधिक विनोदी कथासंग्रह, मातृभूमि प्रकाशन, अकोला)
(५) नवी पालवी–( चित्रशाळा प्रेस, पुणें २ ).
(६) नवें निशाण–(प्रातिनिधिक लघुतम-कथा संग्रह, चित्रशाळा प्रेस, पुणें २)
(७) चमकत्या चांदण्या–( ,, ,, ,, )
(८) विद्या-विनोद–( सुरस-ग्रंथमाला, सोलापूर ).
(९) दिवाळीच्या दिवशीं–( महाराष्ट्र ग्रंथभांडार, मुंबई ४ ).
(१०) गर्दीपासून दूर दूर–( आयडियल बुक सर्व्हिस, पुणें २ )
(११) आधुनिक आङ्ग्ल वाङ्मय–( चित्रशाळा प्रेस, पुणें २ ).
(१२) गलिव्हरचे प्रवास–( सक्षेप ) ( के. भि. ढवळे, मुंबई ४ ).
(१३) तीन शिलेदार– ( ,, ) ( महाराष्ट्र ग्रंथभांडार, मुंबई ४ )
(१४) गुलाबांचा मळा–(स्वाध्यायमाला, अनाथ विद्यार्थी गृह प्रकाशन पुणें २ )
(१५) रिप् व्हॅन् विंकल–( ,, ,, )
(१६) इलियड–( महाकाव्य परिचय ) ,, ,, )
(१७) ओडेसी–( महाकाव्य परिचय ) ,, ,, )
(१८) जादूची कुपी–( मुलांसाठी कादंबरी) स्कूल व कॉलेज बु. स्टॉ. कोल्हापूर
(१९) सोशीक सुशीला–( मुलींसाठीं कादंबरी ) ,, ,,
(२०) शहाणे पशू–( मुलांसाठी प्राणि-कथा ) ( के. भि. ढवळे )
(२१) Writings and Speeches of Dr. R. P. Paranjpye.
( Karnatak Press, Bombay 2 )
(२२) The Mind and Heart of India
( School and College Book Stall, Bombay 2 )